# भाषाशास्त्र

नाना पावगी

मनोरंजन शतक,

व

भारतीय साम्राज्य

[ पूर्वार्ध ]

१ आर्य देश व तत्संबंधी वृत्तांत,
२ आर्य लोक व त्यांचे बुद्धिवैभव,
३ आर्येतिहास व भूगोल,
४ आर्यशास्त्र व कला,
५ आर्यशासनपद्धति व संस्था,
६ आर्यगृहस्थिति, नीति, शौर्य, व उन्नति,

[ उत्तरार्ध ]

७ भरतखंडांतील मुख्य धर्म,
८ भरतखंडांतील जातिवैचित्र्य,
९ भरतखंडांतील नानाविध भाषा;

इत्यादि ग्रंथांचे कर्ते

यांनीं रचिलें.

किंमत २॥ रुपये.

# भाषाशास्त्र.

## नारायण भवानराव पावगी.

मनोरंजक शतक

व

भारतीय साम्राज्य

१ आर्यदेश व तत्संबंधी वृत्तांत. २ आर्य लोक व त्यांचें बुद्धिवैभव.
३ आर्येतिहास व भूगोल. ४ आर्यशास्त्र व कला.
५ आर्यशासनपद्धति व संस्था. ६ आर्यगृहस्थिति, नीति, शौर्य, व उन्नति.
७ भरतखंडांतील मुख्य धर्म. ८ भरतखंडांतील जातिवैचित्र्य.
९ भरतखंडांतील नानाविध भाषा.

इत्यादि ग्रंथांचे कर्ते

यांनीं रचिलें.

---

तें

पुणें येथें " इंदिरा " छापखान्यांत छापिलें.

---

शके १८२३. सन १९०१

प्लवनाम संवत्सरे.

—:०:—



---

किंमत २॥ रुपये.

श्री

सद्गुरुचरणारविंदीं

नमन करून

ही

भाषाशास्त्ररूपी

यथाशक्ति व यथामति केलेली

अत्यल्प

# देशसेवा

नारायण भवानराव पावगी

यानें

आपल्या दयितआर्यभूमीच्या ठिकाणीं

असलेल्या अत्युत्कट

प्रीत्यर्थ

सकल

आर्यभगिनींस व आर्यबांधवांस

प्रीतिपूर्वक

अत्यादरानें समर्पिली असे.

# प्रस्तावना.



केयूरा न विभूषयन्ति पुरुषं हारा न चन्द्रोज्ज्वला
न स्नानं न विलेपनं न कुसुमं नालंकृता मूर्धजाः ।
वाण्येकासमलं करोति पुरुषं या संस्कृता धार्यते ।
क्षीयन्ते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणम् ॥
(नीतिशतक.)

भाषेची उत्पत्ति कशी झाली, तिचें उद्गमस्थान कोणतें, तिचें मूळ कोणच्या भाषेंत दृष्टीस पडतें, ह्या मूळ भाषेपासून कोणकोणत्या शाखा उद्भवल्या, ह्यांचे घटकावयव कोणते समजावयाचे, इत्यादि विषयक जी मीमांसा तेंच भाषाशास्त्र होय. हें शास्त्र किती महत्वाचें व उपयुक्त आहे, आणि तें प्रगल्भ दशेप्रत आणण्यास आपणांला किती परिश्रम केले पाहिजेत, याविषयीं आज नव्यानेंच येथें सांगितलें पाहिजे असें नाहीं. कारण, ती गोष्ट बहुश्रुत समाजास सर्व प्रकारें विदित असून, विद्वज्जनांस तर त्याचा प्रत्यहीं अनुभवच येत आहे.

खरोखर, भाषा ही एक अपूर्व वस्तु होय; व ती तशी असल्याबद्दल आमचे पुराण आर्यपूर्वज पूर्णपणें जाणून होते. शिवाय, ती गोष्ट आमच्या संस्कृत ग्रंथोदधीवरून देखील कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारखी आहे. (पुढाले भाग ९ वा पहा). आणि म्हणूनच त्या प्राक्त-

लीन जरठ व परिणत ऋषिवर्यांनीं आपल्या मातृभाषेचें चांगलें लालनपालन केलें; तिला हरएक प्रकारें वाढीस लाविलें; व तिजला पूर्णत्वास आणून, ह्या भूतलावरील अखिल भाषांवर तिचें श्रेष्ठत्व स्थापिलें. इतकेंच नव्हे तर, हें अमूल्य भाषाशास्त्र पद्धतशीर रीतीनें कसें शिकावें, त्याचा शोध कसा लावावा, आणि त्याचें अन्वेषण कोणत्या तऱ्हेनें करावें, याबद्दलचा धडा सुद्धां पाणिनीसारख्या अद्वितीय बुद्धिमत्तेच्या सर्वमान्य ऋषीनें, आज सुमारें चार हजार वर्षांपलीकडील कालांत, प्रथमतःच घालून दिला; व त्यायोगानें अनन्त उपकाराचें कधींही न फिटणारें ओझें एकंदर मनुष्यमात्रावर त्यानें कायमचें करून ठेविलें. ही गोष्ट आम्हीं सदैव ध्यानांत ठेवण्यासारखी आहे; आणि म्हणूनच ती आह्मांला विसरतां कामा नये.

आतां, पाणिनीच्या पूर्वीं आणि त्याच्या नन्तरही, तत्तत्कालानुरूप असे, अनेक पंडितांचे भाषाशास्त्रविषयक बरेच परिश्रम झाले होते, यांत बिलकुल शंका नाहीं.

---

१ पंडित सत्यव्रत सामश्रमींच्या मतें, पाणिनीचा काल इ. स. पूर्वीं २४०० वर्षें असल्याचें होतें. (निरुक्त. उपोद्घात पु. ६ वें. भा. ७ वा. पा. जी–झी. )

डा. भांडारकराच्या अभिप्रायाप्रमाणें, पाणिनीचा काल इ. स. पूर्वीं ७०० वर्षें असावा, असें वाटतें. ( भांडारकरकृत दक्षिणचा प्राचीन इतिहास. पा. ८ )

पाश्चात्य पंडित वेबर, मॉक्समुलर, इत्यादींच्या मतें, हा काल इ. स. पू. ३५० वर्षें असावा. ( संस्कृत वाङ्मयाचा त्यांनीं केलेला इतिहास पहा. )

तथापि, ते सर्व संस्कृत व तदुद्भूत प्राकृत भाषाविषयकच असल्यामुळें, पृथ्वीवरील सर्व भाषांचें विवेचन, त्यांचें शास्त्रीय वर्गीकरण, त्यांची परस्पर तुलना, त्यांची उपपत्ति, त्यांचें उद्गमस्थान, त्यांचें स्थलांतर, रूपान्तर, आणि अन्य ऐतिह्य, इत्यादिसंबंधीं हकीकत यांत नाहीं, हें उघड आहे. कारण, दळणवळणासारख्या कित्येक हरकतीमुळें, व अवश्य तीं साधनें उपलब्ध नसल्यानें, ती त्यावेळीं बिलकुल देतांच आली नाहीं; आणि ती देतां येणें देखील अगदींच शक्य नव्हतें; हें कोणासही कबूल केलें पाहिजे.

सांप्रतकाळीं, सुगमप्रवास, साहसप्राचुर्य, नौकागमन, लोहमार्ग, तारायंत्र, वगैरे हरएक प्रकारची संपूर्ण अनुकूलता असल्यानें, आशिया, यूरोप, आफ्रिका, अमेरिका, आस्ट्रेलिया, व अन्य द्वीपसमूह, यांच्याशीं आमचा सतत आणि निकट संबंध होत गेला. त्यामुळें, सर्व प्रकारची जा, ये, जिकडे तिकडे सुरू झाली; व मनुष्याच्या ज्ञानभांडारांतही एकसारखी भरच पडत चालली.

अर्थात्, ह्या ज्ञानवृद्धीनें शास्त्राच्या प्रत्येक शाखेला नूतन अंकुर फुटूं लागले; आणि त्यासरसें भाषाशास्त्राच्या प्रच्छिन्न बीजाचेंही आपोआपच पोषण होत जाऊन, ह्या अत्युपयुक्त विषयावर विस्तृत व व्यापक ग्रंथ होण्यास एक उत्कृष्ट संधि मिळाली.

ह्या अमूल्य संधीचा सदुपयोग कित्येक पाश्चात्यांनीं अगदीं वेळेवर आणि चांगल्या प्रकारें केला, याबद्दल त्यांचें साभार अभिनंदन केलें पाहिजे. लीबनिझ् सारख्यांनीं ह्या भूतलावरील अनेक देशांतील भिन्नभिन्न भा-

षांचे निरनिराळे शब्दकोश तयार करविण्याच्या कामीं अश्रांत परिश्रम घेतले; आणि राजे रजवाडे, मुत्सद्दी व कारभारी, धर्मोपदेशक व अन्य सद्गृहस्थ, यांस वारंवार पत्रें लिहून, तत्संबंधीं अगदीं नेट लाविला. फार तर काय सांगावें पण, रूसच्या क्याथराईन् सारख्या पाद-शाहिणीनें सुद्धां, आपल्या अफाट राज्यांतील लहान मोठ्या हुद्देदारांस लिहून, पृथक् पृथक् भाषांतील शब्द-संग्रह मागविला, आणि त्यांचा एक कोशही तयार करविला.

ह्या कोशापासून सकृद्दर्शनीं एक मोठाच फायदा झाला. तो हा कीं, निरनिराळ्या भाषांतील शब्दांचें साम्य व अर्थसाम्य, यांची तुलना करण्यास फार उत्तम साधन मिळालें. पुढें बॉपसारख्या विद्वानांनीं ही तुलना शास्त्रीय रीतीनें सिद्ध केली; आणि त्यायोगानें संस्कृत, प्राकृत, ग्रीक, ल्याटिन, जर्मन, स्लॉव्हॉनिक, इत्यादि भाषांचें निकट साम्य असल्याचें निर्विवाद ठरलें.

तदनन्तर, मॉक्समुलरसारख्यांनीं तर भाषाशास्त्रविष-यक फारच परिश्रम घेतले. त्यांनीं ह्यासंबंधाची हरएक प्रकारची माहिती उपलब्ध असलेल्या सर्व ठिकाणाहून मिळविली. इतकेंच नव्हें तर, तिचें त्यांनीं परिशीलन करून, त्याजवर अमूल्य व्याख्यानें दिलीं; व तीं पुस्तक-रूपानें छापून प्रसिद्धही झालीं.

याप्रमाणें, पाश्चात्य देशांत, भाषाशास्त्रावर हल्लीं अनेक ग्रंथ झाल्याचें सर्वांस महशूर आहे. परंतु, अशा प्रका रचा प्रयत्न आमच्या भरतखंडांतल्या देशी भाषेंत कोठें-ही झाला असल्याचें दिसत नाहीं. निदान, तो माझ्या तरी

ऐकण्यांत किंवा पहाण्यांत नाहीं, येवढें मजला कबूलच केलें पाहिजे. सबब, ह्या संबंधानें आपल्या प्रियतम आर्यभूमीची सेवा कशी बशी तरी आपल्या हातून घडावी, इतकाच हेतु धरून, हा मनोभावानें केलेला अत्यल्प प्रयत्न मी आपल्या नितान्तप्रिय **मातृसेवेशीं** केवळ भीतभीतच सादर करीत आहें.

भीतभीत ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, आर्यमातेच्या योग्यतेप्रमाणें आणि ऐश्वर्यानुरूप ही सेवा झालेली नसून, ती गोष्ट हा सेवक पूर्णपणें जाणून आहे. परंतु, शक्तीशिवाय भक्ति नाहीं; जाळावांचून कड नाहीं; व मायेवांचून रडें नाहीं. सबब, यथामति जें कांहीं झालें तेंच, मी आपली इतिकर्तव्यता समजून, **मातृचरणीं** अर्पण करीत आहें.

ही अत्यल्प सेवा बजावितांना, मजला अनेक ग्रंथांचें साहाय्य झालें आहे. सबब, त्याबद्दल केवळ आनंदानें व कृतज्ञतापूर्वक, मी त्या त्या ग्रंथकारांचें आभार मानितों.

हा भाषाशास्त्रविषयक प्रयत्न पहिलाच असल्यामुळें, त्यांत अनेक चुका होण्याचा संभव आहे. आणि माझ्यासारख्या अल्पधीच्या हातून तर त्या केवळ संख्यातीतच होतील; व मतभेदही ठिकठिकाणीं होईल, यांत कांहींच संशय नाहीं. तथापि, तत्संबंधानें वाचकांनीं मजवर अनुग्रहच केला पाहिजे, अशी माझी त्यास विज्ञप्ति आहे.

मुक्काम पुणें. मंगळवार,<br>मार्गशीर्ष शुद्ध १३ शके<br>१८२२ शार्वरीनामसंवत्सरें.

**नारायण भवानराव पावगी.**

---

# अनुक्रमणिका.

# शुद्धिपत्रक.

| पृष्ट. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७४ | २४ | यस्थाः | यस्याः |
| ९१ | ५ | अक्षरामणांकारोस्मि | अक्षराणामकारोस्मि. |
| | १० | अकारौ. | अकारो. |
| ११८ | २४ | स्थन | स्तन |
| १५८ | १४ | दिगंद्र्शन | दिग्दर्शन. |
| २११ | २१ | इ. स. ७०० सालीं | इ. स. पूर्वी ७०० सालीं. |
| २१२ | ८ | बुद्धिनिर्वाणानंतर | बुद्धनिर्वाणानंतर |
| २२८ | २ | सरद्‌हू | सद्‌रहू |
| ,, | २५ | उज्जलदत्त | उज्ज्वलदत्त. |
| २३३ | ७ | इ. स. ३५० | इ. स. पू. ३५०. |
| २६१ | २५ | Historions | Historians. |
| २६५ | ११ | अससल्या | असल्या |
| २८६ | १३ | सानिध्य | सान्निध्य |
| ३१० | १३ | पाश्चत्य | पाश्चात्य |
| ३११ | २७ | कथितम | कथितम् |
| ३४४ | २७ | Contry | Country |
| | ,, | Challening | Challenging |
| ३४७ | ११ | आस्तु | अस्तु |

# भाषाशास्त्र.

## भाग पहिला.

### भाषाशास्त्राचें सामान्यविवेचन व एकंदर भाषांचें दिग्दर्शन.

भाषाशास्त्र. भाषाशास्त्र हा विषय इतका व्यापक आणि महत्वाचा आहे कीं, त्याचें विवेचन करणें म्हणजे ह्या भूतलावर ज्या ज्या भाषा पूर्वीं प्रचारांत होत्या, किंवा ज्या सांप्रतकाळींही प्रचारांत आहेत, त्या सर्वांचें समग्र वर्णन अथवा इतिवृत्तांतच देणें होय. किंबहुना, भाषाशास्त्र म्हणजे एकंदर भाषांचें ऐतीह्य, त्यांची प्रथमची व नंतरची स्थिति, त्यांचा उद्गम, आणि त्यांची मूलपीठिका, इत्यादि संबंधाची तपशिलवार हकीकतच समजावयाची, असेंही म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. अर्थात्, आर्य व अनार्य, प्राचीन व अर्वाचीन, पौरस्त्य आणि पाश्चात्य, द्वीपीय व सामुद्रिक, वगैरे सर्व भाषांचें साद्यन्त वर्णन ह्यांतच आलें पाहिजे, हें आणखी विशेष रीतीनें खचितच सांगावयास नको.

शिवाय, भाषा म्हणजे काय; ती कशी उत्पन्न झाली; तिच्यांतील मूळशब्द कोणते; ते कसे प्रचारांत आले; त्यांचें ऐतिहासिक बीज केव्हां दृग्गोचर होऊं लागलें; आपापले विचार प्रदर्शित करण्यासाठीं, मनुष्यमात्राला शब्दांची आवश्यकता केव्हां व कशी भासमान झाली; ही उत्पन्न झालेली अडचण दूर होण्यास्तव त्यानें कोणते उपाय योजिले; कशा प्रकारचीं सांकेतिक चिन्हें त्यानें अमलांत आणिलीं; कोणकोणत्या वाक्संज्ञांचा त्यानें उपयोग केला; लिपिज्ञानांत, किंवा लेखनकलेंत, त्यांचा कशा प्रकारें उपयोग झाला; ह्या संबंधानें आमच्या आर्य पूर्वजांनीं कोणत्या दि[illegible] कसे प्रयत्न केले; इतर पौरस्त्य राष्ट्रांनीं तद्विषयक को[illegible] यत्न चालविले; इत्यादि सर्व बाबतींचा समावेश भाषा[illegible]स्त्रांतच होणें विशेष अगत्याचें आहे.

त्याची व्याप्ति.

त्याचप्रमाणें, भाषा ही अमानुषी व दैवी आहे, किंवा ती कृतक आणि समाजघटित समजण्याची; ती मानवी कुटुंबाची द्योतक आहे कीं नाहीं; म्हणजे,[१] भाषाभिन्नत्वानें कुटुंबभिन्नत्व अथवा वर्णविभेद समजण्याचा कीं कसें; भाषेचा उद्गम प्रथमतः कोठें झाला; तिचा ओघ कोणीकडून कोठें चालला; तिचा प्रसार कोणीकडे कसकसा होत गेला; त्या कारणानें, तिच्यांत कोणत्या प्रकारचें स्थित्यन्तर होत चाललें; त्याचा काय परिणाम घडून आला; भाषेच्या जन्मभूमीवरून, राष्ट्राचें आदिनिवासस्थान काढतां येणें शक्य आहे कीं नाहीं; वगैरे गोष्टींचा अन्तर्भावही भाषाशास्त्रांतच झाला पाहिजे.

तसेंच, पाश्चात्य राष्ट्रांनीं ह्या बाबतींत कोणती चळवळ सुरू केली; त्यांत त्यांस कितपत यश आलें; त्यांनीं प्रथमतः भाषेचें वर्गीकरण कसें केलें; भाषेच्या संबंधानें त्यांच्या कशा प्रकारच्या कल्पना होत्या; मायभाषेविषयीं भिन्नभिन्न राष्ट्रांचें कसें मत असे; हल्लीं त्यांत कोणता फेरफार झाला आहे; तो होण्यास कोणतीं कारणें उद्भवलीं; अनेक भाषांतील शब्दांचें साम्य आणि त्यांचें व्याकरण, यासंबंधानें विचार करितां, मायभाषेचें श्रेष्ठत्व कोणत्या भाषेकडे येतें; इत्यादि गोष्टींचें तपशिलवार विवेचन ह्या भाषाशास्त्रांतच होणें अगदीं जरूरीचें आहे.

विषयमहात्म्य,

अर्थात्, अशा प्रकारचें व्यापक निरूपण करण्याला, सर्व भाषांत चांगलेंच प्राविण्य पाहिजे आहे. इतकेंच नव्हे तर, अनेक विषय-पारंगता, आकलनशक्ति, विद्वत्ता, प्रागल्भ्य, समीकरण-सामर्थ्य, आणि आन्वीक्षिकी विद्येचें सूक्ष्मावलोकन, वगैरे नानाविध गुणांची देखील निःसंशय मोठीच आवश्यकता आहे; आणि हे गुण नसतील तर, अशा प्रकारचें विवेचन होणें देखील अगदींच शक्य नाहीं.

व अंगीकृत सेवेचा शक्तीबाहेरचा बोजा.

तेव्हां, असें असतां, व अवश्य तो एकही गुण माझ्यांत वास करीत नाहीं हें मजला माहीत असून देखील, हा सांप्रतचा केवळ माझ्या शक्तीबाहेरचा बोजा, मी आपल्या शिरावर घेतला आहे.

तथापि, वाचकांच्या मनाची उदारता, त्यांची सहानु-भूति, त्यांची स्वभावज अनुकंपा, आणि त्यांचा अनुग्रह,

इतिकर्तव्यतेची प्रेरणा.

हीं मनांत येऊन, व माझ्या इतिकर्तव्यतेला जागरुक होऊन, अशा प्रकारचें साहस करण्यास मी केवळ भीतभीतच प्रवृत्त झालें आहे.

व त्यापासून होणारा कार्यभाग.

शिवाय, माझ्या अल्पप्रयत्नांत असंख्य दोष व अक्षम्य विसंगता ठिकठिकाणीं असणारच. तेव्हां, निदान ती काढण्याच्या हेतूनें तरी, एकाद्या विद्वानास स्फूर्ती होऊन, अथवा अकस्मात् उत्तेजन मिळून, त्यानें ह्या प्रिय महाराष्ट्र भाषेची सेवा केल्यास, मजला मातृ व पितृ सुखाच्या लाभासारखाच अत्यानंद होऊन, माझ्या श्रमाचें चीज होईल; आणि माझे सर्व इष्टहेतु सिद्धीस गेल्याप्रमाणेंच मी खचित समजेन.

अल्पकारण व महत्कार्य.

असो. हें भाषाशास्त्र इतक्या योग्यतेचें आहे तरी, त्याचे बीजांकूर अगदींच क्षुद्रसे भासतात; व त्या योगानें, निदान प्रथमतः तरी, त्याचें यत्किंचित् देखील महत्व आपणांस वाटत नाहीं. किंबहुना, ह्या जगांतील बहुतेक महत्वाच्या गोष्टींचें मूळ पाहूं गेलें असतां तें अगदीं अल्पसेंच असतें; आणि त्यामुळें, त्याचा खरा प्रभाव निदान प्रथम दर्शनीं तरी आपल्या लक्षांत बिलकूल येत नाहीं.

उदाहरणार्थ, वैदिक कालांतील आमचे यज्ञच घ्या. हे बाह्यदृष्ट्या जरी आपणांस सामान्यसे वाटतात, तरी ज्योतिःशास्त्र प्रगल्भतेस येण्याला तेच कारणीभूत झाले आहेत. एवढेंच नव्हें तर, ज्योतिःशास्त्राचें ते एक मूळ बीजच

होऊन राहिले आहेत. फार तर काय सांगावें, पण, ह्या प्राथमिक अंकुरावरच नित्यनैमित्तिक होमहवनांचें भरपूर सिंचन झाल्यानें, त्याचा ज्योतिःशास्त्ररूपी एक मोठा वृक्षच[1] बनत गेला; व तो कालान्तरानें नांवारूपासही आला. निदान, तो आमच्या प्रचंड आर्यधर्माचा तरी खचितच मजबूत पाया होय, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

**यज्ञेनयज्ञमयजन्तदेवास्तानिधर्माणिप्रथमान्यासन् ।**
**तेहनाकंमहिमानःसचन्तयत्रपूर्वेसाध्याःसन्तिदेवाः ॥**

( ऋग्वेद. )

यज्ञवेदिकामुळें भूमितिशास्त्राचा उद्गम.

भूमितिशास्त्राची देखील अशाच प्रकारची हकीकत आहे. आमच्या यज्ञांत वेदींची मोठी आवश्यकता असून, त्या अगदीं रेखलेल्या, भिन्नभिन्न आकृतींच्या, व

---

१ असें आमचें मत असून, कित्येक पाश्चात्यांचेंही त्याचप्रमाणें आहे.

Asiatic Researches, Colebrooke, Max Muller ( What can India teach us ), Cassini, Bailly, Playfair. Weber ( History of Sanskrit Literature ),

**भा**रतीय साम्राज्य. पू. पु. २ रें. पान ८८ ते ९०, इत्यादि पहा.

मॉक्समुलर म्हणतो :—

" It is well known that most of the Vedic *sacrifices depend on the moon*, far more than on the sun." " The *seasons* and the *sacrifices* were in fact so *intimately connected together in the thoughts of the ancient Hindus* that one of the commonest names for priest was *Ritvig*, literally *the season sacrificer*." ( What can India teach us ? First Edn. P. 127. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

केवळ प्रमाणसिद्धच असल्या पाहिजेत, अशी आमच्या आर्यपूर्वजांची समजूत असे. सबब, ते नेहेमीं काळजी-पूर्वकच यज्ञमृत्तिका लावीत, आणि मोठ्या टापटीपेनेंच स्थंडिलें तयार करीत. त्यामुळें, प्रमाणाची जरूर पडून, सूक्ष्ममापन देखील त्याच वेळीं पहावें लागे. अशा स्थितींत, भूमिमापनाचा बीजांकूर सहजीं रोंवला गेला, व त्याचाच पुढें वृक्ष बनून भूमितिशास्त्र ह्या भरतखंडांतच उदयास[1] आलें.

क्षात्र बुद्ध, व प्रबुद्ध बुद्ध.

सुप्रसिद्ध बुद्ध, जो गौतम या नांवानें सर्वांस महशूर आहे, त्याला एकाएकी विरति प्राप्त झाली; व तीही एका वृद्ध मनुष्याची गलितावस्था, दुसऱ्या एकाची दुःखद स्थिति, आणि तिसऱ्याचें विशीर्यमाण प्रेत पाहून झाली. परंतु, ह्या केवळ सामान्य गोष्टीचाच परिणाम इतका कांहीं बलवत्तर, विलक्षण, अतर्क्य, व अदृष्टपूर्व झाला कीं, त्यामुळें बौद्धधर्माची एकदम स्थापना होऊन, त्याचा प्रसार बहुतेक आशियाखंडांत सर्वत्र झाला[2].

श्रीशिवाजी[3] हा लहानसा जहागीरदारच होता. तरी

---

१ एल्फिन्स्टन्कृत हिंदुस्थानचा इतिहास; व भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पु. ४ थें. पान ९६ ते १०२ पहा.

२ बुद्धाचें चरित्र; बौद्धधर्म; व भारतीय साम्राज्य, पु. ७ वें, पान १३९ ते १७६ पहा.

हा धर्मप्रसार यूरोपखंडांतील व्होल्गा नदीपासून तों तहत पूर्वेकडील चीनसमुद्र, व त्याच्याही पलीकडे स्थीरमहासागरापर्यंत झाला होता.

३ आंग्ल व पाश्चात्य इतिहासकार ह्याला पराक्रमी शिवाजी, आणि महाराष्ट्र साम्राज्याचा संस्थापक म्हणतात.

( Shivaji, the Great, and founder of the Maratha Empire ).

श्रीशिवाजी व महाराष्ट्र साम्राज्य.

तो पुढें छत्रपति झाला, व त्यानें महाराष्ट्र साम्राज्याची स्थापना केली.

बाळाजी विश्वनाथ हा सातारच्या गादीजवळ प्रथमतः

बाळाजी विश्वनाथ, व दिल्ली तक्ताची सामन्तता.

एक लहानसा कारकूनच होता. तथापि, त्यानें आपल्या शहाणपणानें, बुद्धिप्रभावानें, आणि राजनिष्ठेनें पेशवाईचीं वस्त्रें संपादन करून, चौथाई-सरदेशमुखीच्या मिशानें दिल्लीच्या दरबारांतूनही खंडणी वसूल केली, व महाराष्ट्र साम्राज्याचा ध्वज चोहोंकडे फडकाविला. इतकेंच नव्हे तर, त्याची कला शुक्लचन्द्रमाप्रमाणें चढती राही अशी त्यानें आपली अक्कल हुशारी लढविली, आणि दिल्लीच्या पादशहास महाराष्ट्राधिपतीचा सामन्त बनविलें.

झाडावरील फळ जमिनीवर पडतांना पाहिल्यानंतर,

फलाचें पतन, व न्यूटनची कल्पना.

न्यूटन[1]च्या मनांत गुरुत्वाकर्षणशक्तीची कल्पना आली, व त्यानें ही सर्व व्यापकशक्ति नवीनच शोधून काढिली[2].

---

१ जन्मकाल इ. स. १६४२.

२ असें यूरोपस्थांचें म्हणणें आहे. परंतु, वस्तुस्थिति याहून खचितच अगदीं भिन्न आहे. कारण, ही गुरुत्वाकर्षणशक्ति, न्यूटनच्याही पूर्वी, आमच्या पूर्वजांस, किंबहुना ऋक्कालीन ऋषींस देखील, सुमारें दहा अकरा हजार वर्षें माहीत होती; आणि त्यानें काढिलेले नियमसुद्धां त्यांस अवगत होते.

ऋग्वेद, भारतीय साम्राज्य, पु. ४ थें, पान ७२-८३, व Sir W. Jones, पहा.

He ( Sir William Jones ) ventures to affirm that " the whole of Newton's Theology, and part of his

( पुढें चालू )

वॉट्‌ची कल्पनाशक्ति अशाच मासल्याची होय. कारण, चुलीवर ठेविलेल्या आधणाच्या पाण्यानें गति प्राप्त होते, आणि भांड्यावर घातलेलें झांकण हालतें, ही गोष्ट लक्षांत धरून, वॉट्‌नें वाफेची शक्ति व बाष्पयंत्र शोधून काढिलें.

झांकणाची गति, आणि वाफेच्या शक्तीची कल्पना.

अशीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील. परंतु, केवळ विस्तारभयास्तव, त्या सर्वांचा तपशील येथें देतां येत नाहीं.

अस्तु. तात्पर्य म्हणून इतकेंच कीं, अल्पारंभांतच महत्कार्य प्रच्छिन्न असतें, व त्याचप्रमाणें भाषाशास्त्राचें देखील होय, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे.

भाषा हा निःसंशय एक मनोवेधक, प्रगल्भ, आणि महत्वाचा विषय आहे. इतकेंच नव्हे तर, तें एक शास्त्र आहे, असेंही म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. ज्याप्रमाणें, वैद्यकीय विवेचन शास्त्रीय रीतीनें करता येतें; अथवा जसे रसायनशास्त्राचे नियम केवळ ठरीव प्रमाणानेंच सांगता

भाषाशास्त्राची शैशवावस्था.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

philosophy, *may be found in the Vedas,* which also *abound with allusions, to the force of universal attraction.*" ( vol. III. P. 246. vol. XXIX P. 158 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

१. तथापि, **वॉट्‌** जन्मण्यापूर्वी, व इ० स० च्या अगोदर हजारों वर्षें, आम्हां-**भारतीयांस** वाफेची शक्ति माहित असून, आम्ही अग्निरथही चाळवीत असूं, असें **रामायण** व **महाभारतावरून** चांगलें व्यक्त होतें. ( ग्रंथकर्ता. )

येतात; किंवा उद्भिद्विद्येंत ज्याप्रमाणें वनस्पतींच्या गुण-धर्मांचेंही हुबेहूब वर्णन होतें; त्याचप्रमाणें भाषाशास्त्राचें असून, ह्याचे नियम देखील पुष्कळ बाबतींत अगदीं ठरीव व अबाधित आहेत. मात्र, इतकेंच कीं, इतर शास्त्रें जशीं पूर्णतेप्रत पोहोंचलीं आहेत, अथवा पोहोंचण्याच्या रंगांत आहेत, त्याप्रमाणें ह्या शास्त्राचें नसून, तें नुकतेंच वाढीस लागलें आहे. किंबहुना, तें अजून बाल्यावस्थेंतच आहे, असेंही म्हटलें असतां चालेल.

भाषाशास्त्रविषयक साधनांचीं परिपूर्णता.

तथापि, अशा प्रकारच्या प्रथमावस्थेंत सुद्धां, शोधक मनुष्याला, हें भाषाशास्त्र पूर्णतेस आणण्याला, कोणत्याही साधनाची बिलकूल वाण नाहीं. कारण, ह्या भाषामहोदधींत, शब्दमौक्तिकांच्या असंख्य शुक्तिका, इतस्ततः, आणि द्वीपसमुदायांत, व खंडान्तरी, एकसारख्या पसरलेल्या असून, त्या गोळा करण्यासाठीं, ज्यानें म्हणून आपली कास धैर्यानें व एकनिष्ठेनें बांधली आहे, त्यास त्या प्राप्त झाल्यावांचून खचितच राहणार नाहींत. फार तर काय सांगावें, पण, त्या शुक्तिकांतील अपूर्व आणि उज्ज्वल दीप्ति त्यास लागलींच भासमान होऊन, त्यांतील प्रत्येक शब्दमौक्तिकांचा साद्यन्त इतिहास त्याच्या डोळ्यांपुढें केवळ मूर्तिमंतच उभा राहील.

भाषा सामग्रीचीं स्थळें.

मासल्याकरितां, आपण आपलें भरतखंड अथवा आर्यावर्तच जरी घेतलें, तरी त्यांत देखील, अतीव अमूल्य रत्नांची एक विशाळ खाणच सांपडेल. येथून, असंख्य शब्दांनीं कोठ-

कोठें प्रवास केला; अनेक शब्दांचे कसकसें स्थलान्तर झालें; नानाविध भाषाप्रचारांत कोणत्या तऱ्हेनें फेरबदल होत गेले; इराण, आर्मीनिया, इजिप्त, ग्रीस, रोम, जर्मनी, नॉर्वे, इंग्लंड, इत्यादि देशांत संस्कृत शब्दांचें कशा प्रकारें रूपान्तर बनलें; पातालांत, अगर अपर गोलार्धावर ज्या भाषा बोलतात, त्या भाषांतील शब्दांत, संस्कृत शब्दांचें, म्हणजे अर्थात् आर्यहिंदूंच्या कुटुंबांतील शब्दांचें, कांहीं साम्य आहे, किंवा त्यांच्यातील शब्दकोश त्याहून अगदीं भिन्न आहे; ह्याच गोलार्धाच्या तोयराशींत जीं अगणित लहान मोठीं बेटें आहेत, त्यांतील क्रूर लोक कोणती भाषा बोलतात; तसेंच, ह्या रानटी लोकांच्या भाषापद्धतींत, व आफ्रिका खंडांतील सिध्धी, हबशी, आणि कृष्णदेही वनचरांच्या शब्दरचनेंत, किती व कशा प्रकारची भिन्नता आहे; इत्यादि संबंधीं शोध फारच मोहक, विशेष चित्ताकर्षक, आणि निःसंशय फलप्रद आहेत.

भाषेची व्याख्या.

आतां, भाषाशास्त्राचें विवेचन करण्यापूर्वीं, भाषा म्हणजे काय हें सांगून, तिची प्रथमतः व्याख्या देतों. आपलें मनोगत व्यक्त व्हावें यासाठीं, किंवा आपल्या मनांतील कल्पना बाहेर पडून त्यांचें स्पष्टीकरण व्हावें एतदर्थ, अथवा आपले विचार एकमेकांस प्रदर्शित करता यावेत म्हणून, जीं सांकेतिक चिन्हें ठरविण्यांत आलीं, अगर जी वाक्संज्ञा अमलांत आणिली, तिलाच भाषा हें नामधेय प्राप्त झालें.

तथापि, श्लेचर[१] प्रभृतींचें याहून अगदीं भिन्न मत आहे.

१ Collection Philologique, Bikkers. 1869.

ते असें समजतात कीं, भाषेची अवस्था व तिचें अस्तित्व, हीं केवळ यादृच्छिक असून, तिची घटना देखील अगदीं स्वतंत्र आहे. मॉक्समुलर[1] तर भाषाशास्त्राची गणना पदार्थविज्ञानशास्त्रांतच करतो. परंतु, व्हिट्नेला ती गोष्ट मुळींच संमत नाहीं.

व्हिट्नें म्हणतो कीं, भाषाशास्त्राची गणना पदार्थविज्ञानांत होत नसून, ती मानवी प्राण्यानें केलेली एक संस्थाच[2] आहे. मात्र, मनुष्य कृतीच्या अनेक संस्कारांनीं तींत फेरफार होण्याचा संभव असतो; आणि तो कालान्तरानें निःसंशय होतो, हें कोणालाही कबूल केलें पाहिजे.

त्या संबंधानें पाश्चात्य पंडितांचा अभिप्राय.

इंग्लंदांतील भाषाशास्त्राचा दुय्यम पंडित जो सेस[3], त्याचें असें मत आहे कीं, भाषा म्हणजे केवळ स्वरसंक्रमच होय. ह्यांतच सांकेतिक चिन्हात्मक वर्णभि-

---

१ ( I claim ) " for the Science of Language a place among the physical sciences. " ( Max Muller. Sc. of Language. Lectures. vol. I. P.P. 30/91. )

२ " Language is not a physical product, but a human institution, preserved, perpetuated, and changed, by free human action. " " To ascribe the difference of language and linguistic growth directly to ' physical Causes, ' to make them dependent on ' peculiarities of organization, ' whether cerebral, laryngal, or other, is wholly meaningless and futile.". ( Whitney's Language and the Study of Language. P. 152 ).

३ A. H. Sayce. Deputy Professor of comparative phylology in the University of Oxford's " Introductian to the science of Language. " vol. I. P. 90

न्नत्व असतें, व तें स्वरानुपूर्व्यानें व्यक्त केलेलें दृष्टीस पडतें. किंबहुना, भाषा म्हणजे समाजानें निर्माण केलेली कृति[1], असें देखील म्हणण्यास हरकत नाहीं.

भाषा ही दैवी नसून, ती मानुषी आहे.

ह्यावरून, भाषा ही कृतक किंवा समाजघटित आहे, असें वाटतें. आणि म्हणूनच, तिची उत्पत्ति व उत्क्रान्ति केवळ मनुष्याच्या प्रयत्नानेंच झाली असल्याचें दिसतें. अर्थात्, ती अमानुषी किंवा दैवी असावी, अशी कल्पना करण्यास बाध येतो. कारण, आपण हल्लीं जी भाषा बोलतों, ती प्रस्तुतच्या स्थितींतच आपणाला ईश्वराकडून मिळाली नसून, तिच्यांत आजपर्यंत अनेक सुधारणा, असंख्य फेरफार, आणि अकल्पित रूपान्तरें देखील झालेलीं आहेत. इतकेंच नव्हे तर, कित्येक प्रसंगीं तींत समाजाच्या इच्छेनुरूपच फेरबदल होतात, हें अगदीं सप्रमाण दाखवितां येईल.

ह्या संबंधानें लॉर्ड मॉनब्रोडोसारख्या बहुश्रुत गृहस्थाचा अभिप्राय फारच चमत्कारिक असल्याचें दिसतें. कारण, त्यानें एके ठिकाणीं[2] असें प्रतिपादन केलें आहे कीं, ईश्वरी साहाय्य व दैविक मध्यस्तीशिवाय, भाषेचा उद्गम होण्याला मार्गच नसून, ही मूळभाषा मिसर देशांतील असुरी

१ "Language is the creation of Society." ( Sayce's Introduction to the Science of Language. P. 75 ).

२ Ancient Metaphysics. ( vol. IV. P. 357. )

राजांनीं निर्माण केली. अर्थात्, ही समजूत सत्यापासून पुष्कळच दूर असावी असें वाटतें.

आतां, भाषा ही परमेश्वरानें आपल्याला दिलेली एक अपूर्व देणगी आहे, ही गोष्ट आम्हांलासुद्धां कबूल आहे. इतकेंच नव्हें तर, अन्य सुखोपभोगाच्या साधनांसंबंधानें जितक्या अंशानें त्या जगन्नियंत्याच्या कर्तृत्वशक्तीचे उपकार आम्ही स्मरून आहोंत, तितक्याच अंशानें भाषेच्या बाबतींतही आम्ही त्यांचे पूर्णपणें ऋणी आहोंत, ही गोष्ट आपणांला केव्हांही नाकबूल करवणार नाहीं. कारण, हाच तत्वविचार मनांत ठेवून सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें, तर त्या विश्वचालकाच्या इच्छेशिवाय, झाडाचें पानसुद्धां हालत नाहीं. फार तर काय सांगावें, पण, ह्या सृष्टींतील पंचमहाभूतें देखील त्याला भिऊन थरथरा कांपतात.

**भीषास्माद् वातः पवते । भीषोदयतिसूर्यः ।**
**भीषास्मादग्निश्चेन्द्रश्च । मृत्युर्धावतिपंचमइति ।**

( ब्रह्मोपनिषद् )

तेव्हां, ह्या गोष्टींवर नजर दिली, तर भाषेचा उद्गम ईश्वरप्रणितच आहे, असें म्हटल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. परंतु, इतक्या खोल पाण्यांत निष्कारण न शिरतां, भाषेच्या संबंधानें आपण व्यवहारदृष्ट्याच विचार करूं. ह्या दृष्टीनें पाहिलें, आणि भाषेच्या उत्क्रांतीस, किंवा तींत दृष्टीस पडत असलेली सुधारणा होण्यास, मनुष्य हा किती अंशानें

१ "I have supposed that language could not be invented without supernatural assistance, and, accordingly, I have maintained that it was the invention of the Daemon kings of Egypt." (Monboddo).

कारणीभूत झाला आहे याचा विचार केला, म्हणजे भाषा ही दैवी नसून, ती समाजघटितच आहे, असें म्हणणें प्राप्त येतें.

तसें मानण्यास कारणें.

कारण, आपले विचार एकमेकांस सुलभ रीतीनें प्रदर्शित करता यावेत एतदर्थ, जीं सांकेतिक चिन्हें मनुष्यानें ठरविलीं, अथवा परस्परांचे विचार आपापसांत कळण्यास ज्या वाक्संज्ञा त्यानें अमलांत आणिल्या, त्यांसच भाषा अशी संज्ञा असल्यामुळें, ती कृतक आहे, आणि अमानुषी नाहीं, हें उघडच सिद्ध होतें.

शिवाय, भाषाशास्त्र म्हणजे ह्या भूतलावर हल्लीं व्यवहारांत असलेल्या, किंवा पूर्वीं प्रचलित होत्या अशा-एकंदर भाषांचा इतिहासच मानावयाचा. अथवा, आशिया, यूरोप, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, आणि अमेरिका, या विशाल रंगभूमीवर जे भाषांचे एकावर एक असे अनेक पडदे पडत गेले, त्यांचें अवलोकनच समजावयाचें; अगर, उत्तर टोंकाकडील उत्तरकुरु[1], व दक्षिणेकडील सिंध्धी[2], आणि त्यांच्या दरम्यान राहणारे लोक, यांच्या भाषां-

---

१ ह्या उत्तरकुरूंस ग्रीस देशांतले लोक हायपरबोरियन्स म्हणत. ह्या ( Hyperboreans ) शब्दाचा अर्थ ' पर्वतापलीकडील ' असा होतो. ह्यांतील उत्तरार्ध ( Boros ) बोरॉस असून, तो ओरॉस ( oros ) पर्वत, या शब्दापासून झाला आहे; व हा शब्दही संस्कृत ' गिरि ' शब्दापासूनच बनला असल्याचें दिसतें. प्राचीन स्लॉव्हॉनिक भाषेंत ह्या शब्दाचें रूप ' गोरा ' असें झालें आहे.

२. हा शब्द संस्कृत ( इन्ध् = पेटविणें, या ) शब्दापासून झाला असावा, असें वाटतें. एथियोपियन् ( Ethiopean ) शब्दाचा

( पुढें चालू )

तील शब्दरत्नांचें इतिहासदृष्ट्या परीक्षणच होय, असेंही म्हटलें असतां बाध नाहीं.

अशा प्रकारची वस्तुस्थिति असल्यानें, भाषाशास्त्राची गणना पदार्थविज्ञानशास्त्रांत न करतां, ती ऐतीह्य किंवा इतिहास शास्त्रांतच करणें विशेष पद्धतशीर होईल, अशी माझी अल्प समजूत आहे.

भाषाशास्त्राची इतिहासशास्त्रांत गणना.

तथापि, प्रोफेसर मॉक्समुलर प्रभृति, या मताविरुद्ध आहेत. आणि डाक्तर व्हेवेल वगैरे जरी त्यांच्या अभिप्रायास अनुकूल नाहींत, तरी मॉक्समुलर[१] हे असे प्रतिपादन करतात कीं, भाषाशास्त्राचा समावेश पदार्थविज्ञान शास्त्रांतच झाला पाहिजे.

असो. ह्या भाषाशास्त्राचें सविस्तर निरूपण करावयास लागलें, म्हणजे ह्या भूतलावर एकंदर भाषा किती आहेत, व त्यांतही प्रमुखत्वानें कोणाची गणना होते, त्यांचें वर्गीकरण कसें करण्यांत येतें, इत्यादि संबंधाचे महत्वाचे प्रश्न एकामागून एक असे, सहजींच उत्पन्न होतात. सबब, त्या बाबतींत अवश्य ती तपशीलवार हकीकत आरंभींच देणें इष्ट वाटल्यावरून, प्रथमतः तिकडेच वळतों.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

उद्गम देखील ह्याच शब्दापासून आहे; एथिओपियन शब्दाचा धात्वर्थ ( एथिऑप्स, ऐथॉप्स, म्हणजे उग्राकृति होय; व तो शब्द 'ऐथीन्' aithein शब्दापासून झाला असून, त्याचा अर्थ ) पेटविणें, जाळणें, असा होतो. (कर्शियस् पहा.)

[१] Lectures on the science of Language. Vol. I P. P. 30-31. Lecture 2nd.

पृथिवीवरील एकंदर भाषा.

इ० स० १७८७ सालीं, रूस देशांतील कॅथराईन् नांवाच्या महाराणीनें स्वतः परिश्रम घेऊन, आणि आपल्या विस्तीर्ण राज्यांतील सुभेदारांकडून, व ठिकठिकाणच्या राजकीय वकीलांस पत्रें लिहून, ह्या भूतलावरील एकंदर भाषांसंबंधीं पुष्कळ माहिती मिळविली. इतकेंच नव्हें तर, ह्या उपलब्ध झालेल्या माहितीवरून, तिनें एक कोशही तयार करविला. पुढें, इ० स० १७९०–९१ सालीं, विल्हेवारीप्रमाणें त्यांतील शब्द लावून, त्याचे एकंदर चार भाग केले, आणि सदरहू कोशाची दुसरी आवृत्ति छापिली. त्यावरून असें कळून येतें कीं, चाऱ्ही खंडां-मिळून, ह्या पृथिवीवर एकंदर (२८०) दोनशे ऐंशी भाषा आहेत. ह्यापैकीं, १८९ आशिया खंडांतील असून, ९२ युरोपखंडांतल्या, २८ आफ्रिकेंतल्या, व १९ अमेरिकाखंडांतील होतें. तथापि, ह्या गोष्टीला आज सुमारें शंभर वर्षांवर होऊन गेलीं असल्यामुळें, ह्या मुदतींत कांहीं अन्य भाषांचा शोध लागला जाऊन, कित्येक नूतन भाषांचीही त्यांत भर पडली असावी, असें वाटतें; आणि तसें होणें देखील अगदीं साहजीक आहे.

आतां, हा कोश जरी पुष्कळ उपयुक्त, व बऱ्याच अंशानें महत्वाचा आहे, तथापि, त्यांत एकंदर भाषांची वर्गवारी पद्धतशीर रीतीनें, किंवा शास्त्रीय दृष्ट्या, केलेली

---

१ बादशाही कोश. *Glossarium Comparativum Linguarum totius Orbis*, Petersburg, 1787, पहा.

२ हर्वॉस्च्या भाषासंग्रहावरून, एकंदर तिनश्यांवर ह्या भूतलावरील भाषा असल्याचें होतें. (१–६३).

असल्याचें दिसत नाहीं. इतकेंच नव्हें तर, उपलब्ध झालेल्या भाषांचें विवेचन सशास्त्र व्हावें, एतदर्थ प्रयत्न केल्याचें सुद्धां भासत नाहीं. कारण, त्यांत भाषांची वर्गवारी भूविषयक केली असून, त्या आशियांतील, यूरोपांतील, आफ्रिकेंतील, अमेरिकेंतील, आणि सामुद्रिक किंवा द्वीपसमुहांतील, अशा योजिलेल्या आहेत. त्यामुळें, त्याचा व्हावा तितका उपयोग होत नाहीं. परंतु, असें आहे तरी, कोणकोणत्या भाषांत कशा प्रकारचें साम्य आहे, हें कळण्यास त्याची प्रथमारंभीं विशेष मदत झाली, हें कोणालाही कबूल केलें पाहिजे.

त्यांचें वर्गीकरण.

असो. ह्या सर्व भाषांचें सूक्ष्म अवलोकन केल्यानें, असें दिसून येतें कीं, ह्यांपैकीं कित्येकांतील शब्दांत, किंवा विभक्तींच्या प्रत्ययांत, अथवा क्रियापदांच्या रूपांत, फारच निकट साम्य आहे. कित्येकांत हें सादृश्य म्हणण्यासारखें नसून, क्वचित् तें बिलकुल दृग्गोचरही होत नाहीं. आणि कांहींची रचना खरोखर अगदींच भिन्न आहे. तेव्हां, ह्या सर्व गोष्टी मनांत आणून, आपण ह्या अगाध भाषारत्नाकरांत बुडी मारिली, अगर ह्या विचित्र वागुदधीचें शास्त्रोक्त पद्धतीनें यथान्याय मंथन केलें, तर आपणांस असें निःसंशय कळून येईल कीं, कांहीं भाषांचें संस्कृताशीं अत्यन्त साम्य आहे. सबब, त्यांचा समावेश आर्य कुटुंबांतच झाला पाहिजे; कारण, संस्कृत ही आर्य कुटुंबांतील सर्व शाखांची आदिजननी होय.[1]

१ संस्कृतभाषेकडे मातृपदाचा बहुमान कोणत्या कारणांनीं येतो, याबद्दलचा साद्यन्त ऊहापोह आणि तपशिलवार हकीगत, आम्ही

(पुढें चालू)

तसेंच कित्येक भाषा ह्या मायभाषेशीं मिळत्या नसून, त्या शेमी[2] कुलाशीं साम्य पावतात; आणि म्हणूनच त्यांस शमी वर्गांत घालणें प्राप्त येतें. आतां, ह्याखेरीज ज्या दुसऱ्या बऱ्याच भाषा राहिल्या, त्यांची रचना वरील दोन्ही वर्गांतील भाषांहूनही अगदींच भिन्न असल्यानें, व त्या तुराणी कुलाशीं विशेष सादृश्य पावल्यानें, त्यांची योजना तुराणी भाषेंतच करावी लागते.

त्यांचीं तीन कुटुंबें.

सदरहू विवेचनावरून, ह्या भूतलावरील एकंदर भाषांचीं मुख्यत्वेंकरून तीनच कुटुंबें दिसत असून, तीं १ आर्य, २ शमी, आणि ३ तुराणी, ह्या नामधेयांनीं सुप्रसिद्ध आहेत. तथापि, ह्या प्रत्येकाच्या अनेक शाखा व पोटभेदही आहेत. सबब, त्यांचा तपशील, वाचकांच्या सोईसाठीं, येथें देतों.

आर्य किंवा संस्कृताच्या शाखा.

**१ आर्य** ( म्हणजे **वैदिक संस्कृत** ) **मायभाषेच्या** खालीं लिहिलेल्या शाखा आहेत.

१ **भारतीय** किंवा **हिन्दी.**
२ **इराणी.**
३ **ग्रीक** अथवा **हेलेनिक्.**
४ **ल्याटिन्** किंवा **इतालिक.**
५ **ट्युटॉनिक्.**

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

चालू पुस्तकाच्या तिसऱ्या भागांत, व **भा**रतीय साम्राज्य पुस्तक नववें, यांत दिली आहे. सबब त्याजवर वाचकांनीं कृपा करून आपलें लक्ष्य पुरवावें. ( ग्रंथकर्ता. )

२. सेमिटिक. ( Semitic. )

**६ स्लॅव्हॉनिक् अथवा विंडिक् आणि**
**७ सेल्टिक्.**

आतां, **संस्कृत माय**भाषेच्या ज्या मुख्य शाखा सदरीं नमुद केल्या, त्यांचेही अनेक पोटभेद असून, ते फार महत्वाचे आहेत. सबब, विषयविवेचनाच्या सोईसाठीं, व वाचकास इतल्ला पाहण्यास स्वल्प पडावें म्हणून, त्यांचीच अवश्य ती हकीकत प्रथमतः देतों.

भारतीय किंवा हिंदी शाखेचे पोटभेद.

१ **भार**तीय किंवा **हि**न्दी शाखेचे १ **पा**ळी आणि २ **प्रा**कृत असे दोन पोटभेद आहेत. ह्यापैकीं, **पा**ळी हल्लीं प्रचारांत नसून ती **मृ**त भाषा झाली आहे. **प्रा**कृताचे मात्र १ **शौ**रसेनी, २ **गौ**डी, ३ **ला**टी, ४ **पै**शाची, ५ **आ**वन्ती, ६ **माग**धी, ७ **अर्ध माग**धी, ८ **प्रा**ची, ९ **म**हाराष्ट्री, १० **द्रा**विडी, व ११ **बा**ल्हीकी, असे मुख्य अकरा प्रकार असून, ह्याशिवाय आणखीही प्रांतिक भेद पुष्कळच आहेत. ह्यापैकीं, **म**हाराष्ट्री आणि **द्रा**विडी[1] खेरीज करून, बाकीच्या बहुतेक मृत भाषा होऊन, त्यांच्या ऐवजी **हि**न्दुस्थानी, **बं**गाली, **पं**जाबी, **गु**जराथी, **ऊ**रीय, **ऊ**र्दू, **सि**न्धी, **प**हाडी, **आ**सामी, **मा**रवाडी, **क**च्छी, **ह**ळवी, **का**श्मीरी, **गो**वाणी, इत्यादि अनेक भाषा उद्‌भवल्या आहेत.

आतां, सर्व **आर्य** भाषांचें मूळ **संस्कृत**च असल्या-

---

१ **द्रा**विडी भाषेचा समावेश कित्येक **पा**श्चात्यांनीं **तु**राणी वर्गांत केला आहे. ( **भा**रतीय साम्राज्य. उत्तरार्ध. पु० ९ वें. भाग ५५-५६. पान १५१-१५२ व २१५ ते २२५ पहा. )

विषयीं, आम्ही पूर्वी सांगितलें असून, ती गोष्ट भारतीय साम्राज्य पुस्तक नववें, यांत सिद्ध करूनही दाखविली आहे. मात्र, हें मूळ वैदिक संस्कृत होय, ही गोष्ट आम्हांला सुद्धां कबूल आहे. आणि तसें सदरहू ग्रंथांत आम्हीं सप्रमाण दाखविलें पण आहे.

तथापि, मॉक्समुलर प्रभृति, हे संस्कृतला मातृपदाचा बहुमान देण्याचें, किंवा तिला मायभाषा समजण्याचें, नाकारतात. मात्र, वरील सर्व भाषांची ती वडिल[१] बहिण आहे, इतकें तरी निदान कबूल केल्याशिवाय गत्यन्तरच नाहीं, असें त्यांस वाटून, त्यांनीं फक्त तितकीच गोष्ट मान्य केल्यासारखी दिसते. इतकेंच नव्हें तर, सर्व[२] भाषांचे अग्रणीत्व संस्कृतलाच दिलें पाहिजे, व भाषाशास्त्राची प्रगति संस्कृताशिवाय झालीच नसती, अशा संबंधाच्या प्रतिपादनांत देखील त्यांजला केवळ मानच डोलवावी लागते.

अशा प्रकारची संस्कृत भाषेची थोरवी व तिचें पौराणत्व सर्व विद्वज्जनास मान्य असतांही, कित्येक कुत्सित लो-

---

१ " Sanskrit, as we saw before, could not be called their *parent*, but only their *elder* Sister. "

( Max Muller's Lectures. Science of Language. vol. I. P. 194. )

२ " And it has been truly said that Sanskrit is to the Science of language what mathematic's are to astronomy. "

ह्याच्याच पुढें अन्य विषयक विवेचन करतांना, मॉक्समुलरनें संस्कृताला सर्वभाषांची राज्ञी असें उपपद दिलें आहे; आणि ते तिला " *Language* of *Languages* " म्हणतात.

( Max Muller's Lectures. Sc. of L. P. 229. vol. I. )

कांनीं तिच्या पुरातनत्वाविषयीं नसता कुतर्क काढून, ती पुराणतम आहे हें सप्रमाण दाखविण्याबद्दल देखील, त्यांची एक अप्रत्यक्ष तऱ्हेची सूचना आहे. किंबहुना, ती बनावट किंवा ब्राह्मणांची कूटरचना[2] नाहीं, हें शाबीद करून देण्याबद्दल, त्यांनीं केवळ आग्रहच धरला आहे, असें म्हटलें असतां सुद्धां चालेल. परंतु, हा त्यांचा भ्रम नाहींसा करणें बिलकुल कठिण नसून, फारच सोपें आहे. कारण, हातच्या कांकणाला आरशाची अगदींच जरूरी नाहीं. एवढेंच नव्हें तर, अशा प्रकारच्या भ्रान्तिपटलांनीं सत्यसूर्याचें तेज कमी न होतां, हें अज्ञानघन वितुळतां-क्षणींच, त्याची चकाकी आपोआपच ज्यास्त मारूं लागते

सर्व आर्य भाषांचें मूळ संस्कृत ( अर्थात् वैदिक संस्कृत ) असल्याचें आम्ही पूर्वींच[3] सिद्ध करून दाखविलें आहे; व त्यावरून; इराणी, ग्रीक, ल्यॅटिन्, सेल्टिक,

---

१ ह्यासंबंधानें **मॉक्समुलर** म्हणतो:—

" I have frequently been asked, ' But how can you prove that Sanskrit literature is so old as it is supposed to be ? How can you fix any Indian dates before the time of Alexander's conquest ? What dependance can be placed on Sanskrit manuscripts which may have been forged cr interpolated ? " ( Max Muller's Lectuies. Science of Language. vol. I. P. 229. )

२ संस्कृत हें **ब्राह्मणांची** कूटरचना असल्याविषयीं, **ड्यूगल्ड-स्टुअर्टनें** तर शिक्के मोर्तबच ठोकिलें आहे.

( Conjectures Concerning the origin of Sanskrit. Dugald stewart's Works. vol. III P. 72. )

३ भारतीय साम्राज्य उ० पु० ९ वें पहा.

टयुटॉनिक, स्लॅव्हॉनिक, इत्यादि भाषांपेक्षां भारतीय पुराणतर आहे, हें निर्विवाद होत आहे. दाखविली कुटुंबांतील हीब्र्यू भाषेला देखील कित्येक पाश्चात्य आम्हां-प्राचीन समजतात. परंतु, ती सुद्धां संस्कृत आम्हीं ऋणीच असल्याबद्दल, संस्कृतांतले जे कित्येक झालेले शब्द तिच्यांत दृग्गोचर होतात, त्यावरून ह्याचा व्यक्त होतें. चें,

वल्गुक हा शब्द संस्कृत असून, त्याचा चन्दन असा होतो. हें चन्दन भरतखंडाशिवाय अन्य कोठेंही मिळत नाहीं. अर्थात्, तें भरतखंडाच्या किना-ऱ्यावर मलबार वगैरे ठिकाणीं उपलब्ध होत असल्यामुळें, ज्यू आणि फिनिशियन लोक भरतखंडाशीं चन्दनाचा व्यापार करीत, व आभीर लोकांच्या प्रांतांतून सोनें,

१ आभीर लोकांचा देश तोच पाश्चात्यांचा ऑफीर (Ophir) प्रांत होय. ह्यासंबंधानें मॉक्समुलर म्हणतो,

"*Sandal-wood*, as pointed out before, *is peculiar to India*, and *so*, according to Mr. Twisleton's remark, *is the peacock.*" १ (Sir Henry. Elliot's Supplementary Glossary. s. v. Aheer.)

"In this very locality (Central and Southern India), Ptolemy (VII. 1) gives us the name of *Ábiria*, above Pattalena. In the same locality, Hindu Geographers place the people called *Abhira* or, *Abhira*; and in the same neighbourhood, Mac Murdo, in his account of the province of Cutch still knows a race of *Ahirs*, the descendants, in all probability of the people who sold to Hiram and Solomon their gold and precious stones, their apes

(पुढें चालू)

कांनीं तिच्या ,ानर ( कपि, ) मोर ( शिखी, मयूर, ) ती पुराणतम ःदन्त ), इत्यादि पदार्थ सिन्धु नदीवरील त्यांची एक ,रबस्थानांतील इझिअन-गिबर नामक बंद- ती बनावट चन्दन, वानर, मोर, आणि हस्तिदन्त, ह्या करून देंाब्यू भाषेंत मुळींच नांवें नसल्याकारणानें, व असें म्हू त्यांच्या दृष्टीस भरतखंडांतच प्रथमतः पडल्यामुळें, नाहींस संस्कृत नामधेयांनींच ओळखीत आणि हाक कारत. अर्थात्, परकीयांच्या उच्चारांत, ह्या संस्कृत नाब्दांचा पुष्कळच अपभ्रंश होत गेला, हें खालील विवे- चनावरून वाचकांच्या ध्यानांत सहजीं येईल.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

peacocks, and Sandal wood." "The arguments brought forward by Quatremere, in his *Memoire Sur le Paeys d' Ophir*, against fixing Ophir on the Indian Coast, are not conclusive. The arguments derived from the names of the articles exported from Ophir, were unknown to him. It is necessary to mention this, because Quatremere's name deservedly carries great weight, and his essay on Ophir has lately been republished in the *Bibliotheque classique des cele brites contempo roines*. 1861. The identification of Ophir with some place in India is not a modern conjecture, The Vulgate translates Job XXVIII; 16. It cannot be valued with the gold of Ophir, ' (Sophir, LXX), by Non confereturtinctis Indiac coloribus.' In-Coptic, *Sofir* is the name for India, the same word by which the LXX translated the Hebiew Ophir."

( Max Muller's Lectures. Sc. of L.
vol. I. P. 234-235. )

वल्गुक शब्दाचा हीब्र्यूंत आल्गम ( Algum ), व जुन्या करारांत एके ठिकाणीं आल्मग ( Almug ), असा अपभ्रंश झाल्याचें आढळतें. ह्या वल्गुक शब्दाचा अर्थ पूर्वीं सांगितल्याप्रमाणें चन्दन होय. संस्कृतांतला कपि शब्द वानरवाचक असून, त्याचेंच हीब्र्यूंत कॉफ (Koph) असें रूपान्तर झालें आहे. अर्थात, हा शब्द हीब्र्यूंत नाहीं, व त्यामुळें, ह्या भाषेंत त्याची शब्दव्युत्पत्ति होणें देखील बिलकुल शक्य नाहीं. संस्कृतांत मोर शब्दाचाच शिखिन् अथवा शिखी हा पर्याय शब्द होय, आणि त्याचाच हीब्र्यूंत तुखि-इम असा अपभ्रंश झाल्याचें आढळून येतें. ह्याचप्रमाणें, हस्तिदन्ताचें देखील झालें आहे. हस्तिदन्त म्हणजे हत्तीचा प्रत्यक्ष दांतच होय. आतां, दांताला हीब्र्यूंत शेन (Shen) म्हणतात, व हत्तील संस्कृतांत इभ हा पर्याय शब्द आहे. तेव्हां, उघडच, ह्या उत्तरार्धाचेंच हीब्र्यू भाषेंत हबिम असें रूपान्तर होऊन, शेन = हबिम असा हस्तिदन्त वाचक शब्द बनला.

अशाच मासल्याचे दुसरेही कित्येक शब्द आहेत, व त्यावरून, शमी भाषांत फार पुरातन म्हणून मानलेली जी हीब्र्यू भाषा, ती सुद्धां संस्कृतची पूर्णपणें ऋणी असल्याचें वाचकांच्या ध्यानांत येईल.

ह्यासंबंधानें, मॉक्समुलरनें एके ठिकाणीं फारच जोरदार लेख लिहिलेला असून, तो निःसंशय वाचण्यासारखा आहे. सबब, त्यांतील अवश्य तें अवतरण वाचकांच्या सोईसाठीं येथें देतों. तो म्हणतो,

It is not necessary however, to discuss, here, all the controverted points of this question; for even if Ophir should be proved to be in Arabia, the *names* for *apes and peacocks, would still point to Sanskrit,* and could have been brought to Ophir from *no other country but India. These names* as found in the Old Testament, *are by all competent Hebrew Scholars admitted not to be of Semitic growth.* They are *foreign words* in Hebrew, and they do not receive any light either from the dialects of Arabia, including the Hemiyaritic inscriptions, or from the languages spoken on the Mozambique Coast of Africa, where according to some authorities, Ophir was situated. *Some of these names* have been traced *back to Sanskrit* and *to the languages spoken on the Malabar Coast of the Dekhan;* and though it must be admitted that as foreign words they have suffered considerable corruption in the mouths of ignorant sailors, yet, allowing the same latitude of phonetic change, it has been impossible to trace them back to any other family of speech' If, therefore, there could seem to exist any stringent evidence that Ophir was a mere *entrepót*, not in India but in Arabia, the *spreading of Sanskrit names* to Arabia *before they reached* Palestine *would only serve to incaease the antiquity of Sanskrit,* as spoken in these parts of India from whence alone the natural products of her language and of her soil could have been exported. And if we consider that there is no other language which can claim these names as her own—that there is no country in which all the articles brought by the fleet of Ezion-geber, whether frcm Ophir, or elsewhere, are indeginous—that sandal-wood,

and peacocks could in ancient times have been exported to Palestine from India only; if to these remarkable coincidences all pointing to India, is added the fact pointed out by Lassen, that the names of *Cotton*, *nard*, and *bdellium*, *have likewise found their way from Sanskrit into Hebrew*, we shall, I think, feel inclined to *admit*, with Lassen and Ritter and others, a very early commercial intercourse between India and Palestine, whatever opinion we may hold on the exact position of Ophir."

( Max Muller,s Lectures. Sc. of L. Note.
P. P. 236-237. vol. I. )

आतां आभीर (ऑफीर = Ophir) प्रांताशीं अशा प्रकारचा व ह्या जिनसांचा व्यापार, सॉलोमन्[1]च्या वेळीं आणि त्यापूर्वीं देखील अगदीं ज्यारीनें चालत असे. सॉलोमन् हा प्राचीनकाळच्या पौराणिक युगांतील इस्रायल लोकांचा राजा व डेव्हिडचा मुलगा असल्याविषयीं, बायबलांत एक कथानक आहे. अर्थात्, हीब्र्यू भाषेनें संस्कृतचें घेतलेलें ऋण पाश्चात्यांच्या समजुतीप्रमाणें देखील, निदान ह्याच वेळचें, किंबहुना ह्याच्याही पूर्वींचें होतें. त्यामुळें, संस्कृतभाषा हीब्र्यू भाषेपेक्षां पुराणतर होय, यांत शंकाच नाहीं. इतकेंच नव्हे तर, ह्या वेळीं संस्कृत ही

१ हा ईश्वराचा लाडका असून, त्याची पाश्चात्य मताप्रमाणें शहाण्यांत गणना आहे. एके समयीं, ईश्वर त्याला प्रसन्न झाला, व त्यानें त्यास वर मागावयास सांगितलें. तेव्हां, त्यानें फक्त ज्ञानच मागितल्यावरून, ईश्वराला मोठा आनंद वाटला, आणि त्यानें त्यास ज्ञानासमवेतच मान व संपत्ति पण दिली.

भरतखंडांतील केवळ व्यवहारिक भाषाच होती. तेव्हां, तिचें व्यवहारिकत्व प्रतिष्ठापित होऊन, ती प्रचलित भाषा होण्याला अनेक शतकें लोटलीं पाहिजेत, हें उघड आहे. आणि म्हणूनच, पौराणत्वाच्या संबंधानें ती हीब्र्यूला देखील मागें सारते, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. किंबहुना, संस्कृताच्या पौराणत्वाची शंका घेणारास हें प्रमाण केवळ निरुत्तर करण्यासारखेंच आहे, असें म्हटलें असतांही चालेल.

तथापि, आपण आणखीही अन्य प्रमाण पाहूं, आणि संस्कृत भाषेच्या प्राचीनत्वासंबंधीं अवश्य तो ज्यास्त तपास करूं. मिसरदेश, आसीरिया, सीरिया, बॉबिलन्, चाल्डिया, इराण, इत्यादि देशांत शराकृति लिपींत लिहिलेले पौराणिक शिलालेख अजूनही सांपडतात. हे लेख फार पुराण असल्याविषयीं शोधकांचें मत आहे; व झन्द भाषा यांच्याहीपेक्षां पुराणतर असल्याचें[1] पाश्चात्य विद्वान देखील प्रतिपादन करतात.

झेन्द[2] अविष्टा नांवाचा पारसीकांचा केवळ सर्वमान्य व

---

१ ह्या बाबतींत मॉक्समुलरनें असें लिहिलें आहे कीं,

" It must suffice if we have proved, that he ( Zoraaster ) lived, and that *his language, the Zend, is a real language*, and *anterior in time to the language of the cuneiform inscriptions.*"

( Max Muller's Lectures. Sc. of L.
vol I. P. 249. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

२ झन्द हा छन्द शब्दाचा अपभ्रंश आहे, व अविष्टा शब्द अवस्था शब्दाचें रूपान्तर होय. अर्थात्, छन्द अवस्थेंत असणाऱ्या ग्रंथास झन्दअविष्टा अशी संज्ञा पडल्याचें दिसतें.

पवित्र धर्मग्रंथच होय; आणि हा झन्द भाषेंत आहे. आमच्या आर्यहिंदूंस ज्याप्रमाणें वेद हे सर्व प्रकारें प्रमाण ग्रंथ आहेत, त्याचप्रमाणें झन्दअविष्टा हे पारसीकांस होत. ह्यांतील बराच भाग झरथुष्ट्रानें केलेला असून, त्याला गाथा[1] अशी संज्ञा आहे; व झरथुष्ट्र हा पार्शी लोकांचा धर्मगुरु असल्याबद्दल सर्वांसच महशूर आहे. झरथुष्ट्राचा काल अजूनही निश्चित नाहीं. तथापि, तो इ० स० पूर्वी दोन तीन हजार वर्षांपलीकडील कालांत उदयास आला असल्याचें दिसतें. किंबहुना, धर्मगुरु म्हणून, झरथुष्ट्र नांवाचा हा पहिलाच पुरुष होय, आणि ह्याला पुण्यश्लोक समजूनच ह्याचें नामधेय अन्य राजपुत्रांनीं कालान्तरानें धारण केलें असावें, अशी कल्पना होते. बॅाबिलन येथील मीड घराण्यांतील पहिल्या राजाचें नांव झरथुष्ट्र असल्याचें कळतें, व तो इ० स० पूर्वी २२३४ वर्षांच्याही अगोदर होऊन गेला, असें वर्णन[2] आहे.

---

१ डा. हौ म्हणतो,

"The portion compared with the whole bulk of the whole fragments is very small; but by the difference of dialect it is easily recognized. The most important pieces written in this peculiar dialect are called Gathas or songs, arranged in five small collections; they have different metres, which mostly agree with those of the Veda; their language is very near to the Vedic dialect."

(इ० स० १८६१ सालीं, डा. हौनें पुणें येथें दिलेलें व्याख्यान पहा.)

२ "Berosus, as preserved in the Armenian translation of Eusebius, mentions a Median dynasty

( पुढें चालू )

याप्रमाणें, झरथुष्ट्राचा काल, व त्यानें केलेल्या गाथा ( म्हणजे अर्थात् झन्दअविष्टा ), हीं फार पुरातन असल्याचें वाचकांच्या ध्यानांत येईल. एवढेंच नव्हे तर, झन्दभाषा वैदिक भाषेपासूनच उदभवली असल्यामुळें, ती उघडच हिच्या नंतरची असून, वैदिकभाषा तिच्याहीपेक्षां विशेष प्राचीनतर[1] समजावयाची, हेंही त्यांच्या लक्षांत येऊन चुकेल.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

of Babylon, beginning with a king Zoroaster, long before Ninus; his date would be 2234 B. C.

Xanthus, the Lydian ( 470 B. C. ), as quoted by Diogenes Lacrtius, places Zoroaster, the prophet, 600 ( years ) before the Trojan war ( 1800 B. C. ).

Aristotle and Eudoxus, according to Pliny ( Hist. Nat. XXX. I ), placed Zoroaster 6000 ( years ) before Plato; Hermippus 5000 ( years ) before the Trojan war.

Pliny ( Hist, Nat. XXX 2. ) places Zoroaster several thousand years before Moses the Judæan who founded another kind of Magela.

१ झन्द भाषेपेक्षां वेदकालीन संस्कृत पुराणतर असल्याची गोष्ट, मॉक्समुलरलासुद्धां कबूल आहे. कारण, त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं,

" But what is the meaning of *Ahuro Mazdao?* Here Zend does not give us an answer; *but we must look to Sanskrit as the more primitive language* ( *than Zend* ), just as we looked from French to Italian, in order to discover the original form and meaning of *face.* "

( Māx Muller's Lectures. Se. of L. vol. I P. 241. )

अर्थात्, ती ब्राह्मणांची कूटरचना नव्हे; अथवा, त्यांनीं तिच्यांत कोणतेही बनावट लेख, केव्हां देखील लिहिलेले नाहींत; अशी आतां तरी पाश्चात्यांची खात्री होईल, एवढी आम्ही आशा करितों.

२. इराणींत, झन्द व पह्लवी यांचा समावेश होत असून, ह्या दोन्ही भाषा हल्लीं प्रचारांत नाहींत. तथापि, ह्यांच्या ऐवजीं, फारशी, अफगाणी, बलुची, पखतु अथवा पुष्टु[1], कॉकेसस्मधली ऑसेशियर, कुर्दिस्थानी, आणि आर्मीनियन् भाषा व त्यांचे पोटभेद, इत्यादि व्यवहारांत आहेत, व ते इराण[2], अफगाणिस्थान, बलुचिस्थान, आर्मीनिया, इत्यादि देशांतले लोक बोलतात.

इराणीचे पोटभेद.

झन्द शब्द हा संस्कृत छन्दस् शब्दाचा अपभ्रंश असल्याविषयीं आम्ही पूर्वींच सांगितलें असून, झन्द भाषेच्या संबंधानें देखील आम्हीं अवश्य तें दिगदर्शन केलें आहे. सबब, आतां पह्लवी भाषेकडे आपण क्षणभर वळूं, आणि तिच्याबद्दलची अवश्य ती हकीकत येथें देऊं.

पह्लवी भाषा.

ह्या भाषेच्यासंबंधानें, अनेक विद्वानांचे नाना तऱ्हेचे

---

१ पुष्टु व भरतखंडांतील भाषा, यांच्यांत विशेष साम्य असल्याविषयीं ट्रूम्पनें सप्रमाण दाखविलें आहे.

( Journal. German Oriental Society. vols. XXI. XXII. Trumpp's Grammar of Pushtu. 1873. )

२ बोखारी भाषा इराणीचा पोटभेदच असल्याविषयीं मॉक्समुलरचें मत आहे.

तत्संबंधीं मतभेद, व हौचें मत.

अभिप्राय आहेत, व त्याच कारणानें त्यांच्यांत मतैक्य झाल्याचें दिसत नाहीं. ह्या भाषेंत इराणी शब्दांचा थोडाबहुत भरणा आहे. तथापि, ती भाषा शमी कुटुंबांतलीच असल्याविषयीं, डाक्तर हौचें[1] ह्मणणें आहे.

इतरांचें मत.

दुसऱ्या कित्येकांचें असें मत आहे कीं, पह्लवी ही झन्द भाषेचीच शाखा असून, ती इराणी व खाल्डिया यांच्या सरहद्दीवर इ० स० च्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांत उद्‌भवली. मात्र, तिच्यांत शमी शब्दांचा पुष्कळ भरणा आहे, ही गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे. तथापि, तिची व्याकरणरचना केवळ इराणी अथवा झन्द भाषेप्रमाणेंच आहे, यांत तिळमात्र सुद्धां संशय नाहीं.

अविष्टा, झन्द, व अविष्टा झन्द, यांतील भेद.

यासंबंधानें, वृद्ध व माहितगार पारशी लोकांत तपास केल्यांत, खरा प्रकार असा दिसून येतों कीं, त्यांच्या वेदांतील मूळ ग्रंथास, ह्मणजे पवित्र धर्म ग्रंथाच्या मूळसंहितेस, ते अविष्टा असें नांव देतात; आणि व्याख्यान रूपी लेख, किंवा टीका, अथवा भाषान्तरें, यांस ते झन्द[2] म्हणतात. मात्र, मूळसंहिता व टीका यांचा देखील उद्‌बोध होऊन एकंदर सर्व ग्रंथाचा समास व्हावा, असा जेव्हां हेतु असेल, तेव्हां सदरहू दोन्ही पदांचा निरनिराळा उपयोग न करतां, अविष्टाझन्द या जोड शब्दांचीच योजना

[1] Introduction to *Pahlavi* Pazand Glossary. P. P. 138-242.

[2] See also *Bundahis.* Introduction. By West.

करणें अवश्य आहे. हे टीकात्मक ग्रंथ, किंवा व्याख्या-रूपी लेख, अगर तद्विषयक भाषान्तरें, हीं बहुत करून पह्लवींत असतात. तथापि, क्वचित तीं प्राचीन आविष्टा भाषेंत देखील लिहिलेलीं असतील; आणि त्यामुळें, त्यांचा समावेश मूळ ग्रंथांत होऊन, तीं केवळ संहिताच बनलीं, असें वाटतें.

पह्लवी भाषेचें व्यावहारिकत्व.

सामान्यतः, मध्ययुगांत प्रचारांत असलेल्या इराणी भाषेस पह्लवी ही संज्ञा आहे; व इसवी सनापूर्वी तिसऱ्या शतकांतील नाण्यांवर, कित्येक पौराणिक कथानकें ह्याच भाषेंत लिहिल्याचें आढळून येतें. तथापि, पह्लवी भाषेंतील महत्वाचे दस्तैवज म्हटलें म्हणजे, आरदेसर राजाच्या कारकीर्दीतील शिलालेख होत. हा राजा सासेनियन घराण्यांतला मूळपुरुष होता, व ह्यानें इ. स. २२६ पासून २४० पर्यंत राज्य केलें. पह्लवी भाषा इ. स. ९०० पर्यंत व्यावहारिक होती. त्यामुळें, ह्या कालानन्तरचे लेख बहुतकरून कूटरचना असण्याचा संभव आहे.

पह्लवी भाषेंत अन्य शब्द.

पह्लवी भाषेचें नांव पार्थराजांच्या कारकीर्दीत तिला प्राप्त झालें, अशी कित्येकांची समजूत आहे. परंतु, ह्या म्हणण्याला कांहीं विशेष बलवत्तर प्रमाण असल्याचें दिसून येत नाहीं. मात्र, इतकी गोष्ट खरी आहे कीं, ह्यांच्या वेळींच कित्येक शमीशब्द पह्लवी भाषेंत घुसले. हे शमीशब्द सुमोरें ४०० असून, पुरातन इराणींतले, म्हणजे झन्द भाषेंतले शब्द अदमासें १०० आहेत. ह्या पांचशें शब्दांस पह्लवींत

हुझवारिश अशी संज्ञा आहे, आणि तदितरांस **पाझन्द** म्हणतात. हुझवारिश म्हणजे व्यवहारातीत, व **पाझन्द** म्हणजे अर्थव्यंजक होय.

फारशी भाषा.

जेव्हां इराणी भाषा **आरबी** हारफांत (वर्णांत) लिहिण्यांत येते, तेव्हां ती **फारसी** हें अभिधान पावते. ह्याच भाषेंत, **फिरदूसी** नामक **फारशी** कवीचें **शहानामा** नांवाचें, इ. स. १००० शतकांतलें सुप्रसिद्ध काव्य आहे; आणि ह्यांत **आरबी** शब्दांचा भरणा पुष्कळच कमी आहे. तथापि, मुसलमानी अमलाखालींच इराण गेल्यानें, **फारसी** भाषेंत आरबी शब्द दिवसानुदिवस ज्यास्त प्रमाणानें आपला शिरकाव करीत चालले, ही गोष्ट विसरतां कामा नये.

ग्रीक भाषेचे पोटभेद.

३. **ग्रीक** अथवा हेलेनिक ही मृतभाषाच आहे; आणि डॉरिक, इऑलिक, आयोनिक, व ॲटिक्, अशा ज्या तिच्या प्राचीन काळच्या शाखा असत, त्या देखील सांप्रत व्यवहारांत नाहींत. मात्र, तिचे प्रस्तुत काळीं अन्य पोटभेद होऊन, ते हल्लीं **ग्रीस** देशांत प्रचारांत आहेत.

ल्याटिन भाषेचे पोटभेद.

४. **ल्याटिन** किंवा इतालिक ही देखील मृतभाषाच होय. हिच्या ऑस्कन् आणि अंब्रियन् अशा प्राक्कालीन शाखा असत. परंतु, त्यासुद्धां हल्लीं प्रचारातीतच आहेत. तथापि, ह्या भाषेपासून अनेक पोटभेद झाले आहेत; व ते इटली, **फ्रान्स**, **प्रोव्हेन्स**, **स्पेन**, आणि **पोर्चुगल**, या देशांत फैलावले असून, ते त्या त्या देशांतील लोक बोलतात.

टयुटॉनिक शाखेचे पोटभेद.

५. टयुटॉनिक् शाखेचे उच्चजर्मन, नीचजर्मन, व स्कांदिनेव्हियन्, असे पोटभेद आहेत. ह्या पोटभेदांत, मध्योच्च जर्मन्, पुराणोच्चजर्मन्, गॉथिक्, आंग्लो-साक्सन्, पुराण डच, पुराण फ्रीशियन्, पुराण साक्सन्, आणि पुराण नॉर्स, असे अनेक प्रकार पूर्वी असत. परंतु ते सर्व हल्लीं अप्रचलित असून, त्यांच्या ऐवजी भिन्न भिन्न भाषांचा उद्गम झाला आहे; व त्या जर्मनी, इंग्लंड, हॉलंड, फ्रिज्लंड, डेन्मार्क, स्वीडन्, नॉर्वे, आणि आईसलंड, येथें प्रचारांत आहेत.

स्लॉव्हॉनिक् शाखेचे पोटभेद.

६. स्लॉव्हॉनिक अथवा विंडिक् शाखेला लेटिक् अशी देखील संज्ञा आहे. हिचे पुराण प्रशियन्, पुरोहित-स्लॉव्हॉनिक्, पुराण बोहीमियन्, व पॉलेबियन्, असे जे प्रकार पूर्वी प्रचारांत असत, ते हल्लीं व्यवहारातीत होऊन, त्या ऐवजीं अन्य भाषा उत्पन्न झाल्या आहेत; आणि त्या लिथुआनिया, कूर्लंड, लिव्होनिया, बल्गेरिया, रशिया, (म्हणजे छोटा, बडा, व श्वेत रशिया), इलीरिया, पोलंड, बोहीमिया, लुसेशिया, इत्यादि ठिकाणचे लोक बोलतात.

सेल्टिक शाखेचे पोटभेद.

७. सेल्टिक शाखेंत किम्रिक् व ग्याधेलिक् असे पर्याय असून, ह्याच्या कॉर्निश नांवाचा जो पोटभेद होता, तो हल्लीं मृतभाषेंतच मोडतो. तथापि, या शाखेचे दुसरे

---

१ आर्य शाखेपैकीं, सेल्ट हेच प्रथमतः यूरोपखंडांत आले, असें मॉक्समुलरचें म्हणणें आहे.

कित्येक प्रकार झाले आहेत, आणि ते ऑसिथी, वेल्स, ब्रिटनी, स्कॉटलंड, आयर्लंड, व आइलआफ्वाइट्, येथें बोलण्यांत येतात.

याप्रमाणें, १ आर्य किंवा संस्कृत मायभाषा, तिच्या मुख्य व विसृत शाखा, आणि त्यांचे पोटभेद, यांचें सामान्य दिग्दर्शन झालें. सबब, आतां २ शमी भाषेकडे वळूं, व तत्संबंधीं अवश्य ती हकीकत देऊं.

शमीभाषेच्या शाखा व त्यांचे पोटभेद.

आरामी.

२. शमी भाषेच्या १ आरामी, २ हीब्र्यू, ३ आरबी, ४ बर्बर, ५ हौसा, ६ गल्ला, सांकेतिकमिश्री[1], आणि ८ काप्ती, अशा शाखा आहेत. ह्यापैकीं, (१) आरामी भाषा ही सीरिया, मिसापोटेमिया, बाबिलोनिया, आणि आसीरियाचा कांहीं भाग, व उत्तरेकडील टापू, यांत प्रचारांत असून, हिचे सीरिआक आणि चाल्डी, असे मुख्य दोन पोटभेद सुप्रसिद्ध आहेत. परंतु, हे दोन्ही पोटभेट, व बाबिलन आणि निनेव्हा येथील सांकेतिक चिन्हात्मक शिलालेख, हे मृतभाषेंतच मोडतात. मात्र, नूतनसिरिआक्चे पोटभेट हल्लीं प्रचारांत आहेत.

हीब्र्यू.

(२.) हीब्र्यूभाषा पालेस्ताईनूमध्यें चालत असे. तथापि, बाबिलोनियाचा ऱ्हास होऊन सीरियाचें वर्चस्व झाल्यावर, त्या भाषेंत आरामीचें प्राबल्य व मिश्रण होऊं लागलें. शिलालेखांवरून, फिनीशिया आणि कार्थेज्ची भाषा देखील शमीचीच शाखा असल्याचे कळून येतें. परंतु सांप्रत काळीं बायबली हीब्र्यू, फिनि-

---

१ इजिप्त देशांतील सांकेतिक भाषा.

शियन् हीब्र्यू, कार्थेजीनियन् हीब्र्यू, व सामारियन् हीब्र्यू, ( इ. स. चें ३ रें शतक ), या भाषा व्यवहारातीत असून, त्याऐवजीं ज्यू भाषेचे पोटभेदच प्रचारांत आले आहेत.

आरबी. ( ३ ) आरबी[1] भाषेचा सिध्धी हा पोटभेद असून, ह्याला-च हाबशी किंवा गीज अशी संज्ञा आहे. परंतु, ही भाषा हल्लीं प्रचारांत नाहीं. हाबशी देशाच्या म्हणजे आबिसीनियाच्या सांप्रतच्या भाषेला आम्हरी म्हणतात; व ह्या भाषेचे, आरबीचे, आणि एह-किली किंवा मरी भाषेचे पोटभेद मात्र लोक सांप्रत बोलतात.

आरबी भाषेंतील पुरातन म्हणून मानलेलीं काव्यें मुलाकात नांवानें सुप्रसिद्ध आहेत, व ती महमदाच्याही पूर्वींचीं असल्याचें कळतें.

बर्बर. ( ४ ) बर्बरभाषा आफ्रिकाखंडाच्या उत्तरेस, मिसरदेशा-पासून तों तहत आट्लांटिक महा-सागरापर्यंतच्या प्रदेशांत, आरबांची स्वारी होई तोंपावेतों, बोलत असत. परंतु आतां, ह्यांचा प्रवेश उत्तरोत्तर आभ्यन्तरीय प्रांतांतच विशेष होत चालला आहे.

हौसा, गल्ला, मिश्री, व काप्ती. ( ५ ) हौसा, (६) गल्ला, (७) सांकेतिक मिश्री, आणि (८)काप्ती, यांची गणना शमी कुळांत केली आहे. तथापि, एतद्विषयक

---

१ आरबी भाषेंत सिंहाला ५०० नांवें असून, तरवारीला १००० शब्द आहेत; व दुर्दैवाला ४०० आणि मधाला ८० नांवें आहेत, असें सांगतात.

( रीनानकृत शमीभाषेचा इतिहास. पान ३७७, १३७; हर्वास-कृत भाषेचा इतिहास; व पोकाककृत शब्दवर्णन, पा० ३५२ पहा. )

आणखी ज्यास्त शोध लावण्याची आवश्यकता असल्यावि-षयीं कांहीं विद्वानांची समजूत आहे.

तुराणी व तिचे पोटभेद.

३ तुराणी भाषेचे दोन पोटभेद आहेत. १ उत्तर तुराणी, आणि २ दक्षिण तुराणी. उत्तर तुराणीला उग्रीतार्तरी किंवा यूरल—आलताई म्हणतात, व हिच्या १ तुंगुस्की, २ मोगली, ३ तुर्की, ४ फिनिक, आणि ५ सामोयेडी, अशा पांच शाखा आहेत. दक्षिण तुराणीला तामिली म्हणतात. हिचा प्रसार आशिया खंडाच्या दक्षिणेस असून, तिच्या चार शाखा आहेत. १ त्रिविष्टप ब्रह्मी, २ कुलाली, ३ द्राविडी[1], आणि ४ मल्याली किंवा सामुद्रिक.

ह्या सर्व शाखांचे अनेक प्रकार आहेत. सबब, ते वाचकांच्या सोईसाठीं, ज्या त्या शाखेसमोर येथें देतों.

१ उत्तर तुराणी किंवा उग्री-तार्तरीच्या शाखा, व त्यांचे पोटभेद.

तुंगुस्की.

१ तुंगुसीः—चापोगायरी. ओरोतोंगी. लामूटी (ओखाटस्कचा किनारा). मंडशु (चीन).

मोगली.

२ मोगलीः—शरा मोगली (गोबीच्या दक्षिणेस). खल्खा (गोबीच्या उत्तरेस). शरागोळी (तिबेट व तिगुट). चोशॉटी (कोकोनूर). संगूरी.

---

१ हिला कित्येक पाश्चात्य पंडितांनीं तातूलियन अशी संज्ञा दिली आहे. तथापि, ही भाषा आर्यशाखेपैकीं असल्याचें दिसतें, व कित्येक पाश्चात्यांचेंही तसेंच मत आहे.

( भारतीय साम्राज्य. पु. ९ वें. पान १९९ ते २२३ पहा. )

तोरगडी. दुरबेटी. ऐमकी ( इराणच्या जाती ). सोकपा ( तिबेट ). बुरेटी ( बैकाल सरोवर ).

तुर्की.

**३ तुर्की**:—उर्गसी. कोमनी. छगतै. उस्बेकी. तुर्कोमनी. कसानी. किरर्गा. बशकिरी. नोगाईः कुमी. करचाई. करकल्पाकी. मेशचर्यकी. सैबिरी. याकुती. दुर्बेडी. आदरात्रिजनी. क्रिमी. अनटोली. रुमेली.

फिनिक.

**४ फिनिक**:—हंगारी. व्होगली. उग्री—ओस्टाकी. चेरीमिर्शी ( बलगेरी ). मोर्डिनी. परमी. सीरियाणी. व्होटियाकी. लापी.

सामोयेडी.

**५ सामोयेडी**:—युराझी. तावगी. येनिसी. ओस्टाकी-सामोडी. कामी.

त्रिविष्टप ब्रह्मी.

**२ दक्षिण तुराणी** किंवा **तामिलीच्या** शाखा व त्यांचे पोटभेद.

तिबेटी-ब्रह्मीचा प्रसार.

१ त्रिविष्टप ब्रह्मी:—**त्रिविष्टप-ब्रह्मी** भाषेचे मुख्य तीन भेद आहेत. १ **ताई** किंवा **शान**, २ **मोन**, आणि ३ **कारेन**. पूर्वेकडील **आसाम** व थोडा ब्रह्मदेशांतील भाग, येथें **ताई** भाषा बोलतात; परंतु त्याच्याच सरहद्दीवरील लहान लहान संस्थानांत आणि **सायामच्या** राज्यांत, **शान** लोकांची बरीच वस्ती आहे. खालचा **ब्रह्मदेश**, वरच्या **ब्रह्मदेशाची** सरहद्द, **अनाम**, आणि **कंबोडिया**, येथें **मोन** भाषाच बोलण्याचा विशेष प्रघात आहे. **कारेन्** भाषा **चिनीभाषेशीं** साम्य पावत असल्याचें भाषाभिज्ञांचें मत आहे, व ती विशेषतः खालच्या **ब्रह्मदेशांतच** लोक बोल-

तात. भरतखंडांत जपानी भाषा बोलणारा एकही नाहीं. टिनासरिम्च्या दक्षिणेस मरगुई नामक जो द्वीपसमूह आहे, त्यांत कांहीं दर्यावर्दी कैकाडी लोक आहेत; पण ते मल्याळी भाषा बोलतात. ह्या भटकणाऱ्या लोकांस सालोन अशी संज्ञा आहे.

तिबेटी ब्रह्मी भाषा व तिचे पोटभेद.

सदरीं दाखल केलेल्या तीन शाखांचे आणखी पुष्कळ पोटभेदही आहेत. सबब, तेही येथें सांगतों. १ काचारी, किंवा बोडो. २ मेच. ३ होजाई. ४ गारो. ५ पाणीकोच. ६ देवरी छुटा, ७ तिपूर, अथवा भृंग. ८ तिबेटी, किंवा भुतिया. ९ सर्प. १० ल्होप, अथवा भुतानी. ११ च्छांगलो. १२ ट्वांग १३ गुरुंग. १४ मुर्मी. १५ थाक्स्य, १५ नेवार. १६ पाहाडी. १७ मगर. १८ लेपचा. १९ डपळा. २० मिरी. २१ अबर. २२ लो–भूतिया. २३ आका. २४ ( मिश्मी भाषा ). २५ चूलिकट. २६ तेयिंग, अथवा डिगरू. २७ मिझू. २८ ढिमल. २९ कनावरी भाषा. ३० मिलछन. ३१ तिबरस्कद. ३२सुमचु ३३ किरन्ती. ३४ लिंबू. ३५ सुण्वार. ३६ ब्रामू. ३७ चेपंग. ३८ वायू. ३९ कुमुन्द. ४० नाग भाषा. ४१ नामसंग किंवा कैपुरिआ. ४२ बणपाडा, अथवा फोवोका. ४३ मिथन. ४४ तबलुंग. ४५ मुळुंग. ४६ खारी. ४७ नौगाव. ४८ तेंगूस. ४९ ल्होटा. ५० अंगामी. ५१ रेंग्म. ५२ अरुंग. ५३ कुच्छा. ५४ लियंग, किंवा करेंग. ५५ मराम. ५६ भिकिर. ५७ सिंगफो. ५८ जिर्ली. ५९ ब्रह्मी. ६० (कुकी भाषा ) खेंग. ६१ थाडो. ६२ लुशाई. ६३ हल्लमी. ६४

मणिपुरी. ६५ मरिंग. ६६ खोईब्रु. ६७ कुपुई. ६८ तंग-खूळ. ६९ लुहुपा. ७० खुंगुई. ७१ फडंग. ७२ चंफुंग. ७३ कुपोमे. ७४ तकैमी. ७५ अन्द्रो व सेंगमाई. ७६ च्छैरेल. ७७ अनल आणि नामफाऊ. ७८ कुमी. ७९ कमी. ८० म्रू. ८१ बंजोगी अथवा लुंगखे. ८२ पंकहो. ८३ शेण्डू किंवा पोई. ८४ सक. ८५ क्याऊ. ८६ ( कारेनभाषा ) स्गाऊ. ८७ बघाई. ८८ रक्त कारेन. ८९ प्वो. ९० तरू. ९१ मोपद्या. ९२ काय अथवा गैकहो. ९३ तौंगथू. ९४ लिसाव. ९५ ग्यारुंग. ९६ तक्पा. ९७ मन्याक. ९८ थोचू. ९९ होर्पा. १०० खासी. १०१ ताइ. १०२ शुंभ. ( किंवा सायामी भाषा, अथवा थाई ). १०३ लाव. १०४ शान. १०५ अहोम. १०६ खमटी. १०७ ऐतोन. १०८ ताईमाहू, किंवा चिनीशान. १०९ मोनआनाम. ११० मोन. १११ कंबोजी. ११२ अनामी. आणि ११३ पलौंग.

कुलाल भाषा व तिचे पोटभेद.

२ कुलाली:—कुलाल भाषेचे थोडेच पोटभेद आहेत. १ संताळी. मुंडारी. ३ हो, किंवा लर्ककोळ. ४ भूमिज. २ कोर्वा. ६ खारिआ. ८ जुआंग. ९ कुरी, १० मेहतो. आणि ११ सवर.

द्रविड भाषा, व तिचे पोटभेद.

३ द्राविडी:—द्राविड भाषेचे खालीं लिहिलेले पोटभेद आहेत. १ तामिल. २ मल्याळी. ३ तेलगु. ४ कानडी. ५ बदग. ६ तुळू. ७ कुडगू, किंवा कुर्ग. ८ तोड. ९ कोट. १० गोंड, व त्या भाषेचे प्रकार. ११ महादेव. १२ राज. १३ मारिआ. १४ कन्ध अथवा कू. १५ उरौ, किंवा

धनगर. १६ राजमहाली, अथवा मालेर १७ दुसऱ्या किरकोळ भाषा. १८ नायकुडे. १९ कोलमी. २० कैकाडी. २१ येरूकल. २२ गडब. आणि २३ खोंड.

माले किंवा सामुद्रिक.

४ मल्याळी किंवा सामुद्रिक भाषांत, आशियाखंडाच्या दक्षिणेस आणि विशेषतः आग्नेयी कोपऱ्याला जीं लहानमोठीं बेटें आहेत, त्यांत प्रचारांत असलेल्या बहुतेक भाषांचा समावेश होतो. इतकेंच नव्हे, तर आफ्रिका व अमेरिकाखंडांतल्या समुद्रवलयांकित प्रदेशांत आदिमवासीन लोकांची ज्या ज्या ठिकाणीं वस्ती आहे, त्या त्या ठिकाणीं बोलत असलेल्या भाषांची देखील ह्यांतच गणना करणें अगत्याचें आहे.

तुराणी शाखांचा तपशील.

याप्रमाणें, तुराणी भाषेच्या मुख्य शाखा व त्यांचे पोटभेद, यांविषयींचा उपलब्ध असलेला आम्हीं अवश्य तो तपशील वर दिला. तथापि, एवढ्यानेंच अवान्तर माहितीचा कांहींच बोध होत नसून, तो होणें देखील निःसंशय विशेष अगत्याचें आहे. सबब, निर्दिष्ट केलेल्या शाखा व पोटभेद, यांच्या पूर्वोक्त अनुक्रमास अनुसरून तत्संबंधीं तपशिलवार हकीकत येथें देतों.

तुंगुस्की भाषा.

१ उत्तर तुराणी किंवा उग्री शाखेंतील तुंगुस्की वर्गांतच चिनी भाषेचा समावेश होतो. ह्या (चिनी) भाषेंत, नाम, विशेषण, क्रियाविशेषण, क्रियापद, आणि उपसर्ग, यांत कांहींएक भेद नसून, फक्त एकाच धातूनें, मोठा, मोठेपणा, मोठ्यानें, व मोठा होणें, या

अर्थांचा बोध होतो. मात्र, त्याचा अभिनिवेश योग्य रीतीनें आणि जेथल्या तेथेंच झाला पाहिजे. उदाहरणार्थ, **गों ता नी,** या पदांचा अर्थ " मी तुला मारतो, " असा होतो. परंतु, **नी ता गों** चा बोध " तूं मला मारतोस, " याशिवाय दुसरा होतच नाहीं.

संश्लेष, किंवा **प्रत्यय**, हेंच **तुराणी** भाषांचें मुख्य लक्षण होय. ज्याप्रमाणें **आर्य** व **शमी** कुटुंबांतील भाषांत शब्दांस विभक्ति लागते, त्याचप्रमाणें **तुराणी** भाषांत शब्दांस प्रत्यय लागतो. मात्र, भेद म्हणून इतकाच कीं, **आर्य** आणि **शमी** भाषांत, प्रायः मूळ धातूचें रूपान्तर होऊनच प्रत्यय लागतात. परंतु, **तुराणी** भाषेंत तसें न होतां, हे प्रत्यय मूळ धातूसच, जोड अथवा सांध्याप्रमाणें लागले जातात. उदाहरणार्थ, **संस्कृतां**तील "**कृ**" या धातूस क्रियापदाचे प्रत्यय लागतांना, त्याचें रूप बदलतें; पण **तुर्की** भाषेंतील " **बकर** " या धातूच्या मूळ रूपांत कांहीं एक फेरफार न होतां, त्यालाच प्रत्यय प्रत्यक्ष जोडला जातो. जसें,

तिचें लक्षण.

संस्कृत. कृ=करणें. करोमि. कुर्वः. कुर्मः. प्रथम पुरुषीं
एकवचन, द्विवचन, अनेकवचन.
करोषि. कुरुथः. कुरुथ. द्वितीय पुरुषीं
एकवचन, द्वि०, अ०
करोति. कुरुतः कुर्वन्ति. तृतीय पुरुषीं
एकवचन, द्वि० अ०

तुर्की. बकर=मानणें. बकर-इम. मी मानतों. प्र०पु०ए०व०
बकर-इझ. आम्ही मानतों. प्र०पु०अ०व०
बकर-सिन. तूं मानतोस. द्वि०पु०ए०व०

बकर-सिनिझ. तुम्ही मानितां द्वि०पु०अ०व०
बकर. तो मानतो. तृ०पु०ए०व०
बकर-लर. ते मानतात. तृ०पु०अ०व०

बकर शब्दास लागलेले सदरचे प्रत्यय इतके सुटे आणि चिकटल्यासारखे दिसतात कीं, त्यांस जोड अथवा सांधा, अशीच आपण पारिभाषिक संज्ञा देऊं.

तिचा प्रसार.

तुंगुस्की शाखेचा प्रसार उत्तर चीनपासून तों तहत सैबीरियापर्यंत, व त्याच्याही पश्चिमेस तुंगुस्का नदी पावेतों, ११३° रेखांशाजवळ जवळ आहे. ह्या तुंगुस्की जाती रूस आणि चिनी अमलाखालीं असून, यांपैकीं चीनच्या ताब्यांत असलेल्या तुंगुस्की जातीस मन्दशू हें नामधेय आहे. हें नांव इ० स० १६४४ सालीं, तुंगुस्की लोकांनीं चीन जिंकिल्यावर, सांप्रतच्या पातशाही घराण्यानें धारण केलें असल्याचें दिसतें.

मोगली भाषा.

२ मोगली भाषा बोलणारांचें आदिनिवासस्थान बैकल सरोवराजवळ, व सैबीरियाच्या उत्तर भागांतच विशेषेंकरून आहे. ह्यांच्यांत १ शुद्ध मोगली, २ बुरियात, आणि ३ आलोट किंवा कालमुक, असे तीन भेद असून, त्यांची हालचाल इसवी सनाच्या नवव्या शतकांतच प्रथम दिसून आली. चिंगिझखान नांवाचा सरदार त्यांच्यांत प्रमुख होऊन गेला, व त्यानेंच ह्या विभागलेल्या जातींचें एकीकरण करून, सुमारें इ. स. १२२७ सालीं मोगली बादशाहीची प्रतिष्ठापना केली, आणि मोगली, तुंगुसी, तुर्की अथवा तार्तरी, इत्यादि लोकांस आपल्या शहाखालीं आणिलें. कालान्तरानें, हे तुर्की लोक फार प्रबल झाले.

त्यामुळें, त्यांचा आशिया आणि यूरोप खंडांत सुळसुळाट होऊन, त्यांनीं हीं दोन्हीं खंडें अगदीं दणाणून सोडिलीं.

तिचा विस्तार.

चिंगिझखानानंतर, जगताई[1] नांवाच्या त्याच्या मुलानें देखील बराच मुलूख जिंकला होता, व त्यामुळें त्याच्या राज्याचा विस्तार नीपर नदीपासून तों तहत येंबा नदीपर्यंत, आणि तिच्याही पलीकडे किरगिज् पठारापर्यंत असे. याप्रमाणें, मोगली लोक व त्यांची भाषा यांचा विस्तार दिवसानुदिवस अधिकाधिकच होत गेला. इतकेंच नव्हें तर, कालान्तरानें, त्यांच्या छत्राखालीं थेट पूर्वेकडील चीन देशही आला, आणी तेथें त्यांनीं युअन ( यवन ? ) नांवाचें आपलें घराणें स्थापित केलें. तदनंतर ते पश्चिमेकडे वळले, व बगदाद, इकोनियम, मास्को, इत्यादि शहरें आपल्या ताब्यांत घेऊन, त्यानीं रशियाचा बराच भाग उध्वस्त केला. पुढें, इ. स. १२४० सालीं, त्यांनीं पोलंडकडे आपला मोर्चा फिरविला, आणि इ. स. १२४१ सालीं सिलेशिया घेऊन, थोड्या अवधींत मोरेव्हिया, हंगारी, जर्मनी, पोलंड, इत्यादि देश सर केले. तात्पर्य, चीनपासून पोलंड पावेतों, व हिंदुस्थानपासून सैबीरियापर्यंत, मोगली लोकांनीं आपल्या राज्याचा अफाट विस्तार केला.

तथापि, योग्य नियन्ता नसल्यामुळें, तेराव्या शतकाच्या

---

[1] जगताई हें नांव जगताईनें काबीज केलेल्या कांहीं प्रांतांस दिलेलें असून, हा प्रदेश अरल सरोवरापासून तों हिंदुकूशपर्यंत, व अक्षय्या आणि जगत्सरित् ( म्हणजे जिहून व सिहून ) या नद्यांच्या दरम्यान आहे. ह्याची प्राचीन राजधानी काराकोरम होय.

शेवटीं, ह्या प्रचंड साम्राज्याची सर्व इमारत ढांसळून, त्याचे लहान लहान तुकडे झाले, आणि चीन, सैबीरिया, इराण, तुर्कस्थान, व रूस, येथें निरनिराळीं मोगलीं राज्यें स्थापन करण्यांत आलीं. परंतु, तीं सुद्धां फार वेळ टिकलीं नाहींत. इ. स. १३६० सालीं, चिनी लोकांनीं मोगली घराणें हद्दपार केलें, आणि त्यामुळें ह्या राजघराण्याचा त्या देशांत अन्तच झाला. पुढें, पंधराव्या शतकांत, रूस देश देखील त्याच्या हातांतून गेला, पण, मध्य आशियांत, ते फिरून सरसावले, व तैमूरलंगानें बहादुरी केल्यामुळें, काराकोरमपासून इराण व आनाटोलियापर्यंत, त्याचा अंमल बसला. तथापि, कालगतीनें हेंही सर्व लयास गेलें, आणि मोगली घराण्याचा अंमल फक्त जगताईमध्यें मात्र राहिला. येथूनच बाबरनें हिंदुस्थानावर स्वारी केली, व तेथें मोगली बादशाही स्थापिली.

यूरोपांत राहणाऱ्या मोगली लोकांची वस्ती ठिकाठिकाणीं पसरलेली दिसते. कित्येक व्होल्गा नदीच्या दोन्ही तटावर राहतात, आणि कित्येक कास्पियन् समुद्रावर आस्त्राखानजवळ आपली कालक्रमणा करितात. कांहीं कांहीं आलोट किंवा कालमुक वंशांतले आहेत, व ते सैबिरस्कच्या आग्नेयी कोपऱ्यावर असतात. ह्यांचा शिरकाव यूरोपखंडांत इ० स० १६६२ सालीं झाल्याचें कळून येतें.

असो. अशा प्रकारें मोगली लोकांचा उत्कर्ष असून, त्यांचा चीनपासून व्होल्गा नदीपर्यंत सर्वत्र विस्तार असतांही, त्यांची भाषा केवळ निःसत्वच राहिली; आणि

त्या कारणानें, मोगली[1] भाषेची स्थिति देखील तुंगुसी भाषेप्रमाणेंच आहे, असें ह्मटलें असतां कांहीं एक बाध येणार नाहीं.

तुर्की भाषा.

तुर्की भाषेचा विस्तार बराच मोठा असल्याचें दिसतें. कारण, लेनानदी, उत्तरमहासागर, व ॲड्रियाटिक समुद्र, यांच्या योगानें जो अनियमित त्रिकोणाकृति प्रदेश बनतो, त्यांतच ह्या भाषेची व्याप्ति आहे. तथापि, यूरोपांतील तुर्की लोकांची संख्या सुमारें २०,००,००० असून, त्यापैकीं असंकीर्ण तुर्क अजमासें ७,००,००० असावेत, असें शफरिकचें मत आहे.

तुर्कीस चिनी लोकांनीं दिलेली संज्ञा.

तुर्की लोकांना चिनी लोक हुंगनू म्हणत. ह्यांनीं इ० स० पूर्वी २०६ वर्षांच्या सुमारास, चीनच्या पश्चिमेकडील आशियाखंडांतील बऱ्याच मुलुखावर आपलें वर्चस्व स्थापिलें होतें. परंतु, कालान्तरानें चिनी लोकांनीं त्यांस जिंकून हांकून लाविल्यामुळें, ते सरकत सरकत पश्चिमेकडे गेले; आणि शनैः शनैः त्यांनीं आपला प्रवेश यूरोप खंडांतही केला. पुढें इ० स० ९६८ सालाच्या सुमारास, तुर्की लोकांनीं व्होल्गा नदी व अझोफसमुद्र यांच्या दरम्यानचा प्रदेश व्यापून टाकिला, आणि इराण, आरमीनिया, शीखान, इत्यादि ठिकाणीं सुद्धां त्यांनीं

---

[1] **स्वीडन** देशाचा **कास्ट्रीन्** नामक एक मोठा प्रवाशी होऊन गेला असून, त्यानें **तुराणी** भाषासंबंधीं बराच शोध केला आहे.

**मॉक्समुलर** कृत भाषापरीक्षण, (Survey of Languages) पहा.

आपली वस्ती केली. हुंगनू अशी ज्या जातीस संज्ञा होती, तिलाच चिनी लोक तुकिऊ पण ह्मणत. किंबहुना, तुकिऊचाच तुर्की असा अपभ्रंश होऊन, हा शब्द प्रचारांत आला असल्याचें दिसतें. ह्यांचा व चिनी लोकांचा नेहेमीं झगडा चाले, व त्यांत त्यांचा पराजय देखील होई. परंतु, योग्य संधी सांपडली कीं, ते पुनश्च चिनी लोकांवर चालून जात, आणि त्यांजला वारंवार त्रास देत. शेवटीं, इ० स० १२९७ सालीं, त्यांच्यांत अगदीं निकराचें युद्ध होऊन, तुर्कांचा पराभव झाला, व ते तरफण, काशगर, खामिल, आणि अक्सु, येथें जाऊन राहिले.

तुर्कांच्या जाती व त्यांचा प्रसार.

ह्या तुर्कांत अनेक जाती आहेत, व त्यापैकीं उझबेग, नोगाई, कुंन्दुर, बजाणी, कुमुक, बष्कीर, मीसचिराक, कार-कलपाक, तार्तर, डरणहट, बरबास, याकुत, किरगीज, किरगीज–कासक, किरगीज-बुद्रुक, किरगिज-दरम्यान, किरगिज-खुर्द, इत्यादि मुख्य होत. उझबेक हे उग्री आणि इुइहे यांचे वंशज असून, त्यांनीं आपला पहिला तळ खोटेन, काशगर, तरफण, व खामिल, येथें दिला. पुढें इ० स० च्या सोळाव्या शतकांत ते जगत्सरित वलांडून पलीकडे गेले, आणि अनेक मोहिमा करून, बाल्ख, खीवा ( खारिजम, ) बुखारा, व फरघाणा, हे प्रांत त्यांनीं आपल्या कबजांत घेतले. नोगाई जात कास्पियन समुद्राच्या पश्चिमेस आणि काळ्या समुद्राच्या उत्तरेस राहते. इ० स० च्या सतराव्या शतकापर्यंत, त्यांची वस्ती कास्पियनच्या ईशान्येस होती, असें इरटिश नदीच्या डाव्या बाजूला जी

माळरानें आहेत, त्यांजला त्यांचेच नांव असल्यावरून व्यक्त होतें. परंतु, मोगली जातीच्या **काल्मुक** लोकांनीं त्यांजवर हल्ला केल्यामुळें, ते पश्चिमेकडे हटले, व **आस्त्राखान** जवळ त्यांनीं आपली वस्ती केली. तथापि, पहिल्या **पीटरनें** त्यांची उचलबांगडी केल्यामुळें, त्यांची तेथेंही डाळ शिजली नाहीं. त्याकारणानें, त्यांनीं आपला गाशा तेथून गुंडाळून, **काकेसस** पर्वताच्या उत्तरेस **क्यूबन** आणि **क्यूमा** नदीतीरीं ते जाऊन राहिले, व ते अजून सुद्धां तेथेंच आहेत. मात्र, **कुन्दुर** नांवाची जात **व्होल्गा** नदीवर असून, ती **काल्मुकांच्या** ताब्यांत आहे. इ० स० च्या पंधराव्या शतकापूर्वीं, **बजाणी** लोक **माजरी** शहरांत **क्यूमा** तटीं राहत असत. परंतु, हल्लीं ते **क्यूबन** नदीच्या उगमाजवळच असल्याचें कळतें. **कुमुक** लोक **काकेसस** पर्वतावर **सुंजा, अकसई,** आणि **कोयसू** नदीवर असून, ते तद्देशी राजांच्या अमलांत आहेत. तथापि, हे राजे देखील आपणांस **रूस** देशाचे अंकितच मानतात. **बष्कीर** लोक चार रस्त्यांच्या चवाठ्यावर **कामातटीं** राहतात, व त्याला **सैबीरियापथ, कसनपथ, नोगाईपथ,** आणि **ओसापथ** म्हणतात. ह्यांच्या नजीकच, पूर्वीं **व्होल्गा** नदीजवळ असलेली **मीसाचिराक** नांवाची एक जात राहते. ह्या सर्वांवर **रूसचाच** ताबा आहे. **अरल्सरोवराच्या** आसपास **कार-कलपाक** नांवाचे लोक राहत असून, त्यांच्यावर **रूसचा** व **खीवाच्या खानाचा** अंमल आहे. **सैबीरियाच्या** तुर्कांस **तार्तर** म्हणतात. ह्यांचीं मुख्य वसतिस्थानें म्हटलीं म्हणजे **तोबाल्स्क, येनीसीस्क,** आणि **तोमस्क,**

हीं होत. उरणहट जात चूलिम नदीवर राहते, व बर-बास लोक इरटिश आणि ओबी नदी, यांच्या मधील पठार प्रदेशावर वस्ती करतात. ह्या सैबीरी-तुर्कांच्या भाषेंत, मोगली, सामोयेडी, व रूस भाषांतील अनेक विजातीय शब्दांचें बरेंच मिश्रण आहे. तथापि, तेही मुख्य शाखेंतील शब्दांशीं पुष्कळ साम्य पावतात.

याकुती व तुर्की भाषांचें सूक्ष्मावलोकन.

आशियाखंडाच्या ईशान्येस व लेना नदीच्या दोन्ही बाजूला, याकुत नांवाचे लोक राहतात. ह्यांच्या एकंदर संख्येचा अजमास लागत नाहीं. तथापि, इ० स० १७९५ सालीं, फक्त पुरुषांचीच टीप ५०,०६६ झालीअसल्याचें कळून येतें. रूस लोकांस ह्यांची माहिती प्रथमतः इ० स० १६२० सालीं झाली. हे आपणांस सख ( शक? ) म्हणवितात, आणि ह्यांची मूळ वस्ती बैकल सरोवराच्या ईशान्येस असल्याचें समजतें. भाषेचा अपभ्रंश ज्या कारणांनीं होतो, त्या कारणांचा संस्कार व अनिष्ट परिणाम याकुती भाषेवर न झाल्यानें, ह्या भाषेचें मूळचें स्वरूप अथवा शब्दाचें मूलरूप फारसें बदललें नाहीं; किंवा त्यांत म्हणण्यासारखा फेरफारही झाला नाहीं. त्यामुळें, उसमानी सारख्या प्रौढ आणि नांवाजलेल्या तुर्की भाषांचें परिशिलन करण्यास, ती एक गुरुकिल्लीच आहे, असें म्हटलें असतां चालेल.

किरगिज लोक.

तुर्की-तातरांत किरगिज जात विशेष नांवजलेली आहे. हिची वस्ती, ओबी आणि येनिसी यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत, प्रथमतः

असे. परंतु, आसपासच्या प्रबल लोकांनीं तिला हांकून लाविल्यामुळें, अठराव्या शतकाच्या आरंभींच तिला सैबीरिया प्रांत सोडणें भाग पडलें, व ती चिनी-तुर्कस्थानांत जाऊन राहिली. ह्यांच्यांत अनेक भेद आहेत. त्यांपैकीं, १ किरगिज-कासक हे बुरुतच्या पश्चिमेस चीन आणि रूस यांच्या छत्राखालीं राहतात. किरगिज-बुद्रुक हे पूर्व भागाला असतात. किरगिज–दरम्यान यांची वस्ती सरसु व येंबा या नद्यांच्या मधल्या प्रदेशांत असून, हे लोक मोठे बलाढ्य असल्याचें कळतें. किरगिज–खुर्द यांची वस्ती पश्चिम बाजूला, येंबा आणि यूरल नद्यांच्या दरम्यान आहे. हे सर्व परकी अमलाखालीं असून, इ० स० १८१९ पासून, रूसच्या ताब्यांतच आल्याचें कळून येतें.

तुर्की भाषेच्या प्रसाराचा इतिहास.

तुर्की भाषा, आणि तुर्की वैभव व पातशाही, यांचा निःसंशय फारच निकट संबंध आहे. त्यामुळें, पहिलीच्या प्रौढावस्थेचा इतिहास कळण्याची आवश्यकता असल्यास, दुसरीचें इतिवृत्त जाणणें खरोखरच जरूरीचें आहे. सबब, वाचकांच्या सोईसाठीं, तुर्की लोकांचा त्रोटक वृत्तांत येथें देतों.

तुर्की लोकांचें फार दिवसांचें निवासस्थान खोरासान होय. परंतु, ह्या प्रान्तावर मोगलांनीं स्वारी केल्याकारणानें, तो त्यांनीं सोडला, आणि पश्चिमेकडील सीरिया, आर्मीनिया, व आशिया खुर्द ( मायनर ), येथें प्रयाण केलें. सुलेमान पातशाहा त्यांचाच सरदार होता. त्यायोगानें, इ० स० १२२४ सालीं, त्यालाही त्यांजबरोबरच जावें लागलें.

पुढें कालदेशवर्तमान पाहून इरतुघरल नांवाच्या त्याच्या मुलानें आलादिनच्या हाताखालीं नोकरी पतकरली. हा कोनी ( इकोनियम् ) चा सेलजुक घराण्यांतील सुलतान होता. त्यामुळें, त्याला बरेंच पाठबळ मिळून, त्यानें ग्रीक व मोगली लोकांवर स्वारी केली, आणि फ्रीजिया प्रांत आपलासा करून घेतला. पुढें, तेराव्या शतकाच्या शेवटीं, कोनीचे सुलतान निर्बल झाले, व तुर्की लोक दिवसानुदिवस जोरावत चालले. तेव्हां, अर्थात्च, उस्मानासारख्यास आपलें शौर्य प्रकट करण्यास योग्य संधि सांपडून, तो रणभूमीवर आला, आणि बिथीनियांत डोंगराळ वाटांनीं शिरून, बायझानशियम्च्या बादशाही सैन्याशीं झुंजला, व त्यांचा अगदीं भराभव केला. ह्याचा मुलगा औरखान हा देखील मोठा पराक्रमी होता, ह्यानें इ० स० १३२७ व १३३० सालीं, निकोमीडिया आणि नीशिया, हे प्रान्त सर केले, व हेलेस्पांटवर आपला मोरचा फिरविला. तदनंतर, त्यानें आपल्याला पादशहाचा किताब घेतला, आणि आपल्या राजसभेला "जंगी दरबार" असें नामधेय दिलें. ह्याचाच मुलगा सुलेमान होय. ह्यानें, इ० स० १३५७ सालीं, हेलेस्पांट वलांडून ग्यालिपोलि व सेस्टास काबीज केलें, आणि त्यामुळें डार्डेनेल्स देखील त्याच्या ताब्यांत आलें. पुढें, पहिल्या मुरादनें इ० स० १३६२ सालीं आद्रियानोपल् घेतलें, व तेंच आपल्या राजधानीचें ठिकाण करून, मासिडोनिया सर केलें. इतकेंच नव्हें तर, इ० स० १३८९ सालीं, त्यानें बल्गेरिया, सर्व्हिया, आणि क्रोटिया, यांच्या संयुक्त

सैन्यास कोसवापोलीच्या लढाईंत जिंकलें. अशाच प्रकारें बायझेटनें पण क्रम चालविला, व थेसली आणि थर्मापिली घेऊन, पिलापोनीसस उध्वस्त केलें. ह्याला अटकाव करण्यासाठीं, जर्मनीचा बादशहा सिगिस्मंड हा देखील, फ्रेंच, जर्मन, व स्लॉव्ह सैन्यानिशीं त्याजवर चाल करून गेला. परंतु, त्याचें कांहीं एक न चालतां, इ० स० १३९९ सालीं, निकापोलीसच्या लढाईंत त्यालाच हार खावी लागली. पुढें, बायझेट्नें बोस्निया पण घेतलें; आणि त्याचा इरादा कुस्तंतुनिया सर करण्याचा होता; इतक्यांत, तैमूरचा व त्याचा सामना होऊन, ग्यालेशियांत अंगोरा ( अंकिर ) येथें युद्ध जुंपलें, व इ० स० १४०२ सालीं बायझेट्चा पराभव झाला.

तदनन्तर, तैमूर मरण पावला, आणि इ० स० १४१३ सालीं, पहिल्या महमदाच्या कारकीर्दींत, तुर्की लोकांची फिरून जमाजम होऊन, इ० स० १४२१ सालीं, दुसऱ्या मुरादला पहिलें सर्व वैभव पुनश्च प्राप्त झालें. त्यामुळें, तो पुन्हा सज्ज झाला, व त्यानें आपलें सैन्य आणखी एकदां डॉन्यूब नदीवर पाठविलें. ह्यावेळीं सुद्धां, हंगारी व स्लॉव्ह लोकांनीं हरकत केली. परंतु, इ० स० १४४४ सालीं वर्णा लढाईंत, व इ० स० १४४८ सालीं कोसवा लढाईंत, मुरादला पूर्ण जय मिळून, त्यानें कुस्तंतुनियेवर हल्ला केला. इतकेंच नव्हें तर, सर्व यूरोपांतले वीर पुरुष त्याच्या छातीवर असूनही, त्यानें त्यांस झुगारून दिलें, आणि ता. २९ मे इ० स० १४५३ रोजीं, त्यानें मोठ्या बहादुरीनें तें शहर घेतलें, व तेथें आपली राजधानीही स्थापिली.

असो. यूरोपांतील तुर्कस्थान, आशियाखुर्द ( म्हणजे आशिया मायनर ), व सीरिया, येथील तुर्की लोक, खोरासान आणि पूर्व-इराण येथूनच आले. हे सेलजुक घराण्यांतले असून, मध्ययुगांत कांहीं कालपर्यंत, त्यांचें इराणांत देखील राज्य होतें. त्यामुळें, तुर्की व इराणी यांचें परस्पर विशेष संघट्टन होऊन, तुर्की भाषा जरा जोरावत चालली. कारण, इराणी शब्द, इराणी भाषाप्रचार, आणि इराणी विद्या, इत्यादींची तींत भर पडून, ती सहजींच ऊर्जित दशेस येऊं लागली. पुढें, कालान्तरानें, तुर्की लोक देखील इतस्ततः पसरत चालले, आणि त्या योगानें त्यांच्या भाषेचाही आपोआप फैलाव होत गेला. त्यांची एकंदर संख्या सुमारें १,१०,००,००० पासून १,२०,००,००० पर्यंतच होईल. तथापि, त्यांचें राज्य आशिया, यूरोप, व आफ्रिका, या तिन्ही खंडांत असल्यानें, तुर्कस्थान, सीरिया, मिसर देश ( ईजिप्त ), त्रिपोली, आणि ट्यूनिस, या देशांत, व सरकार दरबारांत, तुर्की भाषाच चालते. फार तर काय सांगावें, पण, इराणांत तेहरान वगैरे ठिकाणीं सुद्धां, तुर्की भाषेचेंच चलन आहे. त्यामुळें, ह्या भाषेला सर्व प्रकारें प्रोत्साहन व राजाश्रय मिळून, ती हळूं हळूं पुढेंच सरसावत आहे, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे.

तुर्कींत इराणीचें झालेलें मिश्रण, व त्यामुळें तुर्कीला प्राप्त झालेलें प्रौढत्व.

४ फिनी भाषेची जन्मभूमि यूरल पर्वतांत असून, तेथूनच ह्या लोकांचा प्रसार पूर्वेस, पश्चिमेस, आणि दक्षिण दिशेकडे काळ्या समुद्रापर्यंत झाला

फिनी भाषा.

असल्याचें, अनेक भाषाकोविदांचें मत आहे. कदाचित्, फिनी, मोनली, व तुर्की लोकांच्या समुदायासच ग्रीक लोकांनीं शक अथवा सिथियन अशी संज्ञा दिली असावी, असें वाटतें. फिना भाषेचे १ चूडी, २ बलगेरी, ३ पर्मी, आणि ४ उग्री, असे चार प्रकार आहेत. ह्या भाषेंत कांहीं तरी सत्व असेल, असें कोणास देखील वाटत नव्हतें. परंतु, सोर्जन, लोनराट, कास्ट्रेन, व केलग्रेन, यांच्या परिश्रमानें, कित्येक वृद्ध गृहस्थांच्या तोंडपाठ असलेलीं कडवीं त्यांजकडून म्हणवून, तीं त्यांनीं लिहून घेतलीं. त्यावरून, हें फिनी काव्य इलियडच्या तोलाचें आहे, असें मॉक्समुलरच्या[1] लेखावरून कळून येतें. फिनी भाषेला लागून आणि बहुतेक तिच्यासारख्याच इस्थी, लिव्होनी, लापी, हंगारी, चरमिसी, इत्यादि भाषा आहेत.

सामोयेडी. ५ सामोयेडी भाषा ६१°–७६° पूर्व रेखांश आणि ९५°–६५° उत्तर अक्षांश, यांच्या दर-

---

[1] "From the mouths of aged, an epic poem has been collected equalling the Illiad in length and completeness......( and ) if the poet may depict the men with whom he lives, *Kalewala* possesses merits not dissimilar from those of the *Illiad*, and will claim its place as the fifth nationul epic of the world, side by side with the Ionian songs, with the *Mahabharat*, the *Shahanamah*, and the Nibclunge."

( Lectures. Science of Language. vol. I. P. P. 363-364. )

म्यानच्या टापूंत प्रचारांत आहे. तथापि, तिची व्याप्ति फार नाहीं.

तामिली शाखेंतील भाषा.

आतां, फक्त १ त्रिविष्टप-ब्रह्मी, २ कुलाली, ३ द्राविडी, आणि ४ मल्याळी किंवा सामुद्रिक, ह्यांचाच विचार करणें राहिला आहे. कारण, त्या दक्षिण तुराणी किंवा तामिलीच्याच शाखा असल्याविषयीं, कित्येक यूरोपीयन् पंडितांचें मत आहे. परंतु, त्यांबद्दलचें तपशिलवार विवेचन यापूर्वींच, (मागें पान ३८ ते ४१ पहा.) व भारतीय साम्राज्याच्या नवव्या पुस्तकांत केलें आहे. सबब, येथें तद्विषयक ज्यास्त विचार करण्याचें प्रयोजन नाहीं.



# भाग दुसरा.

## भाषेची उपपत्ति,

## व

## ध्वनि, शब्द, आणि श्रवणविचार.

भाषोत्पत्तीचें विवेचन.

मागील भागांत, भाषाशास्त्राचें एकंदर दिग्दर्शन करून, त्याबद्दलची सामान्य माहिती वाचकास दिली. सबब, प्रस्तुत भागांत, भाषेच्या उपपत्तीसंबंधींच अवश्य तें विवेचन यथावकाश करण्याचें योजिलें आहे.

भाषेची व्याख्या व तींत झालेला समावेश.

यापूर्वी, भाषेची व्याख्या आम्हीं प्रथमारंभींच दिली आहे. त्यावरून, आपलें मनोगत व्यक्त करण्यासाठीं, अथवा आपल्या मनांतील कल्पनातरंगांचें उद्बोधन व्हावें म्हणून, किंवा आपले एकंदर विचार एकमेकांस प्रदर्शित करता यावेत एतदर्थ, जी वाक्संज्ञा प्रचारांत येते, ती भाषा होय, हें वाचकांच्या लक्षांत सहजींच आलें असेल. अर्थात्, हींत पशु, पक्षी, कीटक, इत्यादि नाना प्रकारच्या कोटींतल्या प्राणिमात्राच्या भाषेचा बिलकुल समावेश होत नाहीं. इतकेंच नव्हें तर, करपल्लवी[1], नेत्रपल्लवी[2],

---

१ हाताच्या बोटांनीं नानाविध संज्ञा करून आपलें मनोगत व्यक्त करण्याचा प्रकार.

२ नेत्रकटाक्षांनीं आपले हेतु प्रदर्शित करण्याची पद्धत.

मिताक्षरी, वगैरे मनुष्यप्रणीत ज्या ज्या भाषा आहेत, त्यांचा देखील अंतर्भाव हींत करणें, यथान्याय होणार नाहीं. तेव्हां उघडच, ह्या भूतलावर प्रचारांत असलेला जो जो मानवी वाग्विभव दृग्विषयीभूत होतो; किंबहुना, हृद्गत असलेला जो जो मनस्तरंग वाचेनें व्यक्त करण्यांत येतो; त्याचेंच येथें यथावकाश विवेचन करण्याचें योजिलें आहे.

भाषा म्हणजे शब्द समुदाय.

असो. भाषा म्हणजे अनेक शब्दांचा केवळ समुदायच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि, ज्या शब्दाच्यायोगानें भाषा बनते, त्या शब्दाची व्याख्या काय, व तो कोठें, आणि कसा उत्पन्न होतो, इत्यादि विषयकविवेचन फार महत्त्वाचें असल्या कारणानें, प्रथमतः त्याबद्दलचाच अवश्य तो विचार येथें करतों.

शब्दाचें आदिकारण ध्वनि आहे, असें व्यवहाररीत्या

---

१ ही भाषापद्धति केवळ कृत्रिम असून, अगदीं नियंत्रित आहे. हींत, **अ, आ,** इत्यादि वर्णांच्या ठिकाणीं **क, का** बाराखडीचा उपयोग करितात; आणि त्याचप्रमाणें **ख, घ, च, त, य, र, ल, ह,** व **ळ,** या अक्षरांच्या जागीं **ग, ङ, ट, प, श, ष, स, व,** आणि **क्ष,** यांचा परस्पर आदेश होतो. ही भाषा व्यवहारांत कोणी कधीं सुद्धां बोलत नाहीं; व म्हणूनच तिचा तादृश कांहींएक उपयोग नाहीं. मात्र, ती दुसऱ्याला समजूं नये, इतक्याच हेतूनें ती क्वचित् बोलण्यांत येते; आणि तिची मोड खालीं लिहिलेल्या श्लोकावरून व्यक्त होते:—

**अकौ खगौ घङौ चैव चटौ तपौ परस्परम् ।**
**यशौ रषौ लसौ चैव हवौ ळक्षौ मिताक्षरी ॥**

शब्दाचे आदिकारण ध्वनि.

म्हणणें सयुक्तिक दिसतें. किंबहुना, शब्द म्हणजे ध्वनिविकृतिच होय, असें म्हटलें असतांही बाध येणार नाहीं. तथापि, आणखी सूक्ष्म विचार केला, व तत्वदृष्टीनें पाहिलें, म्हणजे ध्वनि कसा आणि कोणत्या ठिकाणीं उत्पन्न होतो, हें सहजीं लक्षांत येतें. कारण, शब्दगुणच आकाश असल्याविषयीं, कवि, पंडित, व ज्ञाते, यांची समजूत आहे. इतकेंच नव्हें तर, ही गोष्ट श्रुतिप्रमाणभूतही आहे. फार तर काय सांगावें, पण ती सिद्धान्तानें देखील शाबीत ठरत आहे.

ध्वनि हा आकाशाचा गुण, आणि म्हणूनच,

आकाश हें शब्दगुणच आहे, अशाविषयीं कालिदास कवीच्या काव्यांत आणि नाटकांत स्पष्ट उल्लेख आहे.

**अथात्मनः शब्दगुणं गुणज्ञः**
**पदं विमानेन विगाहमानः ।**
**रत्नाकरं वीक्ष्य मिथः स जायां**
**रामाभिधानो हरिरित्युवाच ॥ १ ॥**

( रघुवंश. १३ वा सर्ग. )

**येद्वेकालंविधत्तः श्रुतिविषयगुणायास्थिता व्याप्य विश्वम् ।**

( शाकुन्तल ).

बृहदारण्यकांत सुद्धां यासंबंधीं आधार मिळतो.

**एतस्मिन्नुखल्वक्षरे गार्ग्याकाश ओतश्च प्रोतश्च ।**

( बृहदारण्यक. )

ह्यावरून, शब्द किंवा ध्वनि हा गुण आकाशाचाच असून,

आकाश हें शब्द किंवा ध्वनींचें उत्पत्तिस्थान.

आकाश, अवकाश, अथवा पोकळी, येथेंच तो उत्पन्न होतो, ही गोष्ट निर्विवाद आहे. सबब, जास्त शोध करण्यासाठीं, आपण आणखीही पुढें प्रवेश करूं, आणि ध्वनि कसा निर्माण होतो, कोणत्या आकाशांत हा वायुतरंग उदभवतो, त्याच्या लाटा कशा उसळतात, ह्या लाटांचा आघात कोणत्या प्रकारें होतो, त्यांचें कार्य कोणत्या इंद्रियावर घडतें, व त्यामुळें श्रवणोत्पत्ति कशी होते, या विषयींची तपशीलवार हकीकत थोडक्यांत देऊं.

ध्वनीपासून श्रवण.

वैशेषिक दर्शनांत, १ द्रव्य, २ गुण, ३ कर्म, ४ सामान्य, ५ विशेष, आणि ६ समवाय, या सहा पदार्थांचें वर्णन दिलें असून, द्रव्यांत १ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु, ५ आकाश, ६ काल, ७ दिशा, ८ आत्मा, व ९ मन, यांचा समावेश केला आहे. तथापि, आपला प्रस्तुत विषय ध्वनि आणि श्रवणच असल्यामुळें, सदरहू पदार्थ व तत्वें, यांपैकीं आपल्याला फक्त वायु, आणि आकाश, यांचाच विचार कर्तव्य आहे. वायु हें एक पंचमहाभूतांपैकीं सर्वव्यापी तत्व असून, तें सर्वांस महशूर आहे. आकाश हें देखील एक पंचमहाभूतांपैकींच तत्व होय. हें ध्वनीचें, अर्थात् शब्दाचें सुद्धां, प्रसूतिस्थान आहे; इतकेंच नव्हें तर, तें सर्वव्यापि, नित्य, आणि ह्मणूनच अविनाशी आहे. आतां, कित्येक निमित्तकारणांनीं वातावरणावर प्रहार होऊन, अथवा एखाद्या वारिसमुदायांत दगड टाकल्यामुळें, पाण्यांत ज्याप्रमाणें अनेक लाटा उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें वायूवर सुद्धां अनेक कारणांनीं आघात

होऊन, असंख्य वीचितरंग उद्भवतात; व त्यायोगानें, आकाशाचा नित्य गुण जो शब्द, त्याचा प्रादुर्भाव होण्याला सहजींच अवकाश मिळतो. अर्थात्, **कारणामुळें कार्य** घडत असल्यानें, जावत्कालपर्यंत कारणाला अवकाश नाहीं, तावत्कालपर्यंत कार्य देखील घडून येत नाहीं. आणि म्हणूनच, शब्द किंवा ध्वनि हा जरी **आकाशाचा नित्य** गुण आहे, तरी निमित्ताभावात् तो सदैव **प्रच्छन्नावस्थेंत**, व अतएव **अव्यक्त** असतो; आणि कारण उद्भवल्यावर तो आपोआप तत्क्षणींच **व्यक्त** होतो.

असो. आघातासारख्या निमित्त कारणांनीं शब्द किंवा ध्वनि व्यक्त झाल्यावर, वायूंत वीचितरंग उठतात, व त्याचा प्रवाह कर्णेन्द्रियावर जाऊन एकदम थडकतो. त्यामुळें, ध्वनि आणि श्रोत्रेंद्रिय यांचा संयोग होऊन, मज्जातंतूला तत्काल धक्का पोहोंचतो, व **मन** जागृत झाल्यानें, तें **आत्म्यालाही** लागलींच प्रबोधित करतें. पुढें, **आत्मा** हा शरीरस्थ राजाच असल्यामुळें, तो आपल्या इच्छेप्रमाणें वाचेचे आणि इतर सर्व इंन्द्रियांचे[1] व्यापार चालवितो, व असंख्य घडामोडी करतो.

आतां, **मन** किंवा **आत्मा** जागृत असतांना, इन्द्रियांचे

---

१ ह्या इन्द्रियांत, पांच **ज्ञानेन्द्रियें** व पांच **कर्मेन्द्रियें**, यांचा समावेश होतो. १ कान, २ डोळे, ३ नाक, ४ जीभ, व ५ त्वचा, हीं पंच ज्ञानेन्द्रियें असून, १ गुद, २ उपस्थ, ३ हात, ४ पाय, व ५ वाचा, हीं पंच कर्मेन्द्रियांत मोडतात.

**श्रोत्रंत्वक् चक्षुषी जिव्हा नासिका चैव पंचमी ।**
**पायूपस्थं हस्तपादं वाक्चैव दशमी स्मृता ॥९०॥**
( मनुस्मृति. अ० २.)

**मन** हें ज्ञानेन्द्रियांपैकींच आहे, अशीही कित्येक कल्पना करतात.

इन्द्रियांचे व्यापार चालण्याला, ध्वनीखेरीज अन्य कारणें.

व्यापार चालण्याला केवळ ध्वनिच कारण होतो, असें नाहीं. तर, ध्वनीखेरीज, दुसरीं देखील नानाविधकारणें उत्पन्न होतात, आणि त्या योगानें दैहिक व्यापार एकसारखे चालूच राहतात. उदाहरणार्थ विकारवशतेच्या तीव्र प्रभावानें, अथवा प्रबल इच्छेचें सवेग स्फुरण झाल्यानें, अन्तराकाशांत मनस्तरंगांचा अव्याहत उद्भव होऊन, त्यांचा प्रवाह एकदम वाहूं लागतो. अर्थात्, आपलें मनोगत व्यक्त करण्याची इच्छा अन्तःस्थित चालकाला झाल्यावर, त्याच्या इच्छाशक्तीचा परिणाम मनावर होऊन, हें मन वागिन्द्रियांचीं द्वारें खुलीं करण्याचा एकदम प्रयत्न करितें. त्यायोगानें, हृदाकाशांतील वायु प्रेरित होऊन, वाचेचा आधारस्तंभ जो ध्वनि, त्याचें सहजींच बीजारोपण होतें. आतां, वास्तविक विचार केला तर असें दिसून येईल कीं, वाचेच्या बीजारोपणाची हीच प्रथमावस्था असून, तिला परा हें पारिभाषिक नामधेय आहे. पुढें, ह्या अवस्थेंतल्या वायूचें स्थलांतर व स्थित्यन्तर होऊन, त्याचा द्वितीयावस्थेंत प्रवेश होतो, आणि ह्या स्थितींत त्याला पश्यन्ती म्हणतात. तदनन्तर, इच्छाशक्तीच्या नेटानें, ह्या वायूची एकसारखी प्रगतीच असल्यामुळें, त्याला तिसरी म्हणजे मध्यमावस्था प्राप्त होऊन, तो मुखविवरांत लागलींच शिरतो, आणि बाहेर पडण्याचा प्रयत्न करतो. हें त्याचें चौथें अवस्थान्तर होय, व ह्यालाच वैखरी अशी संज्ञा आहे. ही वैखरी, अथवा हा वायुरूपी ध्वनि, मुखपुटांतून बाहेर पडतांना, त्या

विवरांतील अनेक स्थलें, म्हणजे कंठ, तालु, मूर्धन्, दन्त्य, आणि ओष्ठ्य, ह्यांपैकीं ज्या ज्या स्थानास तो स्पर्श करतो, त्या त्या स्थानाचा उघडच वर्णोच्चार होतो; व हे वर्ण कठिण, मृदु, तीव्र, ऊष्ण, ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत, उदात्त, अनुदात्त, स्वरित, याप्रमाणें जसे कमी ज्यास्त अवसानाचे असतात, त्या मानानें वर्णोच्चारालाही अवश्य तो काल आणि यत्न लागतो.

इच्छाशक्ति, मन, आणि शरीर, यांचा संबंध.

येथें, कदाचित् वाचकास अशी शंका येईल कीं, इच्छाशक्तीचें जें आम्हीं सदरीं एवढें मोठें महत्व सांगितलें, तें तसें असल्याचें, कोणत्याही प्रकारें, केव्हां देखील, बिलकुल भासमान होत नसून, इच्छाशक्तीचा आणि आपल्या शरीराचा काडीमात्र सुद्धां संबंध नाहीं. परंतु, हा आक्षेप केवळ निराधार व निरर्थक आहे, असें पुढील विवेचनावरून वाचकाच्या लक्षांत तेव्हांच येईल.

आपलें अतिसूक्ष्म व अदृश्य मन, आणि आपला स्थूल व जड देह, यांचा इतका निकट संबंध आहे कीं, एकाचा कार्यकारणभाव दुसऱ्यावर आपली अम्मलबजावणी हं हं म्हणता करतो. उदाहरणार्थ, आपल्या मनांत उठावयाचें आलें कीं, आपण लागलींच आसनावरून उठतों. इतकेंच नव्हें तर, अन्य कांहीं व्यापार करण्याविषयीं आपल्या मनाची इच्छा व प्रवृत्ति असल्यास, आपण तो तो व्यापार व क्रिया तत्क्षणींच करूं लागतो. ह्याचें कारण असें कीं, आपल्या मनाचा आणि ज्ञानतंतूंचा अगदींच प्रत्यक्ष संबंध असून, हे ज्ञानतंतू आपल्या एकंदर शरीरांत सर्वत्र पसर-

लेले असतात. त्यामुळें, कोणतीही गोष्ट मनांत आल्याबरोबर, त्याचा परिणाम इच्छिलेल्या ठिकाणच्या ज्ञानतंतूवर एकदम घडून, त्याप्रमाणें तावडतोब कार्य होतें. अर्थात्, इच्छाशक्तीचें हें अशा प्रकारचें प्राबल्य झाल्यानेंच तिचा मनावर संस्कार घडतो, व ह्याचा धक्का ज्ञानतंतूंस लागून, ते त्या त्या इन्द्रियाकडून ईप्सित व्यापार आणि अभिलषित क्रिया करवून घेतात.

ह्या मीमांसेसंबंधीं आमच्या पूर्वजांचे प्रयत्न.

ह्या संबंधानें, आमच्या पूर्वजांनीं फार प्राचीन काळीं देखील इतक्या बारकाईनें व शोधकबुद्धीनें विचार केला होता कीं, त्याबद्दल त्यांची जेवढी म्हणून स्तुति करावी तेवढी थोडीच. स्वरशास्त्र, ध्वनिविवेचन, आणि श्रवणोत्पत्ति, याबद्दलचा तपशिलवार ऊहापोह प्रातिशाख्य सूत्रांत केला असून, पाणिनीच्या शिक्षेंतही तद्विषयक साद्यन्त विवेचन केलें आहे. सबब, वाचकांच्या सोईसाठीं, त्यांतील अवश्य तितका उतारा येथें देतों:—

**आत्मा बुध्या समेत्यार्थान्मनो युंक्ते विवक्षया ।**
**मनःकायाग्निमाहन्ति स प्रेरयति मारुतम् ॥ ६ ॥**
**मारुतस्तूरसिचरन् मन्द्रं जनयति स्वरम् ।**
**प्रातः सवनयोगन्तं छन्दोगायत्रमाश्रितम् ॥७ ॥**

शिक्षा. (पुढील भाग ६ वा पहा.)

शब्द आणि अर्थ, व त्याचा उपयोग.

अस्तु. आपलें मनोगत प्रकट करण्यासाठीं ज्या इच्छाशक्तीच्या योगानें वायु प्रेरित झाला; ज्या वायूमुळें ध्वनि उद्भवला; ज्या

ध्वनीमुळें शब्द उदयास आला; त्या शब्दाचें महत्व, त्याची खरी योग्यता, त्याचा अर्थ, आणि त्याचा उपयोग, यांविषयीं येथेंच थोडीशी मीमांसा केली पाहिजे.

शब्दार्थांचें नित्यत्व व त्याबद्दल,

शब्द व अर्थ यांचा इतका निकटसंबंध आहे कीं, एकांतच दुसऱ्याचा अंतर्भाव होतो; व एकाचा उच्चार झाला, ह्मणजे दुसऱ्याची व्यंजकताही सहजींच दिसून येते. किंबहुना, पट आणि तंतू, अथवा गूळ आणि गोडी, यांच्यांत जसें दुजेपण राहणें शक्य नाहीं; किंवा,

**सुखदुःखाचा बांधा ॥ जैसा जोडफळाचा सांधा ॥**
**निमंत्रण दिलिया अंधा ॥ सवेंची दोघे येती ॥**

हें जसें शब्दशः खरें आहे, त्याचप्रमाणें शब्द व अर्थाचें असून, त्यांची ताडातोड केव्हांही करितां येत नाहीं; व ते एकमेकांपासून कधीं देखील वेगळे होतच नाहींत.

कवि आणि मीमांसकारांचें मत.

ह्या शब्दार्थाचा कसा एकजीव आहे, आणि ते एकमेकांत कसे अन्तर्धान पावले आहेत, हें कालिदास कविकुला-वतंसानें थोडक्यांत, परंतु अगदीं स्पष्टपणें दाखविलें आहे.

**वागर्थाविवसंपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।**
**जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ ॥ १ ॥**

(रघुवंश. १ ला सर्ग.)

आमच्या **मीमांसकारांनीं** तर, ह्यासंबंधानें एका स्वतंत्र सूत्राचीच योजना करून, शब्दार्थाचा परस्पर संबंध केवळ नित्यच असल्याचें सिद्ध केलें आहे.

**औत्पत्तिकस्तु शब्दस्यार्थेन संबंधस्तस्यज्ञानमुपदशोऽव्यतिरेकश्चार्थेनुपलब्धेतत् प्रमाणंबादरायणस्यानपेक्षत्वात् ॥ ५॥**

( मीमांसादर्शन. अ० १. पा० १. सू० ५. )

ह्या महत्वाच्या सूत्राचा भावार्थ इतकाच कीं, **शब्दाचा** व **अर्था**चा परस्पर संबंध नित्य आहे. ह्या नित्यसंबंधाचें जें ज्ञान तोच उपदेश असून, त्या उपदेशाला कधींच विपर्यय नाहीं. मात्र, अर्थाच्या अज्ञानानें विपर्यास होतो. यासाठीं, **बा**दरायणाच्या मताप्रमाणें उपदेश प्रमाण आहे. कारण, त्याला प्रत्ययान्तराची अथवा दुसऱ्या ज्ञानाची अवश्यकताच नाहीं.

ह्यावरून, **शब्दोच्चार** होतांच **अर्थ** उत्पन्न होतो, हें प्रतिपादन मीमांसकारांनीं सिद्ध केलें आहे. म्हणजे, शब्दोच्चाराला अर्थावांचून गतिच नाहीं, हें उघड होय.

शब्दाचें मूल्य.

तात्पर्य, **शब्दाचा** अर्थ **नित्य** असल्याकारणानें, त्याचें मूल्य, त्याचें महत्व, आणि त्याची उपयुक्तता, हीं निःसंशय अपूर्व आहेत; व यासाठींच, **प्रभा**कर **भट्टा**दि मीमांसकांनीं, मीमांसेंतील सहा[1] प्रमाणांतच **शाब्दा**ची देखील गणना केली आहे.

---

१ हीं सहा प्रमाणें खालीं लिहिलेलीं होतः—

१ प्रत्यक्ष, २ अनुमान, ३ उपमान, ४ **शाब्द**, ५ अर्थापत्ति, व ६ अभाव.

**मा**धवाचार्योनीं आपल्या **जै**मिनीय **न्याय**मालाविस्तारांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, १ **प्रत्यक्ष** व २ अनुमान, हीं धर्मविचारांत प्रमाणेंच नाहींत.

तथापि, शब्द अनित्य आहे, अशा आशयाचा पूर्वपक्ष[1] जैमिनीनें केवळ विवाद हेत्वर्थंच स्वीकारून, त्याचें त्यानें खंडनही केलें आहे. आणि ज्यापेक्षां, एतद्विषयक ऊहापोह भाषाशास्त्राच्या दृष्टीनें विशेष महत्वाचा दिसतो, त्यापेक्षां, त्यांतील मुद्याच्या गोष्टींचें येथें थोडेंसें तरी दिग्‌दर्शन झालेंच पाहिजे, हें अगदीं रास्त होय.

शब्दाच्या अनित्यत्वासंबंधीं पूर्वपक्ष.

आतां, शब्दाची अनित्यता ठरविण्यासाठीं, कित्येक असें प्रतिपादन करितात कीं, शब्द हा कर्म[2] आहे. म्हणजे, तो कृतीनें उत्पन्न होतो. अर्थात्, तो उच्चार केल्यानें अस्तित्वांत येतो; व तो उच्चारिताक्षणींच[3] ( शब्दध्वनी ) नाश पावतो. यासाठीं, शब्द अनित्य समजावयाचा. दुसरें कारण असें कीं, शब्दाच्या मूळरूपांत भेद[4] किंवा विकृति होते, आणि वृद्धिही[5] झालेली दिसते. उदाहरणार्थ, "**स्थि**ति" व "**अन्तर**" ह्या दोन शब्दांचें प्रथमचें स्वरूप, अथवा

---

१ जैमिनीच्या विचारसरणीचें विवेचन करतांना **मा**धवाचार्यांनीं एका प्रकरणाचें नांव अधिकरण असें ठेविलें आहे. ह्या अधिकरणाचे पांच घटकावयव खालीं लिहिल्याप्रमाणें होत :—

१ विषय, २ संशय, ३ संगति, ४ पूर्वपक्ष, आणि ५ सिद्धान्त. ह्यांपैकीं, पूर्वपक्ष म्हणजे विरुद्ध पक्षाचें प्रतिपादन होय, असें समजावें.

२ **कर्मैके तत्र दर्शनात्** ॥ ६ ॥ ( अ० १. पा० १. पूर्व-मीमांसा. )

३ **अस्थानात्** ॥ ७ ॥ ( अ० १. पा० १. पू० मी० ).

४ **प्रकृतिविकृत्योश्च** ॥ १० ॥ ( अ० १. पा० १. पू० मी० ).

५ **वृद्धिश्च कर्तृभूम्नास्य** ॥ ११ ॥ ( अ० १. पा० १. पू० मी० ).

मूलप्रकृति एका प्रकारची असून, त्यांचा संधि होताच त्यांच्या रूपांत " स्थित्यन्तर " अशी विकृति होते. त्याचप्रमाणें, अनेक मनुष्यांनीं एकच शब्द उच्चारला असतां, त्याचा अनेकपटीनें उच्चार मोठा होतो. अर्थात्, त्या शब्दाची वृद्धि होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण, ज्या वस्तूची वृद्धि किंवा क्षय होतो, ती वस्तु अनित्य होय. सबब, शब्दही अनित्यच समजला पाहिजे, असा प्रतिपक्षाचा आरोप आहे.

उत्तरपक्ष, अथवा पूर्वपक्षाचें खंडण.

तथापि, ह्या कोटीक्रमाचें खंडण जैमिन्याचार्य मोठ्या खुबीनें क्रमशः करितात, आणि असें ह्मणतात कीं, उच्चार केल्यानंतर शब्द प्रकट झाला असें जर तुमचें ह्मणणें असेल, तर तुमच्याच प्रतिपादनावरून तो प्रकट होण्यापूर्वीं गुप्त होता, ही गोष्ट सहजींच निष्पन्न होते. अर्थात्, ह्या विचारसाम्यानें[1] शब्दाचें नित्यत्व सिद्ध झालें, हें उघड आहे. आतां, शब्दगुणासंबंधीं विचार करितां असें दिसून येतें कीं, शब्द हा गुण आकाशाचा असून, तो नित्य[2] आहे. मात्र, आघातासारख्या निमित्त कारणानें तो व्यक्त होतो; नाहीं तर, तो केवळ प्रच्छन्नावस्थेंतच असतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं. किंबहुना, प्रयोगानंतर[3] त्याचें ज्ञान होतें, असें ह्मटलें असतांही चालेल.

---

१ **समंतुतत्र दर्शनम्** ॥ १२ ॥ (अ० १. पा० १. पू०मी०).

२ **सतः परम् अदर्शनं विषयानागमात्** ॥ १३ ॥ (अ० १. पा० १. पू० मी० )

३ **प्रयोगस्य परम्** ॥ १४ ॥ ( अ० १. पा० १. पू० मी० ).

शिवाय, सूर्याप्रमाणेंच[1] एकसमयावच्छेंकरून शब्द हा सर्वत्र असतो; आणि फक्त वर्णांत फेरबदल झाल्यानेंच वर्ण-विकृति[2] होत नाहीं; हें उघड आहे. त्याचप्रमाणें, शब्द किंवा ध्वनि लहान मोठा नसून, त्याला अवयवही नाहींत. मात्र, त्याचें अणुत्व किंवा महत्व[3] कर्णाकाशाच्या विसृत व संकुचितावस्थेवर अवलंबून असतें; व ह्मणूनच त्याची वृद्धि अगर क्षीणता संभवत नाहीं. ह्या सर्व कारणांवरून, शब्द हा नित्य असल्याचें उघड होत.

ह्यासंबंधानें आणखी एक गोष्ट विशेष रीतीनें लक्षांत ठेवावयास पाहिजे आहे. ती ही कीं, शब्दोच्चार होतांच शब्दध्वनि नाहींसा होतो, व लयास जातो. त्यावरून, केवळ शब्दोच्चारानें किंवा शब्दश्रवणानेंच कोणताही कार्यभाग होत नाहीं. तर, जेव्हां ज्ञान उत्पन्न होतें, तेव्हांच त्याच्या-योगानें कार्य घडतें. ह्यावरून शब्दध्वनीला परार्थत्व[4] आहे, असें उघड दिसतें. अर्थात्, जरी उच्चारलेला ध्वनि नाहींसा होतो, तरी त्यापासून झालेलें ज्ञान नित्यच आहे, असा भावार्थ होय.

शब्दाच्या नित्यत्वाविषयीं शंकराचार्यांचें मत.

त्याचप्रमाणें, शंकराचार्यांनीं देखील शब्दाचें नित्यत्व मोठ्या जोरानें आणि सयुक्तिक रीतीनें प्रतिपादन केलें आहे. बादरायणाच्या ब्रह्म ( शारीरिक अथवा वे-

---

१ **आदित्यवद्यौगपद्यम्** ॥१५॥ (अ० १. पा० १. पू०मी०).
२ **वर्णान्तरमविकारः** ॥ १६ ॥ (अ० १. पा० १. पू०मी.).
३ **नादवृद्धिपरा** ॥ १७ ॥ ( अ० १. पा० १. पू० मी० ).
४ **नित्यस्तुस्याद्दर्शनस्य परार्थत्वात्** ॥ १८ ॥ ( अ० १. पा. १. सू. १८ पू. मी. )

दांत ) सूत्रावर, आचार्यमजकूरनीं "शारीरिक मीमांसाभाष्य" नांवाची टीका केली असून, तींत ते असें ह्मणतात कीं,—

आकृतिभिश्च शब्दानां संबंधो न व्यक्तिभिः ॥
व्यक्तीनामानंत्यात्संबंधग्रहणानुपपत्तेः ।

व्यक्तिषूत्पद्यमानास्वप्याकृतीनां नित्यत्वान्नगवादि शब्देषु कश्चिद्विरोधो दृश्यते । * * * तस्मान्नित्याच्छब्दात्स्फोटरूपादभिदायकात् क्रियाकारक फललक्षणं जगदभिधेयभूतं प्रभवतीति ।.... ततश्च नित्येभ्यः शब्देभ्यो देवादिव्यक्तीनां प्रभव इत्य विरुद्धम् । ( सूत्र १. ३. २८. )

भाषाशास्त्राच्या कामीं आर्य हिंदूंचे परिश्रम व त्यांचे पाश्चात्यांनीं केलेलें अभिनंदन.

अशा प्रकारचे आमच्या आर्यऋषींचे अश्रांत श्रम व अपूर्व ज्ञानाभिरुचि पाहून, पाश्चात्य विद्वान देखील सकौतुकाश्चर्य माना डोलवितात. सेस्नें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

" *Far more thorough going* and *scientific were the phonological labours and classification* of the Hindu Pràtishàkhyas......While the Greeks *never got beyond the belief* that the tongue, teeth, and lips were the sole instrument of pronunciation, the *Hindus had carefully analysed the organs of speech some centuries before the Christian Era,* and *composed* phonological treatises *which may favourably compare with those of our own day,*"

( Introduction to the science of Language. vol. I P. P. 244-245. )

ज्या पूर्वमीमांसेंत शब्दाविषयीं फार महत्वाची चर्चा केली आहे, आणि जींत शब्दाचा अर्थ नित्य असल्याबद्दलचें केवळ अमूल्यच प्रतिपादन आहे, तत्संबंधीं पाश्चात्य पंडित **मॉक्समूलर** असें लिहितो कीं,

" To me, Mimansaka discussions *are extremely attractive*, and *for accuracy of reasoning, they have no equal any where..* "

( Sd. ) F. Max. Muller. M. A.

Chateau Mollens.
Morges.
Switzerland.
21st June 1877.

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

पतंजलिकृत महाभाष्यांत केलेली शब्दांची व्याख्या.

असो. शब्दांचें विवेचन, त्यांच्या अर्थाची मीमांसा, व त्यांच्या सामर्थ्याचा ऊहापोह, इत्यादिविषयीं **पतंजलीच्या**[1] **महाभाष्यांत** देखील बरीच चर्चा केलेली आढळते. आणि त्यावरून असें दिसून येतें कीं, शब्द म्हणजे केवळ द्रव्य नव्हें, किंवा क्रिया नव्हे; गुण नव्हे, अथवा आकृति नव्हे. तर, ज्याच्या योगानें ह्या सर्वांचा, किंबहुना, प्रत्येक पदार्थ, वस्तु, संज्ञा, विकार, स्थिति, अगर मनोवृत्तीचा बोध होतो, तोच शब्द होय. अर्थात्, ज्या ध्वनीमुळें वरील सर्व गोष्टी व्यक्त होऊन, त्यांचा आपल्याला प्रत्यय येतो, तो ध्वनीच शब्द होय, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

ह्यासंबंधानें भाष्यकार **पतंजलीचें** प्रतिपादन विशेष महत्वाचें दिसतें. सबब, तें येथें थोडक्यांस देतों. **भाष्यकार** म्हणतात:—

---

१ पतंजलीचा काल इ. स. पूर्वी १४३ वर्षें असल्याचें कळून येतें.

अथ गौरीत्यत्रकः शब्दः । किंयत्तत्सास्नालांगूलककुदखुरविषाण्यर्थरूपं सशब्दः । नेत्याह । द्रव्यंनामतत् । यत्तर्हि तदिंगितं चेष्टितं निमिषितं सशब्दः । नेत्याह । क्रियानामसा । यत्तर्हितच्छुक्लोनीलः कृष्णः कपिलः कपोत इति सशब्दः । नेत्याह । गुणोनामसः । यत्तर्हितद्भिन्नेष्वभिन्नं छिन्नेष्वछिन्नं सामान्यभूतं सशब्दः । नेत्याह । आकृतिर्नामसा । कस्तर्हिशब्दः । येनोच्चारितेन सास्नालांगूलककुदखुरविषाणिनां संप्रत्ययो भवति सशब्दः । अथवा प्रतीतपदार्थकः । लोके ध्वनिः शब्द इत्युच्यते । तद्यथा । शब्दंकुरु । माशब्दंकार्षीः । शब्दकार्ययं माणवक इति । ध्वनिं कुर्वन्नेवमुच्यते । तस्माध्द्वनिःशब्दः ।

(पतंजलिकृतव्याकरणमहाभाष्यम् । अ० १. पा० १. अ० १.)

भरतखंडाची इतर राष्ट्रांशीं तुलना.

ह्यावरून, कार्थेज, व रोमसारखीं पुराण राष्ट्रें; व ज्ञानाचारसंपन्न असल्यामुळें मी मी म्हणविणारा प्राचीन ग्रीस देश; आणि त्याहीपेक्षां प्राचीनतर असे चाल्डिया, आसीरिया, सीरिया, बॉबिलन, मिसर, इत्यादि देश; यांच्यामानानें पाहिलें म्हणजे, आमचें आर्यावर्त सर्वांत प्राचीनतम असूनही, तें अति पुरातन काळीं सुद्धां, विद्या, शास्त्र, कला, व सुधारणा, यांत विशेष अग्रेसर आणि फारच पुढें सरसावलेलें होतें यांत तिळमात्रही शंका नाहीं.

आमच्या आर्य पूर्वजांनीं भाषेचें जाणलेलें महत्व.

असो. आतां, भाषा म्हणजे वाचा, अगर वाक् होय; आणि हिचें महत्व, हिचा कार्यभाग, व हिची शक्ति, हीं सर्व आमचे आर्यपूर्वज फार प्राचीन काळापासूनच जाणून

होते, असें अनेक प्रमाणांनीं, व विशेषतः ऐतिहासिक पुराव्यानें, अगदीं शाबीत करून देतां येण्यासारखें आहे. अतिपुरातनकाळीं देखील, ह्या वाचेचें जें गौरव आमच्या हृदयांत वास करीत असे, किंवा तिच्यासंबंधानें जी विलक्षण धन्यता आम्हांला वाटत असे, तशी ह्या भूतलावरील अन्य कोणत्याही राष्ट्राला वाटली असल्याचें आढळून येत नाहीं. निदान, प्राचीनकाळीं, किंवा प्राक्कालीन नांवाजलेल्या राष्ट्रांत तरी, हिचें मनोभावानें गौरव करणारें, अथवा तिचा महिमा जाणणारें एकही राष्ट्र होतें, असें दिसत नाहीं.

शब्दांचें स्वरूप, वाचेचें मूल्य, आणि भाषेची किंमत, हीं समर्थासारख्या विरक्त व साधु पुरुषास देखील पूर्णपणें माहीत होती. इतकेंच नव्हे तर, त्यांनीं तद्विषयक यथोचित वर्णन सुद्धां मोठ्या मार्मिकतेनें केलें आहे. कारण, एके ठिकाणीं ते असें म्हणतात कीं,

> **कीं हे शब्दरत्नाचे सागर ।**
> **कीं हे मुक्तांचें मुक्तसरोवर ॥**
> **नानापुरींचें वैरागर ।**
> **निर्माण जाहले ॥**
> **कीं हे अध्यात्मरत्नाची खाणी ।**
> **कीं हे बोलके चिन्तामणी ॥**
> **नाना कामधेनूची दुभणी ।**
> **वोळली श्रोतयांवरी ॥**
> **कीं हे कल्पनेचे कल्पतरु ।**
> **कीं हे मोक्षाचे पडिभरू ॥**
> **नाना सायुज्यतेचे विस्तारू ।**
> **विस्तारले ॥**

कीं हे अमृताचे मेघ वोळले ।
कीं हे नवरसाचे वोघ लोटले ॥
नाना सुखांचें उचंबळले ।
सरोवर हें ॥
कीं सुखाचीं तारवें लोटलीं ।
अक्षय आनंदें उलटलीं ॥
विश्वजनांसीं उपयोगा आलीं ।
नाना उपयोगां कारणें ॥

वागदेवीचें वर्णन करतांना श्रीरामदासस्वामींनीं आणखी एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

आतां वंदीन वेदमाता ।
श्रीशारदा ब्रह्मसुता ॥
शब्दमूळ वाग्देवता ।
महामाया ॥ १ ॥
जे उठवी शब्दांकुर ।
वदे वैखरी अपार ॥
जे निःशब्दाचें अभ्यन्तर ।
उकलूनी दावी ॥ २ ॥

*    *    *

ऐशी बहुवेशें नटली ।
माया शारदा एकली ॥
सिद्धचि अंतरीं संचली ।
चतुर्विध प्रकारें ॥ १३ ॥
नानाविद्या कळासिद्धि ।
नाना निश्चयाची बुद्धि ॥

ते सूक्ष्म वस्तूची शुद्धि ।
ज्ञप्तिमात्र ॥ २१ ॥

(दासबोध १-३.)

ह्या समर्थांचा उदयकाळ म्हटला म्हणजे, इ० स० चें सतरावें शतक होय.

तद्विषयक श्रीधरोक्ति. वाचा कोठें व कशी उत्पन्न होते, याविषयीं श्रीधरस्वामिनीसुद्धां एके ठिकाणीं वर्णन केलें आहे. ते म्हणतात,

या सा मित्रा वरुणसदनादुच्चरन्ती त्रि पष्टिं
वर्णानन्तः प्रकटकरणैः प्राणसंगात् प्रसूते ।
तां पश्यन्तीं प्रथममुदितां मध्यमां बुद्धिसंस्थां
वाचं वक्त्रे करणविशदां वैखरींच प्रपद्ये ॥

हे श्रीधरस्वामी फारच विद्वान असून, ते इ० स० च्या सोळाव्या शतकांत उदयास आले असावेत, असें वाटतें.

राजा भोजदेवानें वाग्देवीचा प्रभाव मनांत आणून, तिला नमन केलें; आणि सरस्वती कंठाभरणांत तिला आदिस्थान दिलें. आतां, हा राजा इ० स० च्या अकराव्या[1] शतकांत उदयास आला असल्याचें समजतें; व त्यावरून, तितक्या-पुरातनकाळीं देखील, भाषाशास्त्रासंबंधीं बरीच चळवळ आणि हालचाल आमच्या भरतखंडांत सुरू झाल्याचें भासमान होतें.

ध्वनिर्वर्णाः पदं वाक्यमित्यास्पद चतुष्टयम् ।
यस्याः सूक्ष्मादिभेदेन वाग्देवीं तामुपास्महे ॥१॥

(सरस्वती कंठाभरणं. १ परिच्छेदः)

[1] Weber's History of Sanskrit Literature. P. 210 Note 220.

सूतसंहितेवर टीका करतांना, माधवांनीं आचार्यांच्या श्लोकाचें अवतरण, आपल्या प्रकृत विषयाच्या पुष्टीकरणार्थ केलें आहे; आणि त्यांतही वर्णात्मक वाचेच्या उत्पतीचें स्थान, व तिच्या उद्गमाचे प्रकार सांगितले आहेत.

आचार्य मत.

**मूलाधारात्प्रथममुदितो यस्तु भावः पराख्यः**
**पश्चात्पश्यंत्यथ हृदयगो बुद्धियुङ्मध्यमाख्यः ।**
**वक्त्रेवैखर्यथ रुरुदिषोरस्यजन्तोः सुषुम्णां**
**बद्धस्तस्माद्भवति पवनः प्रेरितो वर्णसंज्ञः ॥**

श्रीशंकराचार्यांचा काळ म्हटला म्हणजे, इ० स० चें आठवें शतक होय.

तसेंच, ह्या वाग्देवीच्या प्रचंड प्रभावाबद्दल भवभूति कवीस मोठी धन्यता वाटून, त्यानें आपल्या सुप्रसिद्ध व जगन्मान्य उत्तररामचरित नाटकांत, तिच्याविषयीं मोठ्या गौरवानें आणि आदरपूर्वक लिहिलें आहे.

भवभूतीची उक्ति.

**कामान् दुग्धे विप्रकर्षत्यलक्ष्मीं**
**कीर्तिंसूते दुष्कृतं या हिनस्ति ।**
**तांचाप्येतां मातरं मंगलानां**
**धेनुं धीराः सूनृतां वाचमाहुः ॥**

( उत्तररामचरित. अंक ५ )

हा कविपुंगव इ० स० च्या आठव्या शतकांत उदयास आला असून, त्याच्याही पूर्वी आणखी एका रसिक व मर्मज्ञ कवीनें, ह्या वाग्देवीच्या संबंधानें लिहून, तिला सर्व भूषणांच्या अगदीं शिरोभागींच बसविलें आहे.

वाणीच्या संबंधानें भर्तृहरीचा अभिप्राय.

केयूरा न विभूषयन्ति पुरुषं हारा नचन्द्रोज्ज्वला
न स्नानं न विलेपनं न कुसुमं नालंकृता मूर्धजाः।
वाण्येका समलं करोति पुरुषं या संस्कृता धार्यते
क्षीयन्ते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणम् ॥
(भर्तृहरिकृत नीतिशतक.)

ह्या कविवराचा काळ अद्यापि निश्चित झालेला नाहीं. तथापि, हा भर्तृहरि विक्रमादित्याचाच भाऊ असून, तो इ० स० पूर्वीच्या पहिल्या शतकांत उदयास आला होता, असें कित्येकांचें मत आहे. तेव्हां अर्थात्च, त्याला होऊन आज जवळ जवळ दोन हजार वर्षें झालीं, हें उघड आहे. सबब, तितक्याही पुरातनकाळीं, भाषेच्या संबंधानें आमचे किती उदात्त विचार असत, हें कोणाच्याही लक्षांत सहजीं येईल.

तद्विषयक अथर्व-वेदांतील वर्णन.

पण भाषेचें खरें स्वरूप, आणि वाचेचा नितान्त महिमा, यांचा पूर्ण संस्कार आमच्या पूर्वजांच्या हृत्पटिकेवर, भर्तृहरीच्याही पूर्वी अनेक शतकें झाला होता, यांत लेशमात्र देखील शंका नाहीं. कारण, त्याचें प्रत्यक्ष प्रमाण, अथर्ववेदासारख्या पुराणतर ग्रंथांतच आपणांस उपलब्ध होतें.

अथर्ववेदांत भाषेला दैवतपदाप्रत चढविलें असून, तिला वाग्देवी अशी संज्ञा दिली आहे;

---

१ भर्तृहरीच्या कालाबद्दल कैलासवासी नामदार काशिनाथ त्र्यंबक तेलंग यांनीं पुष्कळ ऊहापोह केला आहे. (ह्यांनीं संशोधन केलेलें शतक पहा.)

Vide also Max Muller's "What can India Teach us?" First Edition. P. P. 310-338 @ 350.

इयं या परमेष्ठिनी वाग्देवी ब्रह्मसंशिता ।
ययैव ससृजे घोरं तयैव शान्तिरस्तुनः ॥ ३ ॥
( अथर्ववेद. १९, ९. )

अथर्ववेदाचा काळ इ० स० पूर्वी सुमारें दोन हजार वर्षांवर असावा असें दिसतें; तथापि, कित्येक पाश्चात्यांच्या मतें, तो इ० स० पूर्वी एक हजार वर्षांवरच असल्याचें होतें. यजुर्वेदाचा काळ इ० स० पूर्वी पंधराशें वर्षांवर असल्याविषयीं, सर. विल्यम जोन्सचा[1] अभिप्राय आहे. आणि त्याच सुमाराला अथर्ववेदाची रचना झाली असावी, असें मानण्यास अनेक कारणें आहेत. वेबरच्या[2] मतें ब्राह्मणकाळांतच अथर्ववेद रचले गेले; आणि तसें मानलें तरी, त्या गोष्टीला आज तीन हजार वर्षांवर होऊन गेलीं, हें निर्विवाद आहे.

भाषेच्या उत्पत्तीविषयीं श्रीमद्भागवतांतील वर्णन.

वाचा कशी उत्पन्न झाली, याविषयीं श्रीमद्भागवतांत देखील वर्णन आहे.

स एषजीवो विवर प्रसूतिः
प्राणेन घोषेण गुहां प्रविष्टः ।
मनोमयं सूक्ष्म मुपेत्यरूपं
मात्रा स्वरोवर्ण इति स्थविष्ठः ॥

श्रीमद्भागवत आणि महाभारत अशीं श्रीवेदव्यास ऋषींनीं रचलीं असून, महाभारताचा काळ[3] इ० स० पूर्वी दोन हजार वर्षें असल्याचें दिसतें; व त्यावरून, भाषेवि-

---

१ Asiatic Researches.

२ History of Sanskrit Literature.

३ भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पु. २ रें. पान १७१ ते २०४ पहा.

षयीं आमची कल्पना किती प्राचीन आहे, हें वाचकाच्या ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं.

ह्यावरून, वाग्देवीची धन्यता आमच्या आर्यपूर्वजांस फार प्राचीनकाळीं देखील वाटत असे, हें चांगलें व्यक्त होईल.

पण अथर्ववेद आणि भागवत, यांच्याही पूर्वीं, आमचे सुविख्यात पूर्वज भाषेच्या महत्वाला जागरूक होते, व ती गोष्ट ऋग्वेदांतील ऋचांवरून स्पष्टच दिसून येते.

त्यासंबंधाचा ऋग्वेदांतील उल्लेख.

ऋग्वेदांत वाचेची व्यापकता, तिचें जन्मस्थान, आणि तिचें महत्व सांगितलें आहे; ( ऋ. मं. १०. १२९ ), व बहुतेक त्याचाच अनुवाद अथर्ववेदांतसुद्धां केला आहे.

**अहमेव स्वयमिदं वदामि जुष्टं देवानामुत मानुषाणाम्**
**यंकामये तं तमुग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तमृषिं तं सुमेधाम ३**
**अहंरुद्राय धनुरातनोमि ब्रह्मद्विषे शरवे हन्तवाउ ।**
**अहंजनायसमदं कृणोम्यहं द्यावा पृथिवी आविवेश ९**
**अहंसुवे पितरमस्यमूर्धन्मम यो निरप्स्व १ न्तः समुद्रे**
**ततोवितिष्ठे भुवनानि विश्वोतामूं द्यां वर्ष्मणोप स्पृशामि**
**अहमेववातइव प्र वाम्यारभमाणा भुवनानि विश्वा ७**
**परो दिवो पर एना पृथिव्यैतावती महिम्ना संबभूव ८**

( अथर्ववेद. ४-३० ).

---

१ ऋग्वेदाचा काल इ० स० पूर्वी चार हजार वर्षांपासून सहा हजार वर्षेपर्यंत असल्याचें, रा० रा० बाळ गंगाधर टिळक यांनीं आपल्या मृगशीर्ष नामक पुस्तकांत सिद्ध केलें आहे.

भारतीय साम्राज्य, पुस्तक २ रें, प्रस्तावना; पान २।३ व भाग १३ वा, पान ८७ पहा.

Vide also Mr. Tilak's " Orion. "

authorities not chronologically arranged



प्राक्कालीन सर्व राष्ट्रांत आर्य हिंदूंचें भाषाज्ञानाविषयीं अग्रेसरत्व.

भाषा ही खरोखरच ईश्वराची एक अपूर्व देणगी आहे, याविषयीं तिळमात्रही शंका नसून, कोणत्याही प्रकारें मतभेद देखील नाहीं. आणि तिचें खरें व यथान्याय गुणग्रहण आमच्या सन्माननीय पूर्वजांकडून इतक्या प्राचीनकाळीं सुद्धां झालें होतें, याबद्दल त्यांचें निःसंशय अभिनंदनच केलें पाहिजे. इतर प्राक्कालीन राष्ट्रें पाळण्यांत लोळून झोंप घेत असतां, व कित्येक **मी मी** ह्मणविणाऱ्या सुधारलेल्या रा-

---

१ पाश्चात्य देशांत, ईजिप्त ( मिसर ) देश हा फार पुरातन असल्याविषयीं कित्येकांची समजूत आहे. तथापि, त्यानें व तदनंतरच्या **चाल्डिया**, **बाबिलन्**, **ग्रीस**, **रोम**, इत्यादि सर्व देशांनीं, आमच्या **आर्यमा**तेच्या पादकमलाजवळच, तिचें वार्धक्य, श्रेष्ठत्व, आणि तिचा महिमा जाणून, सादर व सविनय, उभें राहिलें पाहिजे; आणि **पा**श्चात्यांस सुद्धां ती गोष्ट कबूल आहे. त्यासंबंधानें **थार्नटन्** इतिहासकार असें लिहितो कीं,

" *Ere yet* the Pyramids looked down upon the valley of the Nile—when Greece and Italy, those cradles of *Modern* civilization, housed only the tenants of the wilderness,—India was the *seat of wealth* and *grandeur*. "

( Thornton's History of India ).

आनि बिझांट बाई म्हणतेः—

" India *older than* Greece or Rome—India that *was old before* Egypt *was born*—India that *was ancient before* Chaldea *was dreamed of*—India that went back *thousands of Centuries before* Persia *had Come to the front*. "

( Mrs. Annie Besant on India and its Mission ).

सदहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

ष्ट्रांचा जन्मही नव्हता अशा वेळीं, आह्मी उन्नतीच्या उच्च-कोटीप्रत पोहोंचलों होतों, ही गोष्ट आम्हां हिंदूंच्या आकलन शक्तीची पूर्ण द्योतक होय; आणि हरएक प्रकारच्या शास्त्रान्वेषणांत व कलानिर्माणांत आमचे पूर्वज हे यच्चावत् प्राक्कालीन राष्ट्रांत श्रेष्ठ व अग्रेसर होते, याबद्दल आम्हांस अभिमान, कौतुक, व आनंद वाटावा, हें अगदीं स्वाभाविक आहे.

आमच्या प्राक्कालीन ऋषींनीं भाषेची केलेली सेवा,

ऋग्वेदानन्तर बराच काळ लोटल्यावर, यास्क उदयास आला, व त्यानें निरुक्त केलें. निरुक्त म्हणजे कठिण आणि दुर्बोध अशा वेद शब्दांवरील टीका होय, व हिचा काल पाणिनीच्या अगोदरचा आहे, याविषयीं मुळींच शंका किंवा मतभेद नाहीं. पाणिनीचा काल इ० स० पूर्वी ३०० वर्षांवर असावा, असें वेबर[1] प्रभृतींचें म्हणणें असून, डा. भांडारकरांच्या[2] मतें, तो इ० स० पूर्वी ७०० वर्षें, आणि पंडित सत्यव्रत[3] सामश्रमीच्या अभिप्रायाप्रमाणें, इ० स० पू. २४०० वर्षें, असल्याचें होतें.

व त्यांच्या तुलनेनें इतर सर्व राष्ट्रांचें अज्ञान.

ह्या निरुक्तांत शब्दव्युत्पत्तिविषयक एक लक्षांत ठेवण्यासारखा वादविवाद प्रथमारंभींच असून, तो खचितच फार महत्वाचा आहे. त्यावरून, आमच्या भरतखंडांत फार प्राचीनकाळींसुद्धां, भाषाशास्त्रासंबंधी कशी व किती उदात्त चर्चा चालत असे,

---

[1] History of Sanskrit Literature.

[2] Early History of the Dekkan.

[3] Inttroduction to Nirukta.

याचें पाश्चात्य पंडितांसही मोठें कौतुक वाटून, ते साश्चर्य मान डोलावितात. इतकेंच नव्हें तर, त्यामानानें, यूरोपखंडांत फार नांवाजलेला असा प्राचीन ग्रीसदेशही किती मूढावस्थेंत आणि बाल्यदशेंत होता, याविषयीं देखील ते निःशंकपणें खरे उद्गार काढतात.

ह्यासंबंधानें मॅक्समूलर ह्मणतोः—

" There are some discussions in the beginning of the Nirukta, which are of the highest interest with regard to Etymology. While in Greece, the notions of one of her greatest thinkers, as expressed in the Cratilus, represent tho very infancy of Etymological science, the Bràhmans of India had treated some of the vital problems of Etymology with the utmost sobriety. "

( Muller's Ancient Sanskrit Literature. )

आणि हंटर इतिहासकार असें लिहितो कीं,

" The science of language, indeed, had been reduced in India to fundamental principles at a time when the grammarians of the West *still treated it on the basis of accidental resemblances.* "

( The Iudian Empire. P. 100-101 ).

याप्रमाणें, भाषाशास्त्रांत आणि व्याकरणविषयांत, पाश्चात्यांनीं विशेष रीतीनें वाखाणलेल्या अशा प्राक्कालीन ग्रीस देशावर देखील आह्मां भारतीयांची किती कडी असे, व इतक्या पुराणकाळीं ही आमचें त्याजवर कसें तेज पडे, हें रॉथ् सारख्या पाश्चात्यास सुध्दां अगदीं कबूल करावें लागतें. कारण, निरुक्तावरील प्रस्तावनेंत तो असें म्हणतो कीं,

"—Grammar,—a science *which was far more com-*

*monly studied*, and at an *earlier period attained a far higher style*, in India *than* in Greece."

( Introd. to Niruktaa. P. lii. )

सदरहु अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

असो. आमचे निरुक्तकार, वैयाकरण, आणि अन्य कविगण, यांच्या हातून जी भाषेची सेवा झाली, त्याबद्दलचें विवेचन योग्य त्या स्थळीं पुढेंच करण्याचें योजिलें आहे. ( भाग ९ वा पहा ). सबब, त्यासंबंधानें इतक्यांतच ज्यास्त जागा अडविण्याचें प्रयोजन नाहीं. मात्र भाषेचें महत्व आमचे पूर्वज फार पुरातनकाळीं देखील किती अंशानें जाणून होते, इतकेंच वाचकांस सहजगत्या कळण्यासाठीं, त्याचें सामान्य दिग्दर्शन सदरीं केलें आहे.

वाचेचे प्रकार, व तिच्या उगमाविषयीं ऋग्वेदांतील वर्णन.

ऋग्वेदांतील एका ऋचेंत, वाचा कशाप्रकारें उत्पन्न झाली, आणि तिचा उद्गम कसा होतो, हें सांगितलें असून, हिच्यांतच वाचेचे चार प्रकार असल्याविषयीं वर्णन आहे. ह्या चार प्रकारांपैकीं तीन गुप्त आहेत, व तुर्या नांवाचा जो चवथा प्रकार, तो मात्र मनुष्यें बोलतात, असा तींत उल्लेख आहे.

**चत्वारिवाक् परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः । गुहात्रीणि निहितानेंगयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥ ४९ ॥**

( ऋ. अ. २. अ. ३. व. २२. मं. १. अ. २२. सू. १६४ ).

सदरीं नमुद केलेलीं वाचेचीं चार रूपें कोणतीं, याविषयीं अनेकांचीं अनेक मतें आहेत. वेदवादींच्या मतें ओम्, भूः, भुवः, व स्वः, अशीं वाचेचीं चार रूपें होत.

वैय्याकरणांच्या मतें नाम, क्रियापद, उपसर्ग, आणि निपात, हीं तिचीं चार रूपें समजावयाचीं. मंत्र, कल्प, ब्राह्मण, व लौकिकी, अशीं चार रूपें याज्ञिकांच्या अभिप्रायाप्रमाणें होत. ऋग्, यजुः, साम, आणि लौकिकी, अशीं नैरुक्तांच्या मतें वाचेचीं चार रूपें समजावयाचीं. सर्पांची भाषा, पक्षांची भाषा, तिर्यङ्योनींतील क्षुद्र जीवजंतूंची भाषा, व व्यावहारिकी भाषा, असे वाचेचे चार प्रकार असल्याविषयीं, ऐतिहासिकांचा अभिप्राय आहे. आत्मवादींच्या मतें, पशु, तूणव, मृग, आणि मनुष्य, यांच्याच चार भिन्न भिन्न वाचा होत. तसेंच, योग्यांच्या मताप्रमाणें, परा, पश्यन्ति, मध्यमा, व वैखरी, हेच वाचेचे चार प्रकार आहेत.

मूलस्थ आधारापासून उत्पन्न झालेली जी नादात्मिका वाणी, तिला परा म्हणतात. जी नादाच्या सूक्ष्मत्वामुळें, योग्यांशिवाय अन्य कोणासही भासमान होत नाहीं, आणि जी फक्त हृदयस्थच आहे, ती पश्यन्ती समजावयाची. हिचाच बुद्धीशीं मिलाफ होऊन, जेव्हां तिला विवक्षा प्राप्त होते, तेव्हां तिला मध्यमा म्हणतात; कारण, मध्यस्थ असलेलें जें हृदय त्याच्यापासूनच हिचा उद्गम होतो. पुढें, हिचाच कंठापर्यंत प्रवेश झाल्यावर, ज्या वेळेस दंतौष्ठादि स्थानांचें साहाय्य मिळून ती मुखावाटें बाहेर पडते, त्या वेळेस तिला वैखरी अशी संज्ञा प्राप्त होते. आतां, ह्यांपैकीं, पहिले तीन प्रकार हृदयान्तर्गत असल्या कारणानें, ते अर्थात्च गुप्त समजावयाचे; आणि राहिलेला चौथा व शेवटला प्रकार मात्र मनुष्यांची व्यावहारिक भाषा होय, असें योगी मानतात.

ऋग्वेदांतील दुसऱ्या एका ऋचेवरून वाचेचा पहिला उपयोग ईशस्तवनच असल्याचें दिसतें, आणि म्हणूनच आमच्या प्रथम पूर्वजांचे पहिले बोल ईशस्तुतिपर असावेत, असें वाटतें. कारण, ब्रह्म ह्मणजे ( ॐकार ) शब्द असून, त्याचा अर्थ स्तुतिवाचक आहे. शिवाय, हा ब्रह्ममंत्र ह्मणणारास ब्रह्मा अशी संज्ञा आहे; आणि ह्या ब्रह्मा नामक ऋत्विजास, आमचे ऋग्वेद कालीन ऋषी वाचेचे एक उत्कृष्ट धामच समजत असत.

वाचेचा पहिला उपयोग.

**ब्रह्मायं वाचः परमं व्योम ॥ ३५ ॥ २० ॥**

(ऋ. अ २. अ ३. व २०. मं १. अ २२. सू १६४)

सदरहु प्रतिपादनाच्या पुष्टीकरणार्थ, व योग्य मुकाबिल्यासाठीं, आणखी एक ऋचा वरील ऋचेच्याच संदर्भाची घेऊं, आणि तींत काय उपलब्ध होतें तें पाहूं. हींत असें वर्णन आहे कीं, **माध्यमिका वाक्‌रूपी** जी **गौ** ती द्विपदी, चतुष्पदी, अष्टपदी, नवपदी, व सहस्त्राक्षरा होऊन, अत्यन्त उच्चस्थानीं व्यक्त होते.

**गौरीर्मिमायसलिलानितक्षत्येकपदी**
**द्विपदीसाचतुष्पदी ।**
**अष्टापदी नवपदी बभूवुषी**
**सहस्राक्षरा परमेव्योमन् ॥ ४१ ॥**

( ऋ. वे. अ.२ अ.३. व२२. मं.१. अ.२२. सू.१६४ ).

ह्यावरून, ह्या विश्वनियन्त्याच्या सृष्टचमत्कृतीचा स्तुतिपाठ व धन्यवाद गाण्यासाठीं, ज्या स्फूर्तीचें प्रथमतः परेंतच बीजारोपण झालें, व

पदोद्गम.

जिला पश्यन्ति आणि मध्यमा अवस्था क्रमशः प्राप्त होऊन, जिची परिणति वैखरींत झाली, तीच पुढें वाक् म्हणून उदयास आली. इतकेंच नव्हें तर, ती आमच्या पुराणतम आर्य ऋषींच्या मुखाबाहेर पडल्यावर, तिच्यांत पदरचनेचें सौष्ठव असल्यामुळें, तिची अर्थातूच ऋचा बनली; व हा ऋचासमूहच ऋग्वेद झाला.

शिवाय, सहजगत्या केलेल्या भाषणांतही काव्याचा प्रादुर्भाव होऊन, त्याचें पद्य बनतें, असें आपल्याला रामायणांत देखील दिसून आलें आहे. कारण, क्रौंच पक्षाच्या जोडप्यापैकीं, नराला एका निषादानें ठार मारल्यावर, त्याच्या मादीला झालेलें भर्तृवियोगदुःख पाहून, वाल्मिकिमुनीनें त्यास शाप दिला कीं,

> मानिषादप्रतिष्ठांत्वमगमःशाश्वतीःसमाः
> यत्क्रौंचमिथुनादेकमवधीःकाममोहितम् ॥१५॥
> ( रामायण. बा. कां. सर्ग २ ).

पुढें, ही स्वतःची वचनोक्ती पादबद्ध असल्याचें त्याच्या मनांत आले, व ती तशी आहेसें पाहून, त्याला मोठें आश्चर्य वाटलें; आणि तो आपल्याशींच म्हणाला,

> पादवद्धोऽक्षरसमस्तंत्रीलयसमन्वितः
> शोकार्तस्य प्रवृत्तोमे श्लोको भवतु नान्यथा १८
> ( रामायण. बा. कां. सर्ग २ ).

तदनन्तर, ह्याच छन्दोमय वाक्प्रवृत्तीनें, वाल्मिकी ऋषीस मोठें प्रोत्साहन मिळून, त्यानें रामायण रचलें, व ही गोष्ट सर्व जगासही विश्रुत आहे.

परंतु, मानवी भाषा कशी उत्पन्न झाली, हा एक मोठा प्रश्न प्रथमारंभींच उत्पन्न होतो. सबब, त्याकडे अगोदर वळलें पाहिजे, व हिचें मूळबीज कोठें दृग्गोचर होतें,

वागुद्गमाचें मूळबीज.

याबद्दलचा कांहीं दाखला उपलब्ध झाला तर तोही पाहिला पाहिजे. हा दाखला मिळण्याचें मुख्य व विश्वसनीय आगार, किंबहुना सर्वांचेंच अपूर्व भाजन म्हटलें ह्मणजे आमचे पुराणतम वेद होत. सबब, त्यांच्याकडे अ क्षणभर दृष्टी फेकूं, आणि त्या सर्वांच्या शिरोभागीं ; व उपनिषदेंच असल्यामुळें, त्यांत भाषेसंबंधीं कांहीं ४) पण दृष्टीस पडत असल्यास, त्याबद्दलचा विचार करं का-

वाचा, किंवा आपण जी बोलतो ती व्यवहारिक सं- कशी उत्पन्न झाली, हें शोधून काढण्याला आपल्याला वास्तू. रीतीनें सृष्टीच्या उगमाशींच गेलें पाहिजे. कारण, सृ च्या उत्पत्तीनंतरच भाषेची उत्पत्ती होय, हें कोणा नाकबूल करवणार नाहीं. आणि सृष्ट्युत्पत्ति हा जरी प्रस पुस्तकाचा विषय नव्हे, तरी त्या दोघांचा सापेक्षसं असल्याकारणानें, एकीचें विवेचन करतांना, दुसरीविषयी हीं दोन शब्द सांगितल्याशिवाय गत्यंतरच नाहीं.

फार खोल पाण्यांत न शिरतां, आपण असें मान्य करूं, किंवा समजूं, अथवा निदान गृहित तरी धरूं कीं, हें अखिल विश्व केवळ निर्विकार व अद्वैत परब्रह्म असून, फक्त कल्पनेमुळेंच तें उत्पत्तिस्थितिलयांस पात्र झालें असल्याचें भासमान होतें. हीच कल्पना विकारवश होते; तीच अहंकाराला उत्पन्न करिते; व अद्वैताला विरजण

लाऊन, द्वैताचा नसता खेळ तीच माजविते. अर्थात्, वंध्यापुत्राच्या क्रीडाकौतुकाप्रमाणेंच ही सृष्टचमत्कृति आहे, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे. तथापि, ज्यापेक्षां ही कल्पना नांवारूपास येऊन सृष्टीची सत्यता आपणांस खरी वाटत आहे, त्यापेक्षां विषयोपन्यासार्थ जी परिभाषा ठरली आहे, तिच्यांतच आपण सांप्रतचें विवेचन करूं.

दुभ णांत जोडप त्याच्य मुनीन

अहंकारांत सृष्टीचें बीजारोपण.

ह्या अद्वैत चैतन्यांत, व ब्रह्ममय विश्वांत, “ **अहं ब्रह्मास्मि**” अशी कल्पना होऊन, **आ**त्म्यापासून आकाश झालें, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नी[पासू]न आप ( पाणी ), आपापासून पृथिवी, पृथिवीपासून [वनस्प]ति, वनस्पतीपासून अन्न, अन्नापासून रेत, आणि [रेता]पासून मनुष्य, याप्रमाणें सृष्टिक्रमाला सुरवात होऊन, [वि]श्व उदयास आलें.

एतद्विषयक, **रामगीतेंत** एक आधार दृष्टीस पडत असून, [अ]सा अन्यत्रही पुष्कळ ठिकाणीं उपलब्ध होतो.

> **विकल्पमायारहिते चिदात्मकेऽ**
> म **हंकार एष प्रथमः प्रकल्पितः ।**

आणि त्याला श्रुतीचें[1] तर बलवत्तरच प्रमाण आहे.

असो. अशा प्रकारच्या कल्पनेनें अहंकार उत्पन्न झाल्यावर, त्याचा परिणाम तत्क्षणींच निदर्शनास आला.

---

१ ह्याला श्रुतीचा जो आधार आहे; तो येथें देतों.

**तस्मादात्मन आकाशः संभूतः ।** इत्यादि. ( **भारतीय** साम्राज्य उत्तरार्ध. पु. ७ वें, पा. २१४. )

**श्रुतिस्तु वेदो विज्ञेयोधर्मवाक्यं तुवैस्मृतिः ।**

( मनुस्मृति. )

यांनीं देखील एके ठिकाणीं उल्लेख केला आहे, असें वाटतें. ते म्हणतात कीं,

**सोऽहमित्यस्माद्वाक्यात्सकारहकारयोरुद्धारेकृते, तत्पूर्वरूपेच ओमिति प्रणवः संपद्यते। तस्मादोमिति परमात्मवाचकः।**

ओम् शब्दाचे घटकावयव, व त्याची व्यापकता, आणि त्याचें श्रेष्टत्व.

तसेंच, ॐ शब्द अकार, उकार, व मकार, या तीन अक्षरांनीं झालेला असून, हा ॐ भ[illegible] अथवा ओंकार शब्द, ब्रह्मस्वरू[illegible]णांत असल्याविषयींही अनेक प्रम[illegible] जोडप[illegible] आहेत. [illegible] त्याच्य[illegible] मुनीनें

**ओंकार मात्रं सचराचरं जगत्।**

असें अध्यात्मरामायणांत वचन आहे.

**ओमित्येकाक्षरंब्रह्मव्याहरन्मामनुस्मरन्।**
**यःप्रयातित्यजन्देहंसयातिपरमांगतिम्।**

अशा बद्दलचें श्रीमद्भगवद्गीतेंत प्रमाण आहे. ( भगवद्गीता. ८–१३ ).

**वाग्वा ओंकारः। सर्ववाग्वाच्यं वस्तु प्रणवात्मकंच। ओमित्येतदक्षरमिदंसर्वंसस्योपव्याख्यानम्। भूतंभवद्भविष्यदितिसर्वमोंकार एव। सर्वं ह्येतद्ब्रह्मायमात्मा ब्रह्म सोयमात्मा चतुष्पात्। ओमित्येतत्। ओमितिब्रह्म ओंकारएवेदं सर्वम्।** अशी श्रुति आहे.

सदरहू ओंकारांत "अ" हा वर्ण फारच महत्वाचा असून, एका कारिकेंत तर त्याला बीजात्मा पुरुषच मानिलें आहे.

**तथा प्रणवगोऽकारो बीजात्मा पुरुषः स्मृतः।**

श्रीकृष्ण भगवानानें गीतेंत असें सांगितलें आहे कीं, सर्व अक्षरांमध्यें श्रेष्ठ आणि महत्वाचें अक्षर जें " अ, " तें मीच होय.

अ अक्षराचें महत्व.

**अक्षरामणांकारोऽस्मि ॥** ( गीता. १०. ३३. )

शिवाय श्रुतींतही एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, **वाक्**, ( म्हणजे वाचा अथया भाषा ) ही केवळ अकारात्मकच असून, ती मुखांतील जिव्हेच्या स्पर्शानें निरनिराळ्या प्रकारें व्यक्त होते; आणि ती ब्रह्माप्रमाणेंच व्यापक व अनादि आहे.

**अकारो वै सर्वा वाक्सैषा स्पर्शोष्मभिर्व्यज्यमा-ब्रह्मी नानारूपाभवतिइति । यावद् ब्रह्म विष्टि-तावतीवाक् ।**

तेव्हां, **ओम्** ह्या शब्दान्तर्गत असलेल्या अ स्वराचा उद्गम प्रथमतः होऊन, नंतर त्याला **उ**कार व **म**काराची जोड मिळाली, आणि त्यापासून **ओम्** शब्द बनला. पुढें, हकार, **स**कार, व **क**कार, यांचाही प्रादुर्भाव कल्पनेनुरूपच झाला, आणि त्यामुळें **को**ऽहम् व **सो**ऽहम् हे शब्द श्रवणपुटांत पडूं लागले. तदनन्तर, शनैः शनैः, इ, उ, वगैरे स्वर आणि दुसरीं व्यंजनें प्रचारांत येऊन, सामान्य **वाक्**संज्ञा सुरू झाल्या असाव्या, व त्यामुळें परस्परांच्या व्यवहारालाही हरकत पडली नसावी, असें वाटतें.

ओम् शब्द व वाचें बीजारोपण.

आतां, हीं अक्षरें, व ह्या **वाक्**संज्ञा केवळ वस्तुद्योतक आणि क्रियाद्योतकच असल्या पाहिजेत. कारण, त्या जाणून बुजून, व मुद्दाम, केवळ आपला इच्छित कार्यभाग

वाक् संज्ञांचें वस्तुद्योतकत्व, आणि क्रियाद्योतकत्व.

होण्यासाठींच केल्या होत्या. सबब, त्या योजलेली क्रिया प्रदर्शित करीत, यांत संशय नाहीं.

भाषेसंबंधीं मनूचा अभिप्राय.

तथापि, ह्या बाबतींत, स्मृतिकारांचें मत याहून अगदींच भिन्न असल्याचें दिसतें. कारण, सृष्टपदार्थांतील वस्तुमात्रांचीं नांवें कशीं पडलीं, याविषयीं मनूनें केवळ निराळ्या तऱ्हेचेच विचार प्रदर्शित केलेले असून, तींत असें सांगितलेलें आहे कीं, परमात्म्यानें सृष्टि निर्माण केल्यावर, त्यानें प्रत्येकाचीं भिन्नभिन्न कर्मे निवेदन केलीं, आणि जातिवाचक नांवेंही दिलीं.

**सर्वेषांतु सनामानि कर्माणिच पृथक् पृथक् ।**
**वेदशब्देभ्य एवादौ पृथक्संस्थाश्च निर्ममे ॥ २१ ॥**

( मनुस्मृति. अ. १ ला. )

ह्यावरून, भाषाविषयक किंवा शब्दोत्पत्तीच्या संबंधानें मनुस्मृतिकाराचें अगदीं भिन्न मत असल्याचें दिसतें.

अन्य पौरस्त्यमत.

कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, भाषा ही अमानुषी आहे, व ती परमेश्वरापासूनच उत्पन्न झाली. ह्यामुळें, अर्थातूच वादविवादास पुष्कळ जागा राहिली. फार तर कायसांगावें पण, एतद्विषयक यूरोपखंडांत तर बराच वादविवाद सुरू होऊन, शेवटीं रणकंदनही मातलें. परंतु, वास्तविक रीतीनें विचार करतां असें दिसतें कीं, जरी परमेश्वर हा अखिल विश्वाचा कर्ता आहे, व त्याच्याकडे सर्व सृष्टीचें नियंतृत्व आणि चालकत्व देखील आहे, तरी मानवी प्राण्याची भाषा उत्पन्न करण्यांत, त्याचा प्रत्यक्ष हात असल्याचें बिलकुल वाटत नाहीं, अगर अनुमानसुद्धां

होत नाहीं. मात्र, परमेश्वरानें मनुष्याला बुद्धि दिली आहे; इतकेंच नव्हे तर, तिचा विनियोग वैदग्ध्यानें व चातुर्यानें करण्याविषयीं देखील त्यानें त्याच्यांत सुमतीची योजना केली आहे, इतकी गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे.

आक्षेप.

अमुक वस्तूचें अमुक नांव आहे, असें ईश्वरानें खचितच केव्हां देखील सांगितलें नसावें. अथवा अमक्याला अमुक नामधेयानें हाक मारा, अशी ाची आज्ञाही असेलसें वाटत नाहीं. कारण, तसाच काहीं व ार असता, तर अखिल भूतलावरील, किंबहुना विश्वांपा ल भाषा एकच असती. परंतु, ज्यापेक्षां तसें नाहीं, त्याव ां मनुष्यानेंच आपल्या बुद्धीप्रमाणें संज्ञा ठरविल्या; रे ाणि आपल्या आवश्यकतेनुरूप सांकेतिक चिन्हें तयार ाली. पुढें, ती एकंदर समाजांत अमलांत आली, व त्यांची क कायमची भाषा बनली, असेंच म्हणणें सयुक्तिक दिसतें.

उदाहरणार्थ, घर बांधण्याची जिज्ञासा होऊन, अमुक एक तऱ्हेनें आपलें घर बांधावें, किंवा देवालय तयार करावें, म्हणून जी बुद्धि अगर कल्पना झाली, ती केवळ ईश्वराचीच देणगी आहे, असें म्हटलें पाहिजे. परंतु, जें घर किंवा मंदिर मनुष्याकडून बांधण्यांत आलें, ती निव्वळ मानवी कृतीच होय, यांत शंका नाहीं; आणि तसें मानल्याशिवायही गत्यन्तर नाहीं.

याप्रमाणें, भाषेच्या उपपत्तिसंबंधानें पौरस्त्य कल्पनेचा विचार झाला; आणि आह्मां आर्यांचें तद्विषयक काय म्हणणें आहे, याविषयींचें अवश्य तें दिग्दर्शन केलें. सबब,

आतां अन्यदिशेकडे वळूं, व ह्या बाबतींत पाश्चात्यांचें कसें मत आहे, तें पाहूं.

भाषेच्या उत्पत्ती-संबंधानें पाश्चात्य मत.

कित्येक पाश्चात्यांचा असा अभिप्राय आहे कीं, भाषा ही केवळ सांकेतिक असून, ती फक्त जनरूढि आणि लोकाचार, यांनींच नियंत्रित झाली आहे. तेव्हां, अर्थात्च, ह्यांच्या समजुती-प्रमाणें, कोणत्याही वर्णानें, किंवा अक्षरानें, अथवा शब्दानें, किंचित् देखील बोध स्वयमेव होत नसून, फक्त अमुक वर्णानें, अक्षरानें, अगर शब्दानें, अमुक एक समजावें, असें सर्वानुमतें ठरल्यावरून, त्या त्या वर्णानें, अक्षरानें, अगर शब्दानें, तो तो अर्थ समजण्यांत येतो.[१]

सांकेतिक भाषा, व सेन्द्रिय भाषा.

तथापि, हा एक पक्ष झाला असून, कांहींचें मत याहून अगदीं भिन्न आहे. हे असें म्हण-तात कीं, भाषा ही सेन्द्रिय व सजीव आहे. कारण, तिला एक प्रकारची वाढ आहे. इतकेंच नव्हे तर, ज्याप्रमाणें बीजांत पानें, शाखा, फुलें, व फळें, इत्यादि प्रच्छिन्न असतात, त्याचप्र-माणें भाषेंत देखील तिची परिणति आणि तिचा विस्तार, तिच्या समवेतच आहे. फेरॉर, श्लेजेल, वगैरे या मताचे होत.[२]

अमानुषी भाषा, व त्याबद्दल शुष्क विवाद.

कित्येक भारतीयांप्रमाणें, कांहीं पाश्चात्य पंडित सुद्धां, भाषा ही अमानुषी असल्याचेंच सम-जतात; आणि तत्संबंधीं मोठा कडा-क्याचा परंतु केवळ निरर्थक वादवि-

---

१ Origin of Languages. P. 35. Farrar.

२ Transactions of the Philological Society. vol. II. P. 39.

वाद चालवितात. ह्या बाबतींत, सेंट बॉसिल, यूनोमियस, सेंट ग्रेगरी, इत्यादींचें चाललेलें खडाजंगी वाग्युद्ध खचितच पाहण्याजोगें व ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.[1]

अनुकरणात्मक शब्द.

असो. कांहीं पाश्चात्यांची आणखी अशी कल्पना आहे कीं, भाषेचें खरें जीवित धातूंत, ह्मणजे क्रियापदांत असून, ह्या धातूंची मूळ उत्पत्ति केवळ अनुकरणपद्धतीनेंच झाली आहे. अर्थात्, नानाप्रकारचे जे जे ध्वनी आपण ऐकिले, त्या त्या प्रमाणें आपल्या कर्णरन्ध्रांत त्यांचा संस्कार होऊन भिन्न भिन्न धातू बनले; अथवा त्यांचे नानाविध शब्द झाले; अगर त्यांचीं मूळरूपें प्रचारांत आलीं.

शिवाय, ह्यांच्या उपपत्तीप्रमाणें, मनुष्य हा प्रथमतः एक मुका प्राणी असून, त्याजवर या स्थावर जंगम सृष्टीचा व पशुपक्षादिकांचा संस्कार होऊनच तो बोलावयास लागला, आणि भाषाभिज्ञ झाला. अर्थात्, मेघांचा गडगडाट, विजांचा चकचकाट, समुद्राची गर्जना, वाऱ्याचा सोसाटा, पक्षांचा किलकिलाट, कोकिलांचें कूजित, सर्पांचा फूत्कार, गाईचें हंबरणें, घोड्याचें खिकाळणें, कुत्र्याचें भोंकणें, इत्यादि नानाविध प्रकार श्रवणगोचर झाल्यावर, ते ते विषय, त्या त्या वस्तू, व तीं तीं द्रव्यें व्यक्त करण्यासाठीं, किंवा त्यांचें उद्बोधन व्हावें ह्मणून, श्रुतिपथावर आलेल्या सर्व ध्वनींचें यथार्थ अनुकरण करण्याचा त्यानें निश्चय केला. पुढें, हा प्रयत्न बऱ्याच अंशानें सिद्धीस गेल्याचें

---

[1] एतद्विषयक "Horne Tooke's Diversions of Purley" नामक ग्रंथ पहावा.

पाहून, त्यानें आपले परिश्रम सतत आणि वाढत्या प्रमाणांवर चालविले. त्यामुळें, योग्य अनुकरणानें कांहीं शब्द बनून, त्यांचा बराच समुदाय झाला, व त्याची कालान्तरानें भाषा बनली.

ह्या मताचें उत्पादक हर्डर वगैरे अनेक तत्ववेत्ते असून,

हंबारवोपपत्ति.

ह्या उपपत्तीला हंबारवोपपत्ति[1], अशी आपण संज्ञा देऊं. कारण, हिचें मूळतत्व अनुकरणात्मक-शब्द हेंच आहे. आणि गाय हंबरडा फोडते, म्हणून जसे आपण तिला हम्मा म्हणतों; व हंबरड्याचा वाचक हम्मा किंवा **गाय** शब्द आहे, असें ज्याप्रमाणें आपण तान्ह्या मुलास समजावितों, त्याचप्रमाणें दूसऱ्याही सर्व वस्तूंचें, निदान बहुतेक शब्दांचें तरी खचितच आहे, असें कित्येक समजतात.

परंतु, ही उपपत्ति सर्वांशीं खरी नाहीं, हें कोणालाही

आक्षेप.

सहजीं कळण्यासारखें आहे. कारण, अनुकरणात्मक शब्द आणि अनुकृत विषय, याच्यांत बहुत करून फारसा मेळ असल्याचें दिसत नाहीं. उदाहरणार्थ, मराठींत, कुत्रा व भोंकणें, अगर घोडा व खिकाळणें; किंवा संस्कृतांत, घोटः व हेषितं; अथवा इंग्रजींत, लॅम्ब व ब्लीटिंग ( Lamb and bleating ), अथवा हॉग् व ग्रंटिंग ( Hog and grunting ); इत्यादि शब्दांत परस्पर कांहींच अनुकरणात्मक साम्य नाहीं. आणि जरी कांहीं कांहीं शब्दांत हें साम्य विशेष दिसून येतें, तरी तेवढ्याव-

---

१ ह्या उपपत्तीला **मॉक्समुलरनें** **बो**वो ( Bow-wow theory ) असें नांव दिलें आहे.

( **मॉक्समुलरचीं** भाषाविषयक व्याख्यानें पहा. )

रूनच, एतद्विषयक सर्व साधारण अथवा सामान्य सिद्धान्त एकसहा बांधण्यास खचितच मोठी अडचण वाटते.

अनुकरणाची अनपेक्षा.

ह्याशिवाय, सदरहू उपपत्तीच्या संबंधानें दुसराही एक महत्वाचा आक्षेप येण्याजोगा आहे. तो असा कीं, सृष्टपदार्थांचें केवळ अनुकरण करूनच मनुष्याचा सर्व कार्यभाग झाला, व त्याला भाषा देखील आली; नाहींपेक्षां, त्याचें सर्व प्रकारें अडून राहून, त्याला भाषा मुळींच आली नसती, असें बिलकुल म्हणतां येणार नाहीं. कारण, श्रृंगार, हास्य, करुणा, वीर, विनोद, बीभत्स, इत्यादि नानाविध मनोविकार, त्याला केवळ अंगविक्षेपानें, किंवा अन्य तऱ्हेनें व्यक्त करून, आपलें मनोगत दुसऱ्यांस अल्पस्वल्प प्रमाणानें, सहजीं कळवितां येण्यासारखें आहे. आणि जर असें आहे, तर निष्कारण दुसऱ्याची मदत घेण्याचें त्याला बिलकुल कारणच नव्हतें व नाहीं, हें विशेष रीतीनें सांगावयास नको. उदाहरणार्थ, **हाहा ! ओहो ! वाहवा ! हं !** **अहं ! अरेरे ! इश्श !** **वाः !** इत्यादि अनेक विकारांनीं आनंद, दुःख, शोक, व संमति व्यक्त करण्यास, आपल्यापाशींच उत्तम साधन असल्यामुळें, बाह्य, किंवा परकी, अथवा आगंतुक साधनांची आपल्याला काडीमात्र सुद्धां आवश्यकताच नाहीं, हें उघड आहे.

त्याचें कारण.

याप्रमाणें, आपले विचार प्रदर्शित करण्यासाठीं, सृष्टपदार्थांचें आणि विशेषतः प्राणिवर्गाचें अनुकरण करण्याची यत्किंचित् देखील अपेक्षा नसून, आपल्या उद्गारांनींच आपलें

मनोगत चांगल्या प्रकारें प्रदर्शित करता येतात, असें कोणाच्याही लक्षांत सहजीं येईल.

तथापि, ह्या संबंधानें इतकेंही आणखी ज्यास्त लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, उद्‌गार ह्मणजे भाषा नव्हे; आणि ह्मणूनच केवळ उद्‌गारानीं, किंवा फक्त मनोविकार प्रदर्शित केल्यानेंच, सर्व कार्यभाग आटोपला; अथवा आपले एकंदर विचार व्यक्त करता आले; असें समजणें अगदीं बरोबर होणार नाहीं.

परंतु, काँण्डिल्याक् वगैरेंचें असें मत आहे कीं, उद्‌गार हेच भाषेचें मूळबीज असून, ह्या बीजात्मक पायावरच भाषारूपी वृक्ष वाढीस लागला. ह्यानें हर्डरच्या उपपत्तीला हरताळ लावून, असें प्रतिपादन केलें आहे कीं, मनुष्य हा प्राणिवर्गांत सर्वांहून श्रेष्ठ असल्यामुळें, त्याला आपलें मनोगत प्रकट करण्यासाठीं, पश्वादिकांच्या ध्वनींचें अनुकरण करण्याचें काडीमात्र देखील प्रयोजन नाहीं. तो रडतो, हंसतो, स्पुंदतो, टाळ्या पिटतो, आणि आनन्दही प्रदर्शित करतो. सबब, ज्यापेक्षां हे विकार त्याला प्रदर्शित करता येतात, त्यापेक्षां मानवी प्राण्यांच्या भाषेचा हा "ओनामा" च होय. ही उद्‌गारात्मक उपपत्ति असल्याकारणानें, आपण तिला हाहोपपत्ति[1] अशी संज्ञा देऊं.

काँण्डिल्याक् वगैरेंचें मत, व भाषेची उद्‌गारात्मक हाहोपपत्ति.

अशा प्रकारें, भाषेच्यासंबंधानें नानातऱ्हेच्या अनेक

१ **मॉक्समुलरनें** हिला पुः पुः असें नामधेय दिलें आहे. अर्थात्, हिला इंग्रजींत "Pooh Pooh theory" म्हणतात, हें वाचकांस सहजीं कळेल. (**मॉक्समुलरचीं** भाषाविषयक व्याख्यानें पहा.)

कल्पना भिन्न भिन्न विद्वानांनीं चालविल्या. परंतु, खरी उपपत्ति कोणती, हें समजत नसून, त्याचा थांग लागणें देखील बिलकुल शक्य नाहीं, असें कबूल करणें भाग पडतें.

भाषाविषयक अन्यमतें, व त्यांची निष्फलता.

कित्येक पाद्र्यांचें असें ह्मणणें आहे कीं, पहिला मानवी प्राणी जो आदम त्याला शिकविण्यासाठीं, व भाषेचें ज्ञान प्राप्त करून देण्याकरतां, ईश्वरानें प्रथमतः एक शब्दांचा कोश आणि व्याकरण तयार केलें. परंतु, हें मत इबकें वेडगळ आहे कीं, त्याबद्दलचा विचार करण्याचीच जरूरी दिसत नाहीं.

मिश्र देशांतील ( ईजिप्तांतील ) एका राजाची अशी एक गोष्ट सांगतात कीं, त्यानें दोन तान्हीं मुलें जन्मतांक्षणींच एका धनगराच्या स्वाधीन केलीं. पुढें, ह्या मुलांनीं बकरींचेंच स्तनपान केलें पाहिजे, आणि त्यांच्या देखत एकही शब्द उच्चारतां कामा नये, अशी त्यानें त्या धनगरास ताकीद दिली, व सांगितलें कीं, हीं बालकें जो शब्द उच्चारतील तो ध्यानांत ठेवून, आम्हांस लागलींच कळवावा. त्याप्रमाणें, त्यानें केलें; आणि त्यांनीं प्रथम उच्चारलेला शब्द बीकॉस ( Beckos ) होता, असें राजास सांगितलें. ह्या शब्दाचा अर्थ फ्रीजियन भाषेंत भाकरी असा होतो, व त्यावरून, फ्रीजियन् ही मानवी प्राण्याची पहिली भाषा होय, असें कित्येक पाश्चात्य समजतात. तथापि, ही कल्पना किती निराधार आहे, हें वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

---

१ Whewell. Indications.

Dugald Stewart. Works. vol. III. P. 35.

अशाच प्रकारचा प्रयोग, स्वेबियन पादशहा जो दुसरा फ्रेडरिक, व स्कॉट्लंडचा चवथा जेम्स, आणि हिंदुस्थानचा एक मोगल बादशहा, यांनींसुद्धां केला असल्याचें कळून येतें. परंतु, त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं, हें सांगावयास नलगे.

---

# भाग तिसरा.

## भाषेचें उद्गमस्थान.

भाषा व मानवी प्राणी यांच्या उद्गमस्थानाचा विचार.

मागील भागांत, भाषेची उत्पत्ति कशी झाली, या बद्दलची सामान्य हकीकत मीं वाचकापुढें ठेविली. आतां, प्रस्तुत भागांत तिच्या उद्गमस्थानाविषयीं उपलब्ध असलेली माहिती देण्याचा विचार आहे.

आतां, भाषेच्या उद्गमस्थानासंबंधीं विचार करावयास लागलें, ह्मणजे प्रथमतः मनुष्याच्या आदिनिवासस्थानाबद्दलचाच विचार करणें भाग पडतें. कारण, मनुष्याची उत्पत्ति व भाषेचा उद्गम, हीं बहुतेक समकालीनच असलीं पाहिजेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. सबब, मनुष्याच्या उत्पत्तिस्थानाविषयीं पूर्वी कशी कल्पना होती; भिन्न भिन्न राष्ट्रांत त्यासंबंधानें कांहीं निरनिराळें मत होतें कीं कसें; हल्लीं तद्विषयक कसें मत आहे; शास्त्रीय दृष्ट्या तें किती अंशानें सिद्ध होण्यासारखें आहे; याबद्दलचाच अगोदर विचार करूं.

सर्व राष्ट्रांत, आमचें आर्यराष्ट्र म्हणजे अर्थात् आम्ही आर्यहिंदू हे पुरा[1]णतम असल्याकारणानें, सृष्ट्युत्पत्ति

---

१ थॉर्नटन् इतिहासकार म्हणतोः—

Ere yet the Pyramids looked down upon the val-

( पुढें चालू )

आर्य हिंदूंचें पौराणत्व.

संबंधाचे आमचेच पूर्वीचे विचार कसे होते, हें प्रथमतः पाहूं, आणि नंतर इतर राष्ट्रांकडे वळूं.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

ley of the Nile—when Greece and Italy, those cradles of *modern* civilization, housed only the tenants of the wilderness, India was the *seat of wealth* and *grandeur.*"

( Thornton's History of India ).

आनिचिझांट बाई असें प्रतिपादन करते कीं:—

"India, *older* than Greece or Rome—India that was *old before* Egypt was born. India that was *ancient before* Chaldea was dreamed of. India that *went back* thousands of Centuries before Persia had come to the front."

( Mrs. Anne Besant on India and its mission ).

"The Aryan race on the earth is about a million years old." ( Mrs. Anne Besant on Theosophy and Religion ).

एक सुप्रसिद्ध फ्रेंच पंडित कूझर असें लिहितो कीं, भरतखंड हेंच अखिल मानवी कुटुंबाचें आदिनिवासस्थान असून, त्यांची जन्मभूमि होय.

"If there is a Country on earth, which can *justly claim the honour of having been the cradle of the human race,* * * * *that country asuredly is India.*"

एम्. लुई. जेकलिअट असें म्हणतोः—

"India is the *world's* cradle." * * * "Soil of Ancient India, *cradle of* humanity, hail."

( The Bible in India, or La Bible Dans L' Inde )

इंग्लंडांतील सुप्रसिद्ध बर्क नांवाचा वक्ता, पार्लमेंटांतील सभासदांस उद्देशुन म्हणतो, "अहो, वड्या प्रतीचे सभासद हो, हिंदु लोक हे मूळचे भरतखंडांतीलच रहिवाशी होत."

"My Lords, these Gentoo ( Hindu ) people are the original people of Hindustan."

( Burke. vol. VII P. 46 ),

आमच्या वाङ्मयांतील प्रमाणभूतग्रंथ म्हटले म्हणजे श्रुति, व स्मृति असे होत; आणि त्यांतही, श्रुतीचा अधार विशेष ग्राह्य आहे, हें सांगावयासच नको. कारण, श्रुति म्हणजे प्रत्यक्ष वेदवचनच समजावयाचें, असें स्मृतिकारांनीं देखील वर्णन केलें आहे.

**श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वैस्मृतिः ।**
( मनुन्मृति. १. २. १०. )

त्याबद्दल स्मृतीचा आधार.

सर्व स्मृतिकारांत मनु हा आदिस्मृतिकार होय. सबब, त्याचें वचन सर्वमान्य समजतात. ह्यानें प्रजोत्पादनाच्या बाबतींत असें लिहिलें आहे कीं, नानाविध प्रजा निर्माण करण्यासाठीं, परमेश्वरानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, हे वर्ण उत्पन्न केले, व त्यांपासूनच भिन्न भिन्न लोक निर्माण झाले.

**लोकानांतु विवृद्ध्यर्थं मुखबाहूरुपादतः ।**
**ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं शूद्रंचनिरवर्तयत् ॥ ३१ ॥**
( मनुस्मृति. अ. १ ला ).

श्रुतीचा आधार.

आतां, स्मृतीपेक्षां सुद्धां श्रुति हा पुराणतर ग्रंथ असून, ह्यावरूनही ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, हे चातुर्वर्ण्य सहस्त्रशीर्ष पुरुषापासूनच निर्माण झाल्याविषयीं वर्णन आहे.

**ब्राह्मणोस्य मुखमासीत् । बाहूराजन्यः कृतः ॥**
**उरूतद्स्ययद् वैश्यः । पद्भ्यां शूद्रोऽअजायत ॥**
( ऋ. वे. अ. ८ अ. ४. )

फार तर काय सांगावें, पण, उत्क्रान्तिनियमाच्या मूल-

---

१ भारतीय साम्राज्य. पु. २ रें पहा.

उपनिषदें व त्यांतील उत्क्रांतिनियम.

तत्वाचा धडा देखील, आमच्या आर्यपूर्वजांस चांगला माहित असल्याचें, श्रुतीवरूनच अगदीं व्यक्त होतें. कारण, उपनिषदांत त्यासंबंधाचा स्पष्ट उल्लेख केला आहे.

**तस्मादात्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यःपृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नम् । अन्नाद्रेतः । रेतसः पुरुषः ।** इत्यादि.

मनूनें[1] देखील ह्याच उत्क्रान्तिनियमाचा अनुवाद करून, सृष्ट्युत्पत्तीचा उपक्रम सांगितला आहे, हें विशेष रीतीनें सांगावयास नको. मात्र, माकडांची अथवा वानरांची उत्क्रान्ति होऊन, त्यापासूनच मानवीप्राणी झाला, ही कोटी आमच्या आर्यपूर्वजांस बिलकुल संमत नव्हती; आणि ती अजून देखील निर्विवाद सिद्ध झाली नाहीं; असें अनेक प्रमाणांवरून[2] कळून येतें. शिवाय, मनुष्यादि कोटींतले प्राणी निरनिराळे उत्पन्न केले असल्याविषयीं, मनु[3]स्मृतींतही वर्णन आहे.

---

१ मनुस्मृति. अ. १ ला. श्लोक. ७५-७६-७७-७८ पहा.

२ " It must be admitted, however, that in our present state of knowledge, all these theories of the place, time, and manner of human origins are *speculations* rather than *Science.* "

( Human Origins, By S. Laing. 1897. P. 418. )

३. **पतीन्प्रजानामसृजंमहर्षीनादितोदश** ॥३४॥ (अ. १ ला).
**यक्षरक्षःपिशाचांश्चगन्धर्वाप्सरसोसुरान्**। इत्यादि ॥ ३७ ॥ ( अ. १ ला. ).

**किन्नरान्वानरान्मत्स्यान्विविधांश्च विहंगमान् । पशून्मृगान्मनुष्यांश्च व्यालांश्चोभयतोदतः** ॥२९॥(अ१ला).

तथापि, उत्क्रांति नियमाचें तत्व आमच्या **आर्य** पूर्वजांस चांगलें माहित होतें. इतकेंच नव्हें तर, उत्क्रान्तिनियमानेंच ह्या सृष्टीची रचना झाली, हें सुद्धां ते समजून असत; व ती गोष्ट सदरीं नमुद केलेल्या उपनिषदांतील ऋचेवरून उत्तम रीतीनें व्यक्त होण्यासारखी आहे.

उत्क्रातितत्वाची मूळ आर्यांचीच कल्पना,

आतां, **डार्विनूनें** ह्याच उपपत्तीचें अवलंबन केल्याचें दिसतें. मात्र, त्यानें ती पुष्कळ बाबतींत थोडयाबहुत अंशानें विसृत केली. कित्येक गोष्टींत आणखी शोध करून, त्यानें प्रत्यक्ष प्रयोगही करून पाहिलें. आणि आपल्या परिपक्वदशेप्रत आलेल्या अनुभवानें, उत्क्रांति नियमाची व्यापकता त्यानें जगापुढें ठेविली. परंतु, तेवढयावरूनच त्याचे सर्व सिद्धान्त खरे आहेत, असें म्हणतां येणार नाहीं.

व तिचा डार्विनूनें केलेला विस्तार.

असो. हा मानवी प्राणी या भूतलावर कोठें उत्पन्न झाला, व त्याच्या जन्मभूमीचा हा विशेष बहुमान कोणत्या प्रिय भूमीच्या वाटणीस म्हणून राखून ठेविला होता, याविषयींचें अवश्य तें विवेचन येथेंच केलें पाहिजे.

मानवी प्राण्याचें उत्पत्तिस्थान भरतभूमि.

आमच्या पुराणांवरून[1], हा बहुमान निःसंशय आमच्या भरतभूमीच्याच हिश्शाचा असल्याचें दिसतें. इतकेंच नव्हें तर, आमच्या पुराणतर स्मृती[2], आणि त्याहीपेक्षां प्राचीनतर

---

१ अग्निपुराण. अ २. ( ११-१४ ). अ ३. ( ४-५-७-८-९ ). गरुडपुराण. अ. १. २३

२ मनुस्मृति. अ. १. ( ३५. ३६. ३७. ६२. ६३ ). अ. २. (१७. १८ ).

असे जे वेद, त्यावरून देखील, मनुष्याची जन्मभूमी, निदान आम्हां आर्यांचें आदिनिवासस्थान तरी, भरतखंडच होतें, असें मानण्यास बळवत्तर कारण मिळतें.

तद्विषयक आमची परंपरेनें झालेली समजूत.

आमचे पुराण आर्य मुळचे भरतखंडांतलेच असल्याविषयीं आह्मीं निःशंक समजतों. इतकेंच नव्हें तर, स्वजन्मभूमिविषयक आजपर्यंतची आमची परंपरा देखील भरतभूमींतीलच आहे. त्यामुळें, आम्हां आर्यहिंदूंची व आबालवृद्धांची अशी ठाम कल्पना आहे कीं, आमचें जन्म ह्या पुण्यभूमींत होऊन, येथूनच आम्ही वाढीस लागलों; आणि येथूनच आम्ही चोहोंकडे पसरलों. आम्ही आपलें बालपण, तारुण्य, व वृद्धावस्था येथेंच घालविली;आणि आम्हीं आपलें आहारविहार, क्रीडाकौतुक, यज्ञयाग, होमहवन, पूजाअर्चा, इत्यादि नानाविध क्रिया देखील येथेंच केल्या. त्या कारणानें, आमचे आचारविचार, ज्ञानविज्ञान, कलाकौशल्य, श्रुतिस्मृति, देवदेवता, इत्यादींचा प्रत्यक्ष किंवा पर्यायाचा संबंध केवळ आमच्या भरतखंडाशींच असल्याचें उघड दिसतें. फार तर काय

---

१ ऋ. वे. ( ४. ३०. १८ ). ( अ २. अ ५. व २३. मं २. अ. सू ३–१९४ ).

(अ ९. अ ७. व २५. मं २. अ ४. सू ३६–२२७).

(अ ३, अ ३. व २१. मं ३. अ ४. सू ५३–२८७).

अखिल जगांत, ऋग्वेद हेच पुराणतम ग्रंथ होत, असें पाश्चात्त्य विद्वानही समजतात.

(Max Muller. What can India Teach ? 1883. P. 118).

भारतीय साम्राज्य. पु. ९ वें.

२ भारतीय साम्राज्य. पु. १–२–८–९ पहा.

सांगावें पण, आमचे पौराणिक कथाप्रसंग, आमच्या देवादिकांचीं निवासस्थानें, त्यांचीं अति पूज्य मंदिरें, त्यांचीं विहारोद्यानें, त्यांच्या संचारवीथिका, व त्यांचीं नन्दनवनें, हीं यच्चावत् हिमालयांत, त्याच्या प्रांतभागीं, अथवा त्याच्या निम्नप्रदेशांत, किंवा मेखलाप्रांतांत, आणि गगनचुंबिशिखरांवरच असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

पुराणावरून आमची जन्मभूमि भरतखंडच असल्याचें दिसतें. कारण, विष्णुपुराणांत, सृष्ट्युत्पत्तिनंतर, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शुद्र, हे चार वर्ण उत्पन्न केल्याविषयींचें वर्णन आहे. आणि ज्यापेक्षां हें चातुर्वर्ण्य आमच्या भरतखंडांशिवाय अन्यत्र कोठेंही नाहीं, त्यापेक्षां हें वर्णचतुष्टय येथेंच उत्पन्न होऊन, येथूनच तें व त्यांच्यापासून झालेली इतर भ्रष्ट प्रजा इतस्ततः फैलावली जाऊन, ती देशान्तरीं गेल्याचें उघड होतें.

विष्णुपुराणांतील प्रमाण.

**प्रजाः ससर्ज भगवान् ब्रह्मा नारायणात्मकः ।**
**प्रजापति–पतिर्देवो यथा तन्मे निशामय ॥ २॥**

(विष्णुपुराण. १–४)

**पद्भ्यामन्याः प्रजा ब्रह्मा ससर्ज द्विजसत्तम ।**
**तमः प्रधानास्ताः सर्वाश्चातुर्वर्ण्यमिदं ततः ॥ ५ ॥**
**ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्च द्विजसत्तम ।**
**पादोरुवक्षः स्थलतो मुखतश्चसमुद्गताः ॥ ६ ॥**

(वि. पु. १–६)

स्मृतींतला आधार.

पुराणापेक्षां प्राचीनतर ग्रंथ म्हटला म्हणजे मनुस्मृति असून, ह्यावरून देखील आमचा जन्म ह्या भरतभूमींतच झाल्याचें होतें. कारण, आमचें मूलनि-

वासस्थान व जन्मभूमी कोणती, याविषयींचा सांद्यन्त दाखल मनुस्मृतिकारांनीं फारच खुलासेवार दिला आहे.

ब्रह्मावर्त.

आम्हा आर्यांचा देश कोणता, याविषयींचा उल्लेख मनूनें प्रथमतःच थोडक्यांत करून, तो सर्वांस महशूर असलेल्या सुप्रसिद्ध सरस्वती आणि दृषद्वती नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश होय, असें त्यानें स्पष्टपणें सांगितलें आहे. इतकेंच नव्हें तर, हा देश देवनिर्मित असून, त्याला ब्रह्मावर्त म्हणतात, अशाविषयींसुद्धां त्यानें दिग्दर्शन केलें आहे.

**सरस्वती दृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् ।**
**तं देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ॥ १७ ॥**

( मनुस्मृति अ. २ ).

आमच्या जन्मभूमींचें अनादिकालीनत्व.

अशा प्रकारें आमच्या मूलनिवासस्थानाचें मनुस्मृतिकारांनीं वर्णन केल्यावर, आम्हां आर्यांची ही जन्मभूमि केवळ आजकालची नसून, ती अनादिकालापासूनच तशी असल्याबद्दल सर्वांस माहीत आहे, असें त्यांनीं सुचविलें. किंबहुना, सदरहू श्लोकांतील "**देवनिर्मितं**" शब्द, व पुढील श्लोकांतील "**पारंपर्यक्रमागतआचारः**" या शब्दांनींच तें त्यांनीं ध्वनित केलें, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

आचारविचारांचें अनादिकालीनत्व.

असो. याप्रमाणें, आर्यांच्या वसतिप्रदेशाचें सामान्य दिग्दर्शन करून, त्यांच्या आचारविचारासंबंधीं देखील मनूनें थोडक्यांत सांगितलें; आणि हा आचार-

विचार, आर्यदेश व आर्यलोकांप्रमाणेंच अति प्राचीन आणि अनादि आहे, असें त्यानें लिहिलें.

तस्मिन्देशे य आचारः पारंपर्यक्रमागतः ।
वर्णानां सान्तरालानां स सदाचार उच्यते॥१८

( मनुस्मृति. अ. २ )

भावार्थः––ह्या प्रदेशांतील ( ह्मणजे सुप्रसिद्ध सरस्वती आणि दृषद्वती नांवाच्या देवनिर्मित नद्यांच्या दरम्यानच्या प्रांतांतील ) आचार, अगदीं अनादिकाळचा व परंपरेनें चालत आलेला असून, तो फार पवित्र आहे. आणि ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्णांपासून तों थेट संकीर्ण जातीपर्यंतही तो पाळण्यांत येतो.

ब्राह्मणांपासून जगास मिळालेलें शिक्षण

आतां, सरस्वती व दृषद्वती ह्या सुविख्यात नद्या हिमालयाच्या दक्षिणेस असून, ब्रह्मावर्ताचें वर्णन झाल्यावर ब्रह्मर्षि देश कोणता, हें मनुस्मृतींत थोडक्यांत सांगितलें आहे. त्यावरून, ब्रम्हर्षि देशांत कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाळ, आणि शूरसेन, इत्यादींचा समावेश होत असल्याचें उघड होतें. इतकेंच नव्हें तर, क्षत्रियादि वर्णांस, व ह्या जगत्तलावरील अखिल मानवांस, हरएक आचारविचारासंबंधीं शिक्षण, या भरतखंडांतल्या ब्राह्मणांपासूनच मिळालें असल्याचें स्पष्ट दिसतें.

कुरुक्षेत्रंच मत्स्याश्चपंचालाः शूरसेनकाः ।
एषब्रह्मर्षिदेशोवै ब्रह्मावर्त्तादनंतरः ॥ १९ ॥
एतद्देश प्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
स्वंस्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः २०

( मनुस्मृति. अ. २. )

भावार्थः—ब्रह्मावर्तानंतर ब्रह्मर्षिदेश लागतो; आणि ह्यांतच कुरुक्षेत्र, मत्स्यदेश, पांचालदेश, व शूरसेनक, यांचा समावेश होतो.

ह्या प्रदेशांत उत्पन्न झालेल्या ब्राह्मणांपासून, पृथ्वीवरील सर्व मनुष्यांस, ज्यांच्या त्यांच्या पृथक् पृथक् आचारविचारांचें शिक्षण मिळालें.

ह्यावरून, आह्मां आर्यांची जन्मभूमि भरतखंडच असल्याचें उघड दिसतें; आणि ही गोष्ट वर नमुद केलेल्या प्रमाणांवरून अगदीं शाबीत ठरते.

शिवाय, आर्यावर्ताचें[1] वर्णन केल्यानंतर, मनुस्मृतिकारांनीं यज्ञार्ह म्हणजे यज्ञ करण्याला योग्य देश कोणता, हें थोडक्यांत सांगितलें; व सदरीं जे जे देश नमुद केले, त्या पलीकडील सर्व टापू म्लेंच्छ समजावयाचा, असें त्यांनीं लिहिलें.

यज्ञार्हदेश व त्याच्या पलीकडील म्लेंच्छ देश.

**कृष्णसारस्तु चरति मृगोयत्र स्वभावतः ।**
**सज्ञेयो यज्ञियो देशो म्लेच्छ देशस्त्वतः परः ॥२३॥**

( म. स्मृ. अ. २ ).

ह्याखेरीज, आर्य लोकांची उत्पत्ति भरतखंडांतच झाली असल्याविषयीं, मनुस्मृतींत आणखी एक प्रत्यक्ष प्रमाण मिळतें. सबब, त्याचाही येथेंच उल्लेख करणें अवश्य आहे. मनूनें एके ठिकाणीं स्पष्टपणें असें म्हटलें आहे

मनुस्मृतीवरून भरतखंडांतच आर्यांची उत्पत्ति.

[1] **आर्या** अत्रावर्तन्ते पुनः पुनरुद्भवंतीत्यार्यावर्त्तः । ( कुल्लूकभट्टाचार्यकृत मनुस्मृतीवरील टीका पहा. )

( म. स्मृ. अ. २. २२. )

कीं, ह्या देशांत जन्म पावलेल्या ब्राह्मणांपासूनच पृथ्वीवरील सर्व मनुष्यांस, ज्यांच्या त्यांच्या पृथक् पृथक् आचारविचारांचें शिक्षण मिळालें. त्यावरून, भरतखंडाव्यतिरिक्त अन्यत्र कोठेंही आमची जन्मभूमि नाहीं, असें वाटतें.

**एतद्देशप्रसूतस्यसकाशादग्रजन्मनः ।**
**स्वंस्वंचरित्रं शिक्षेरन पृथिव्यांसर्वमानवाः ॥ २० ॥**

( मनुस्मृति. अ. २. )

तद्विषयक पाश्चात्यांचें मत, व त्याचें निराधारत्व.

आतां, कित्येक पाश्चत्यांची अशी समजूत आहे कीं, आम्ही आर्य लोक भरतबाह्य देशांतून भरतखंडांत आलों, आणि येथील लोकांस जिंकून आम्हीं आपली नूतन वस्ती ह्या भरतभूमींत केली. परंतु, ह्या कल्पनेस बलवत्तर असें प्रमाण कोणतेंही नाहीं. येवढेंच नव्हें तर, भरतबाह्य प्रदेशांतून केवळ आगन्तुकाप्रमाणें येऊनच जर आम्ही येथें राहिलों असतों तर, "**परकीयांचा देश दुसराच आहे,**" ( म्लेच्छे देशस्त्वतः परः[२] । ) असें आम्ही कधीं देखील खचितच म्हटलें नसतें.

वेबरची कबुली.

आम्ही आर्य भरतबाह्य प्रदेशांतून भरतखंडांत आलों असल्याबद्दल, आमच्या ग्रंथांत अथवा ग्रंथांतरीं काडीमात्रही दाखला नाहीं, असें वेबरनेंही कबूल केलें आहे.

" In the picture just now drawn, positive signs are, after all, almost *entirely wanting*, by which

---

१ ही गोष्ट पाश्चात्य देखील कबूल करितात, व ती वेबर, स्पीजेल, मूर, कॉबेल, मॉक्समुलर, एल्फिन्स्टन, इत्यादि नांवाजलेल्या विद्वानांच्या ग्रंथांवरून वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

२ मनुस्मृति. अ. २, २३.

उच्चार आर्य: -



we could recognise the country in which our forefathers dwelt and had their common home."

( Modern Investigations on Ancient India. P. 10.)

सदरहू, व पुढील अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत.
( ग्रंथकर्ता. )

स्पीजेलचा अभिप्राय.

स्पीजेल म्हणतो कीं, हिंदु, पारसीक, ग्रीक, रोमन, जर्मन, इत्यादि सर्व, आर्यकुटुंबाच्या शाखा होत. परंतु, त्यांचें मूलनिवासस्थान कोणतें, हें बिलकूल निश्चित झालें नसून, तें केव्हांही निश्चित होण्याचा संभवच नाहीं.

" All these nations Indians, Persians, Greeks, Romans, Germans, Slavonians, and perhaps also the Celts, are branches of one single original family, whose abodes *have not yet been certainly determined*, and perhaps *will never be ascertained in a way to preclude all dispute.*"

मूरचें मत.

मूरची अशी स्पष्ट कबुली आहे कीं, हिंदूंच्या पुराणमग्रंथांत देखील, ते भरतबाह्य प्रदेशांतून भरतखंडांत आल्याचा यत्किंचित्‌ही उल्लेख नाहीं.

" I must, however, begin with a *candid admission*, that, so far as I know, *none* of the Sanskrit books, *not even the ancient, contain any distinct reference or allusion to the foreign origin* of the Indians. "

( Muir's Sanskrit Texts. vol. II. P. 322.
Second Edition ).

कॉवेलचें ह्मणणें.

प्रोफेसर कॉवेल तर असें स्पष्टपणें लिहितो कीं, भाषेंतील साम्य हें एकप्रकारचा संबंध मात्र दाखवितें. परंतु, तें कोणत्यास्थळीं आणि केव्हां घडून

आलें, याबद्दलचा निर्णय, त्यावरून कोणत्याही प्रकारें करितां येत नाहीं.

This similarity and lingnistic sympathy proves only the fact of a connection; *but they prove nothing regardiny the place where it subsisted. nor about the time.*"

मॉक्समूलरचेंही अशाच मासल्याचे उद्गार असून, तो

मॉक्समूलरचे उद्गार. असें ह्मणतो कीं, हे आर्य कोठून आले व ते प्रथमतः कोठें राहिले होते, हें कोणाला सुद्धां निश्चित करतां येत नाहीं.

"But *no one can now determine the exact spot whence they came*, and *where they* had *been previously settled.*"

(Last Results of the Turanian Researches.)
P. 340).

सुप्रसिद्ध इतिहासकार एलफिस्टन्चें असें मत आहे

एलफिन्स्टनचे विचार. कीं, आर्यहिंदु हे भरतखंडाबाहेरून आले होते, अथवा भारतेतर देशांत ते राहिले होते, असें मानण्यास कांहीं एक कारण नसून, ते कदाचित् अति प्राचीनकाळीं, भरतखंडांतलेच मूळचे राहिवाशी असतील.

"The question therefore is still open. There is *no reason whatever for thinking* that the Hindus *ever inhabited any* country but their present one; and *as little for denying* that they have done so before the earliest trace of their records or tradtions."

(Elphinstone's History of India).

तथापि, कित्येक पाश्चात्यांचें असें ठाम मत आहे कीं,

क्रूझरचें मत. अखिल आर्य कुटुंबाची केवळ भरतखंडच जन्मभूमि असून, तद्व्यतिरिक्त ती अन्य कोठेंही नाहीं.

क्रूझर[१] नावाचा एक फ्रेंच पंडित म्हणतो:—

" If there is a country on earth *which can justly claim the honour of having been the cradle of the human race*, or at least the scene of primitive civilization' * * * *that country assuredly is* India. "

मॉन्सियर. लुई. जेकोलियट[२] नांवाचें दुसरे एक फ्रेंच शोधक असें लिहितात कीं, सर्व राष्ट्रांचें आदिस्थान भरतभूमीच होय. येथूनच हरएक शास्त्राची उत्पत्ति झाली. येथूनच सर्वांस कायदेकानू मिळाले. येथूनच सर्वांस धर्मबंधन प्राप्त झालें. नीतिशिक्षण देखील येथूनच उदयास येऊन, तें अखिल जगास मिळालें. आणि मानवी कुटुंबाच्या यच्चावत् शाखा देखील येथूनच सर्वत्र पसरल्या.

लुईजेकलियटचा अभिप्राय.

कर्झनने[३] तर असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, आर्यहिंदु हे आर्यावर्त्तांतलेच मुळचे रहिवाशी होत. इतकेंच नव्हें तर, ह्यांच्याच कुटुंबांतील शाखा पश्चिमेकडे सर्वत्र पसरून, त्यांच्या भाषेचे पोटभेद, किंवा त्यांचे अपभ्रंश, त्या त्या शाखांबरोबर इतस्ततः प्रचारांत आले आहेत.

कर्झनचें मत.

कर्झन् ह्मणतो:—

" *On the contrary the facts above delineated point to the conclusion that the rise*, progress advance

---

१ भारतीय साम्राज्य पु० २ रें पान २ पहा.

२ भारतीय साम्राज्य पु० ३ रें प्रस्तावना. पान २–३–४ पहा. तसेंच, ( M. Louis Jacolliot's La Bible Dans L'Inde, or Bible in India ), " भरतखंडांतील पवित्र शास्त्र " नांवाचें पुस्तक पहा. ( P. P. VII. VIII ).

३ Journal Royal Asiatic Society. vol. XVI.

in the arts and civilization of this *remarkable people* ( Aryavarta ), developed during the course of long ages, and *communicated to other nations.*" P. 199.

* * * * * * * * *

"I also venture to affirm that *they* ( other languages such as Zandic, Greek, Latin, Gothic, &c. ) *have all sprung, at different chronological periods, from the* Sanskrit, ( that is, the Vaidic Sanskrit. )" P. 177.

( सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. )
( ग्रंथकर्ता. )

असो. अशा प्रकारचे अनेक दाखले दाखवितां येतील. परंतु, विस्तारभयास्तव तसें करितां येत नाहीं. सबब, पुढील विवेचनाकडे वळतों.

महाभारतांतीलप्रमाण.

आतां, महाभारत हें मनुस्मृतीच्याही पूर्वीचें असून, त्यावरून देखील, आर्यांची उत्पत्ति भरतखंडांतच झाली असल्याचें दिसतें. कारण, त्यांत गुणकर्मविभागाप्रमाणें ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्ण उत्पन्न केल्याबद्दलची हकीकत श्रीकृष्णभगवानानें अर्जुनास सांगितली असून, ही वर्णसंस्था केवळ भरतभूमींतलीच असल्याविषयीं अगदीं निर्विवाद आहे.

चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्म विभागशः ।
तस्य कर्त्तारमपिमां विध्द्य कर्तारमव्ययम् ॥१३॥

( भगवद्गीता. अ. ४. )

याहींपेक्षां पुराणतर दाखला रामायणांतील होय. आणि

रामायणांतील दाखला.

त्यावरून असें निःसंशय दिसतें कीं, युगान्तरीं सुद्धां, भरतखंडालाच काय तें एकान्त विश्रान्तीचें स्थान मानीत असत. इतकेंच नव्हें तर, देवादिकांस देखील तेंच एक निवासस्थल होऊन राहिलें होतें. कारण, येथेंच तपश्चर्या करण्यासाठीं, वामन अवताराच्याही पूर्वी, विष्णूनें एक पवित्रस्थान शोधून काढून, तेथें तपश्चर्या केली, व तेंच पुढें सिद्धाश्रम नांवानें सुप्रसिद्धीस आलें, अशाविषयीं एक आख्यायिका आहे.

**इह राम महाबाहो विष्णुर्देव नमस्कृतः ।**
**वर्षाणि सुबहूनीह तथायुग शतानिच ॥ २ ॥**
**तपश्चरण योगार्थमुवास सुमहातपाः ।**
**एषपूर्वा श्रमोराम वामनस्य महात्मनः ॥ ३ ॥**

( रामायण. बालकाण्ड. सर्ग २९. )

ऋग्वेदांतील पुरावा.

सर्वांत प्राचीनतर प्रमाण म्हटलें ह्मणजे ऋग्वेदांतील होय. सबब, तेंच विशेष महत्वाचें जाणून तिकडे क्षणभर वळूं, आणि आम्हा आर्यांचें भरतखंड हेंच अनादि कालापासूनचें निवासस्थान आहे, अशाबद्दलचा कांही दाखला मिळाला तर पाहूं.

ऋग्वेदांतील एका ऋचेंत असें ह्मटलें आहे कीं, इन्द्रानें

आर्यांसाठीं, पाणी, भूमि, व प्रकाश, यांची निर्मिती.

आपल्या उज्ज्वल मित्रांसहित आर्यांस भूमि, सूर्य, आणि पाणि दिलें.

**सनत्क्षेत्रंसखिभिःश्वित्न्येभिःसनत्सूर्यंसनदपःसुवज्रः**

( १. १००. १८. )

ह्यावरून, असें उघड होतें कीं, इन्द्रानें निर्माण केलेल्या भूमींतच आह्मी उत्पन्न होऊन, सृष्टपदार्थांचें यथार्थ अव. लोकन होण्यासाठीं, त्यानें आह्मांला सूर्याचा प्रकाश दिला, राहण्याकरितां जागा दिली, व पिण्यासाठीं पाणी दिलें.

आतां, इन्द्र ही केवळ **आर्यहिंदूंचीच** देवता असून, तिचा प्रत्यक्ष संबंध केवळ **भरतखंडाशींच** असल्यामुळें, आह्मी भरतभूमींतच उत्पन्न झालों असल्याचें निर्विवाद होतें.

परंतु, कोणी कदाचित् अशी शंका घेईल कीं, फक्त सदरीं नमुद केलेल्या ऋचेवरूनच हिंदू हे भरतखंडांतच प्रथम निर्माण झाले, असें खात्रीपूर्वक म्हणतां येणार नाहीं. सबब, ह्या म्हणण्याच्या विशेष पुष्टीकरणार्थ, आणि आमच्या प्रतिपादनाचें योग्य रीतीनें समर्थन व्हावें यासाठीं, आणखी एका ऋचेचा आधार वाचकांपुढें ठेवितों.

**( स वृत्रहा इन्द्रः ) अजनयद् मनवे क्षामपश्चेत्यादि ।**

( ऋ. वे. २, २०, ७ )

ह्यावरून, इन्द्रानें **मनूसाठीं** भूमि व पाणी उत्पन्न केल्याचें उघड होतें. इतकेंच नव्हे तर, **मनु** हा सर्व **आर्य**-शाखांचा, किंबहुना अखिल मानवी कुटुंबाचा प्रपितामह आणि जनिता असल्याकारणानें, व **मनु**, इन्द्र, आणि **भरतभूमि**, यांचा निकट व अनादि संबंध असल्यामुळें, आम्ही भरतखंडांतच जन्म पावलों असल्याचें निःसंशय ठरतें.

तथापि, कित्येक विद्वान आणि बहुश्रुतवाचक हे याही ऋचेवर आक्षेप घेतील, व असें प्रतिपादन करतील कीं, ज्यापेक्षां सदरहु ऋचेंत भूमीचा उल्लेख नाहीं, त्यापेक्षां केवळ **मनु** अथवा इन्द्र शब्दावरूनच **आर्यांची** जन्मभूमि

भरतखंडच आहे, असें सिद्धवत् मानणें बरोबर होणार नाहीं. यासाठीं, ह्या शंकेचेंही निरसन होण्याकरितां, ज्या ऋचेंत भरतभूमींतील स्थलनिर्देश केला आहे, तीच ऋचा येथें नमुद करतों.

**उताक्षितिभ्योऽवनीरविन्दः ।** ( ऋ. वे. ६,६१,३ )

ही ऋचा **सरस्वती** नदीला अनुलक्षून असून, तींत **असें** म्हटलें आहे कीं, (हे सरस्वति) "तूं मनुष्यासाठीं, म्हणजे (**आर्यां**करितां), भूमि संपादन करून दिलीस."

सरस्वती नदीचा प्रदेश.

आतां, ही **सरस्वती** नदी **उत्तरहिंदुस्थानांत** असल्यामुळें, **आर्यां**च्या जन्मभूमीविषयीं शंका राहत नाहीं, आणि ह्या नदीच्या आसपासच्या प्रांतांतच ते उत्पन्न झाल्याबद्दल निर्विवाद ठरतें.

ही **सरस्वती** नदी **आर्य**बालकांस उदकरूपी स्तनपान देऊन, त्यांचें सर्वतोपरि कल्याण करते, अशाविषयीं आणखी ही एका **ऋ**चेंत वर्णन आहे.

तिचें स्तनपान.

**यस्तेस्तनःशशयोयोमयो भूर्येन विश्वापुष्यसिवार्याणि ।**
**योरत्नधावसुविद्यःसुदत्रःसरस्वातितामिहधातवेकः ४९**
(ऋ. वे. अ. २. अ. ३. व. २३. मं. १. अ. २२. सू. १६४.)

**भावार्थ**—हे **सरस्वति**! तुझा स्तन पूर्ण भरलेला असून, तो सुखदायक आहे. कारण, तो फार उदार असून, तो आम्हांला धन देतो, आणि आमची संपत्तीही वृद्धिंगत करतो. सबब, हाच स्थन आम्हांस प्यावयास दे.

अर्थात्, तुझ्या कल्याणकारक पात्रांतून आम्हांला विपुल पाणी दे, असा ह्या ऋचेचा इंगितार्थ होय, हें उघड आहे.

आणखी एका ऋचेंत, सोमाला अनुलक्षून असें ह्मटलें आहे कीं, हे सोमा, इन्द्रानें तुझ्याशीं सख्य करून तुझ्या साहाय्यानें आ-र्यमनूसाठीं उदक निर्माण केलें. त्या कारणानें, सप्तसिन्धू वाहत राहून, पाण्याचीं द्वारेंही खुलीं झालीं.

सप्तसिन्धूचा प्रांत.

त्वायुजातवतत्सोम सख्य इन्द्रो अपो मनवे ससुतस्कः ।
अहन्नहिमरिणात्सप्तसिन्धूनपावृणोदपिहितेवखानि॥ १
(ऋ. वे. अ. ३ अ. ६ व १७. मं. ४. अ ३. सू २८-३२४).

ह्या ऋचेंत नमूद केलेल्या सप्तसिन्धू ह्मटल्या ह्मणजे, प्रचंड सिन्धुनद, व झेलम, रावी, चीनाब, बियाज, सतलज, आणि सरस्वती, अशा नद्या होत.

सदरहू सर्व प्रमाणांवरून, आह्मां आर्यांची जन्मभूमि भरतखंडच असल्याचें निःसंशय होतें; आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें येथूनच आह्मीं सर्वत्र पसरल्याचें अनुमान सिद्धवत् ठरतें.

आतां, ह्यासंबंधानें कित्येक शोधक पंडित आणि पाश्चात्य विद्वान ह्यांचें काय म्हणणें आहे, याविषयींचा विचार करूं; व सर्व बाजूंचें दिग्दर्शन होण्याकरितां, केवळ वाचकांच्या सोईसाठींच, त्याबद्दलची तपशिलवार हकीकत थोडक्यांत देऊं. म्हणजे त्यावरून, एकंदर मथितार्थ ध्यानांत आल्यानें, खरी वस्तुस्थिति कशी असावी, याविषयींची कल्पना करण्यास वाचकास सुलभ पडेल, आणि विषयपरिशीलनानें ठाम मत करण्यास चांगलें साधनही होईल.

ह्यासंबंधानें पाश्चात्य मताचा विचार.

कित्येक ख्रिस्ती धर्मानुयायी, हे ख्रिस्तीधर्मशास्त्राला (बायबलास) पवित्र व खरें मानीत असल्यामुळें, त्यांचें मत असें आहे कीं, आदाम हाच ईश्वरानें निर्माण केलेला पहिला मानवी प्राणी असून, त्याची जन्मभूमी ईडन होय. परंतु, हें पवित्र शास्त्र, आणि नंदनवन, अथवा भाषेची ही जन्मभूमी, यांसंबंधानें पुष्कळांचे नानाप्रकारचे आक्षेप आहेत.

ईडन जन्मभूमि.

फ्रीडरिच् डेलिटझ्च्या मताप्रमाणें, हें नन्दनवन बगदाद व बॉबिलन् यांच्या दरम्यान असावें, आणि तद्विषयक पुष्टीकरण त्यानें आपल्या ग्रंथांतही केलें आहे.[1] बून्हॉयचें असें म्हणणें आहे कीं, ईडन हें अटलांतिक महासागराच्याही पलीकडे अमेरिकाखंडांत आहे, व ह्या अभिप्रायाला क्लॉपरॉथ, गोबिनी, इत्यादींची संमती असल्याचें दिसतें.[2] परंतु, जिरोल्डमासीचें याहून ही अगदीं भिन्न मत असून, ईडन हें निरक्ष आफ्रिकेंतच असल्याविषयीं, त्याच्या लेखावरून व्यक्त होतें.[3]

अमेरिका व आफ्रिकाखंडांत तिचें अवस्थान.

फायलो असें म्हणतो कीं, ईडन् हें विशिष्ट स्थल नसून, तीं कैवल्याची एका प्रकारची स्थितीच होय. इतकेंच नव्हें तर, जुन्या करारांतील गोष्टी म्हणजे, अध्यात्मविषयक दृष्टान्तच समजावयाचे, असा त्याचा अभिप्राय आहे. तथापि, जिरोल्ड मॉसीचें याहून भिन्न मत आहे; व तो ईडन हें

तद्विषयक आक्षेप, व मतान्तरें.

1 "WO log dos Paradies"?
2 "Trans-Atlantic Eden of the West".
3 "Natural Genesis". 1883.

आर्मीनियांत, व्हॉन सरोवराच्या तळाशीं असल्याचें सांगतो.[1] कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, वारिविप्लवानें सर्वांचाच विध्वंस झाल्यामुळें, आतां ईडनचा शोध लागणें शक्य नाहीं. परंतु, कॉल्व्हिन हा या मताविरुद्ध आहे, आणि तो ईडन् हें सुभ्रांता[2] नदीच्या मुखाजवळ असल्याचें लिहितो. हरझॉग् नामक जर्मन पंडितानें एके ठिकाणीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, ईडनचा कथाभाग ह्मणजे पौराणिक कालांतील काल्पनिक भूवर्णनच होय. पण, प्रीसेलचें तसें मत नसून, सुभ्राता व शिंग्री[3] नद्यांच्या संगमावरच ईडन आहे, असें तो ह्मणतो; आणि डिलमन् तर, भरतखंडाच्या उत्तरेस हिमालय पर्वतावरच ईडन् असल्याचें लिहितो.[4] कांहींचा[5] असा अभिप्राय आहे कीं, जुन्या करारांतलें प्रथमचें विवेचन तत्वविषयक व काल्पनिक आहे. शिवाय, मानवी प्राण्याच्या जन्मभूमीचा बहुमान आपल्याच देशाला प्राप्त झाला होता, असें चाल्डी-बाबिलोनियन लोकांचें केव्हां देखील मत नव्हतें; आणि शंकाकृति लेखांवरून सुद्धां तसें असल्याचें दिसत नाहीं, असें ली-नॉर्मंट[6] ह्मणतो. आसिरीभाषाकोविदांच्या समजुतीप्रमाणें, सुभ्राता ही जगद्रज्जु[7] असून, कित्येकांचा

---

१ The Natural Genesis. ( vol II. P. 231 )

२ युफ्रेटीज्. ( कुंटेकृत षड्दर्शनचिन्तानिका पहा. )

३ टायग्रीज्. ( कुंटेकृत षड्दर्शनचिन्तानिका पहा. )

४ Schenkel's Bibel Lycicon.

५ Lichtenberg's Encyclopedie des Sciensès Religienses.

६ Les Origines de l' Historic. Paris 1882.

७ Rope of the world. ( William. F. Warren's "Paradise found." ). Boston. 1893. P. 31.

असा अभिप्राय आहे कीं, गंगा, सुभ्राता, शिंग्री, व नील नदी, ह्या केवळ एकाच नदीच्या अनेक शाखा[1] होत; व कांहीं कांहीं तर, ही सुभ्राता नदी आशिया ( इराण ), आणि आफ्रिका ( मिसोपोटेमिया ), या खंडद्वयांतच असल्याचें सांगतात. परंतु, ग्रॅन्व्हिल पेन् हा बायबलाचा कट्टा अभिमानी असल्यामुळें, तो असें प्रतिपादन करतो कीं, ख्रिस्ती पवित्र शास्त्रांत सुभ्राता नदीच्या संबंधाचा जेवढा म्हणून लेख किंवा उल्लेख आहे, तेवढा प्रक्षेपच होय. अर्थात्, हा उघडच दुराग्रह दिसतो. याप्रमाणें, ईडन् ही मानवी प्राण्याची व अतएव कोणत्याही आदिभाषेची जन्मभूमि असल्याबद्दल ऐकमत्य नसून, ती गोष्ट राइट, व प्रोफेसर ईवर्स, या पाश्चात्य विद्वानांनीं देखील कबूल केली आहे. आणि डाक्तर जूलियस ग्रिल्ल तर असें स्पष्टपणेंच सांगतो कीं, बायबलांतील ईडनांत ऐतिहासिक खरेपणाचा लेशमात्रही नाहीं.

असो. बायबलाचें तत्व, त्याची सत्यता, व त्याचें महत्व, यां संबंधानें ख्रिस्ती राष्ट्रांतील मोठमोठ्या पंडितांचें सुद्धां फारच प्रतिकूल मत असून, ते ह्या धर्मग्रंथाच्या बाबतींत केवळ नाकेंच मुरडतात, आणि त्याला निव्वळ थट्टाच

---

[1] Josephus. [2] Paradise found. P. 29.

[3] रेव्हरंड. एम. डी. प्रेसेन्स हा असें म्हणतो कीं, आमच्या ख्रिस्ती धर्म पुस्तकांइतका वेडगळ, असंबद्ध, आणि अनर्थक, असा ग्रंथ पृथिवीच्या पाठीवर कोठेंही सांपडणार नाहीं.

The Rev. M. de. Pressense admits that *rationally* " there exists no book more absurd and empty than our gospels. "

( Bible in India. P. XI )

मानतात. सबब, तद्विषयक ज्यास्त विवेचन करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

मानवी प्राण्याच्या जन्मभूमीची अनेकता

अशा प्रकारें, मानवी प्राण्याच्या जन्मभूमीचा बहुमान ईडनूला मिळणें शक्य नाहीं, असें पाहून, अमेरिकेंतील नॉट् आणि ग्लिडन् यांनीं दुसरी एक कल्पना काढिली, व ते असें प्रतिपादन करूं लागले कीं, पृथिवीवरील सर्व मनुष्याची एकच जन्मभूमि असणें संभवत नाहीं. अर्थात्, ती भिन्न भिन्न ठिकाणीं, आणि ह्या भूतलावरील निरनिराळ्या भागांत असावी, असा त्यांचा अभिप्राय आहे. परंतु, ह्या मताला विरजण लावणारीं अनेक प्रमाणें असून, पुष्कळ विद्वानांस, व ह्या विषयांत प्रवीणता मिळविलेल्या नामांकित [1]विशिष्टांस देखील, हें विधान संमत नाहीं.

लिमूरिया, व पामीर.

प्रोफेसर झूक्लरचें असें म्हणणें आहे कीं, मानवी प्राण्याचें आदिनिवासस्थान मध्य आशियांतल्या लिमूरिया प्रदेशांतच होतें. परंतु, हा प्रान्त म्हणजे, हिन्दी महासागराच्या उत्तरेस पाण्यांत बुडालेला असा प्रागैतिहासिकभूभाग आणि कल्पना सृष्टिच होय, असें विल्यम् एफ् वारेननें[2] एके ठिकाणीं

---

१ The ablest of the works on the Preadamite Hypothesis remarks, " The plural origin of mankind is a doctrine, now almost entirely superseded. " Warren's " Paradise Found. " P. 54.

२ नन्दनवनाचा शोध, अथवा ( Paradise found ) नांवाचें पस्तक पहा. पान. ३५.

लिहिलें आहे. तथापि, झूकरप्रमाणें, हीकेलक्यांस्पेरिया, पेस्चेल्[2], इत्यादींचें ही मत असल्याचें कळून येतें. मात्र, अनेकभाषाकोविद, पौराणिक, प्राचीनवस्तुशास्त्रज्ञ, नृवंशवेत्ते, वगैरेंचा अभिप्राय याहून भिन्न आहे, व मानवी प्राण्याची जन्मभूमि मध्यआशियांत, पामीरच्या उच्च पठारावर असल्याचें ते म्हणतात.

काटरफेजी नांवाचा एक सुप्रसिद्ध फ्रेंच नृवंशेतिहासज्ञ होऊन गेला. त्याचेंही मत असेंच असून, त्यानें एके ठिकाणीं[3] असें लिहिलें आहे कीं,

This great Central region might be regarded as having included the Cradle of the human race * * * The three fundamental forms of human language are found in the same regions, and in analogous connections. * * * Lastly, it is from Asia, again, that our earliest tamed domestic animals have come. Isidore Geoffray Saint Hilaire is entirely agreed on this point, with Durcan de la Malle."

ओ ब्रीचें मत सुद्धां अशाच प्रकारचें आहे, आणि मनुष्याची उत्पत्ति मध्य आशियांत झाली असावी, असें त्याच्या ग्रंथावरून[4] व्यक्त होतें.

तथापि, मानवी प्राण्याच्या जन्मभूमीविषयीं आणखी ही एक नूतन कल्पना निघाली आहे. सबब, तिचें ही अवश्य तें दिग्दर्शन येथेंच थोडक्यांत केलें पाहिजे. ह्या

उत्तर ध्रुवाचा प्रदेश, व तत्संबंधीं अज्ञान.

[1] The Pedigree of man. [2] Races of men.
[3] The Human Species.
[4] Cradle of the Human Species.

कल्पनेप्रमाणें, मनुष्याचें आदिनिवासस्थान उत्तर ध्रुवाजवळील प्रदेशांतच असल्याचें समजतात. इतकेंच नव्हें तर, तो प्रदेश पूर्वीं, म्हणजे युगान्तरीं केव्हांना केव्हां तरी, मानवी प्राणी, जनावरें, व वनस्पती, यांचें जीवन आणि संगोपन होण्या योग्य असे, अशी कित्येकांची कल्पना आहे. शिवाय, ह्या उत्तरध्रुवप्रदेशाला लागूनच यूरोप व अमेरिका खंड एकमेकाला जोडून, म्हणजे भूमीनें सांधलेलें असे. परंतु, जलप्रलयानें त्यांत स्थित्यन्तर होऊन, तो प्रदेश केवळ नाहींसाच झाला, आणि त्याचा मागमूस देखील राहिला नाहीं. फार तर काय सांगावें, पण, यूरोप व अमेरिका खंडांच्या दरम्यान एक प्रचंड तोयराशिच उद्भवून, हीं दोन्हीं खंडें विभागलीं गेलीं, अशी कल्पना आहे.

क्रॉमेरियन्चें असें मत आहे कीं, हा वारिविप्लव होऊन सुमारें ४२०० वर्षें झालीं असावींत; आणि ह्यानन्तरचा जलप्रलय अजमासें ६३०० वर्षांनीं होणार आहे. परंतु, हें अनुमान बरोबर असल्याचें दिसत नाहीं; व अशा प्रकारचे उत्पात कोणत्या कारणांनीं होतात, याबद्दलचें अज्ञान मोठमोठ्या भूशास्त्रवेत्त्यांससुद्धां कबूल करणें भाग पडतें.

उत्तर ध्रुव प्रदेशाची सांप्रतची स्थिति.

आतां, उत्तरध्रुवाकडील प्रदेशासंबंधानें हल्लींची वस्तुस्थिति पाहिली तर, कोणाच्याही लक्षांत असें तेव्हांच येऊन चुकेल कीं, तिकडे अतिशय थंडी असल्याकारणानें, हा प्रदेश अगदींच सुरम्य नसून, प्राण्याचें पोषण किंवा जीवाचें

---

१ ही वॉरेन् प्रभृतींची कोटि होय, व काउंट सॅपोर्टा हा त्यापैकींच आहे. रा. रा. बाळ गंगाधर टिळक हे याच मताचे होत.

संरक्षण होण्यास देखील, तिकडे कोणत्याही प्रकारची अनुकूलता नाहीं. आणि जर असें आहे तर, आमची प्रथमची वस्ती तिकडे असण्याचा संभवच नाहीं, हें उघड आहे. तथापि, ह्या प्रतिपादनाच्या बाबतींत कित्येक भूगर्भशास्त्रवेत्ते[1] आक्षेप घेतात, व ते असें म्हणतात कीं, जलविप्लवकालापूर्वी, उत्तर ध्रुवाकडील प्रदेशांत, प्राण्याच्या जीवनालायक, मनुष्याला राहण्यायोग्य, आणि वनस्पतीची वाढ होण्यासारखी हवा होती. सबब, मानवी प्राण्याचें आदिनिवासस्थान तिकडेच असावें, असा त्यांच्या म्हणण्याचा आशय आहे.

भरतखंडच आदिनिवासस्थान असल्या बद्दल भूगर्भ शास्त्राचें प्रमाण.

परंतु, ह्या समवेतच आपल्याला ह्या विषयाची दुसरी बाजू, व भूगर्भशास्त्राचें एक महत्वाचें अंग पाहून, त्या संबंधीं चोहोंकडून निःपक्षपाताचा आणि योग्य विचार केला पाहिजे. वाचकास माहितच असेल कीं, हा भूगोल प्रथ-

---

१ प्रोफेसर निकोल्सन् म्हणतो, " And we know that the plants of the temperate regions at that time flourished within the Arctic Circle, "

( Nicholson's Life History of the Globe. P. 327 ).

ग्रॅण्ट ॲलन्नें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

" One thing at least is certain that till a very recent period, Geologically speaking, our earth enjoyed a warm and genial climate up to the actual poles themselves, and that all its vegetation was every where evergreen, of much the same type as that which now prevails in the modern tropics. "

( Knowledge. London. 1883. Botany. P. 327. )

मत: अत्यन्त तप्तावस्थेंत असून, तो कालान्तरानें निवत चालला. मात्र, सपाटीवर आलेला भाग लवकर निवाला, व हिमालयासारख्या अत्युच्च प्रदेशानें आपलें डोकें[2] प्रथम बाहेर काढलें. पुढें, ह्या हिमनगाच्या आसमंतांतील भाग कालान्तरानें थंड होत जाऊन, तो कोरडा पडत गेला, आणि त्या योगानें, व आसपासच्या परिवेष्टनानुरूप, वनस्पति, जीवजंतु, व मानवीप्राणी, यांची उत्पत्ति होण्यास सहजींच अनुकूलता प्राप्त झाली. अर्थात्, ह्या हिमाचलाच्या नैऋत्य दिशेचा व दक्षिणेकडील निम्न प्रदेश भरतखंड होय. येथेंच आमचे आर्यपूर्वज जन्मले. येथेंच ते मोठ्या नांवालौकिकास आले. येथेंच त्यानीं वेद गाइले. आणि येथूनच, ( ते साहसी असून, त्यांची वस्ती व प्रजा वाढल्यां प्रमाणावर असल्या कारणानें, ) ते पूर्व, पश्चिम, दक्षिण, व उत्तर, या चोहों[3] दिशेला पसरले, आणि उत्तरध्रुवाकडील प्रदेशांतही गेले. तेथें गेल्यावर, कालान्तरानें[4] जलविप्लव झाला; व तो केवळ प्रळयकाळच भासला. त्यामुळें, उघडच, सर्वत्र वाताहात झाली; आणि हल्लीं भूगर्भांत, बर्फाखालीं,

१ " The globe was immensely hotter than it is now. "

" It has been gradually cooling. * * * The outer parts have cooled and become solid. "

( Geikie's Geology. 1898. P. 100. )

२ " Where Mountains now stand, the Sea once rolled. " ( Geikie's Geology. P 26 ).

३ भारतीय साम्राज्य. पु. १६ वें पहा. ( हें हल्लीं छापत आहे. )

४ ह्या जलविप्लव कोणत्या कारणांनीं होतो, हें भूशास्त्रज्ञांस देखील निश्चयात्मक सांगतां येत नाहीं.

व अन्यत्र, पूर्वकालीन अवशिष्ट म्हणून जें कांहीं क्वचित सांपडतें, तें ह्या प्रचंड विध्वंसाचेंच फल होय.

असो. उपलब्ध असलेल्या एकंदर प्रमाणांचा विचार करतां, **आर्यावर्त** ( ह्मणजे **भरतखंड** ) हीच मानवीप्राण्याची **जन्मभूमि** व त्याचें **आदिनिवासस्थान** असल्याचें, आमच्या अल्प समजुतीस वाटतें.

पाश्चात्य कल्पनेप्रमाणेंसुद्धां मानवी प्राण्याची जन्मभूमि आर्यावर्त.

ह्याप्रमाणेंच कित्येक **पाश्चात्य** विद्वानांचाही ठाम अभिप्राय आहे. आणि त्यावरून, मानवी प्राण्याची मूलनिवासभूमि **आर्यावर्तच** असल्याचें दिसतें. कारण, एतद्विषयक त्यानीं आपलें अगदीं ठाम मतच प्रदर्शित केलें आहे. शिवाय, आमचें **भरतखंडच** अखिल मानवी प्राण्यांची **जन्मभूमि** असल्याविषयीं **क्रूझर** नामक फ्रेंच पंडिताचें म्हणणें असून, सर्व जगाचें तें **आदि**निवासस्थान असल्याबद्दल **एम. लुई. जे**कलियटचाही अभिप्राय आहे. ( मागें पान १०२ व ११४ ते ११९ पहा. )

सर्व भाषांची जननी संस्कृत व हिची जन्मभूमि भरतखंड.

सदरीं नमूद केलेल्या अनेक प्रमाणांवरून, अखिल मानवी प्राण्यांची जन्मभूमि **भरतखंडच** असावी, असें वाटतें. आणि हीच गोष्ट खरी असेल तर, त्यांची मूळभाषा देखील **आर्य** म्हणजे **संस्कृतच** असली पाहिजे. कारण, आमच्या **आर्य** पूर्वजानीं ह्या **भरतभूमींत** जन्म घेतल्यावर, त्यांनीं परस्परांचें विचार आपापल्यांत प्रदर्शित करण्यासाठीं, कांहीं विशेष संज्ञा मुद्दाम ठरविल्या असल्यामुळें, त्यांची एक सर्वसाधारण **आर्यभाषाच** प्रचारांत आली.

तदनन्तर, शब्दमाधुर्य, अर्थगांभीर्य, व पदलालित्य, इत्यादि संबंधानें त्यांच्यात उत्तरोत्तर ज्यास्त लालसा उत्पन्न होत जाऊन, तिच्यांत शब्दजालांची नवीन भर पडत गेली, व त्यायोगानें तिला आपोआपच सौन्दर्य प्राप्त होत चाललें. इतकेंच नव्हें तर, ती केवळ लावण्याची खाणच बनावी या हेतूनें, कित्येक कविपुंगवानीं तिच्यावर अत्युत्कृष्ट अलंकार चढविले, आणि आपल्या अव्याहत श्रमानें तिला अगदीं परिपक्क दशेप्रत पोहोंचविलें.

अशा प्रकारें, विद्वज्जनांच्या उत्कट प्रयत्नांनीं अनेक सुसंस्कार होऊन, जी **आर्य**भाषा केवळ पूर्ण व उन्नतावस्थेला पोहोंचली, ती आपोआपच **संस्कृत** बनली, आणि म्हणूनच तिला **संस्कृत** असें अन्वर्थ नांव पडलें. आतां, इराणी, ग्रीक, रोमन, जर्मन, इंग्रज, इत्यादि सर्व राष्ट्रें **भार**तीय **आर्यां**चेच वंशज आहेत. सबब, झन्द, **ग्रीक**, **ल्याटिन्**, **जर्मन्**, **इंग्रजी**, इत्यादि भाषा ह्याच **आर्य** म्हणजे **संस्कृत** भाषेच्या पाश्चात्य शाखा असून, **पह्लवी** ( पाली भाषा ), **सिंधी**, **पंजाबी**, **हिन्दी**, **बंगाली**, **उरीय**, **गुजराथी**, **मराठी**, वगैरे तिच्या पौरस्त्य शाखा होत. अर्थात्, **संस्कृत** ही सर्वांची **माय**भाषा बनली, हें वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

हें माझें म्हणणें कदाचित् कोणास अतिशयोक्तीचें दिसेल, त्याबद्दलचें प्रमाण. अथवा, तें वस्तुस्थितीपासून भिन्न आहे, असें ही कोणास खचितच वाटेल. सबब, माझ्या प्रति-

---

१ ह्या संबंधानें तपशिलवार विवेचन **भार**तीय साम्राज्याच्या नवव्या पुस्तकांत केलें आहे; सबब तिकडे वाचकानीं आपलें लक्ष पुरवावें. विशेषतः भाग ५२ वा पहावा. ( ग्रंथकर्ता. )

पादनाच्या पुष्टीकरणार्थ, एका पाश्चात्य विद्वानाचे एतद्विषयक विचार येथें नमुद करतों. या संबंधानें मिस्तर कर्झनूनें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

" *All the languages of the Aryan family*, and consequently *all their dialects, subdialects*, and *varieties, have been framed from a Sanskrit basis*, and are only modified and corrupted forms of what was once *the original tongue of all the Aryan races of India.* "
(Royal Asiatic Society's Journal. vol. XVI. P. 181).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

संस्कृतांत दृष्टीस पडत असलेलें इतर भाषांचें मूळ.

आतां, भरतखंडांतील प्राकृत भाषा, अथवा आशिया खंडांतील झन्दभाषा, किंवा यूरोपखंडांतील ग्रीक, ल्याटिन्, इंग्रजी, इत्यादि भाषा घेऊन, आपण त्यांतील शब्दांची मीमांसा केली, आणि शब्दव्युत्पत्तिशास्त्राच्या नियमांस अनुसरून, कित्येक शब्दांचें मूळ शोधून काढिलें, तर तें आपणांस खचित संस्कृत भाषेंतच दृष्टिगोचर होतें. फार तर काय सांगावें पण, पितृवाचक, मातृवाचक, आणि परस्परांच्या नात्याचा संबंध दर्शविणारे शब्द, यांचें मूळ तर प्रत्यक्ष संस्कृत भाषेंतच असल्याचें आढळून येत असून, तें अन्यत्र कोठें सुद्धां, व अन्य कोणत्याही भाषेंत दृग्गोचर होत नाहीं.

संस्कृताच्या पौरस्त्य व पाश्चात्य शाखांच्या स्थित्यन्तराचें विशदीकरण.

असो. संस्कृत भाषेपासून आर्यमूलाच्या इतर पौरस्त्य व पाश्चात्य शाखा कशा उद्भवल्या, आणि मूळच्या संस्कृत शद्बांत कसकसें व कोणत्या प्रकारें स्थित्यन्तर होत गेलें, हें वाचकांच्या ध्यानांत सहज रीतीनें आणि थोडक्यांत येण्यासाठीं, याखालीं कोष्टकवार खुलासा देतों.

# संस्कृत

| शाखा. | | | | | शाखा. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पाश्चात्य शाखा | | | | मूळ | पौरस्त्य शाखा | | |
| इंग्रजी. | ल्याटिन. | ग्रीक. | झन्द. | संस्कृत. | मराठी. | हिंदी. | गुजराथी. |
| फादर | पेटर | पटीर | पतर | पितर | पिता, बाप | बाप | बापा |
| मदर | मेटर | मीटीर | मातर | मातर | माय, आई | मा | मा |
| ब्रदर | फ्रेटर | फ्रेट्रिया | ब्रातर | भ्रातर | भाऊ | भाई | भाई |
| डाटर | ० | युगतीर | दुघ्धर | दुहितर | ० | लडकी | ० |
| ० | ० | दएर | ० | देवर | दीर | दियर | दीयर |
| सिस्टर | सोरोर | ० | कण्हर | स्वसर | ० | ० | ० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | न्युरस | न्युआँस | ० | स्नुषा | सून | ० | ० |
| ० | सोसर | हेक्युरास | कुशर | श्वशुर | सासरा | ससरा | ससरा |
| सन् | ० | हूइयास | हूनु | सूनु | ० | ० | ० |
| टच्युमल्ट | टच्युमल्टस् | ० | ० | तुमुल | तुंबल | तुंब्रल | धमाधमी |
| ० | मेलस | मीलाँस | ० | मल | मळ | मैल | मैल |
| पेल | पल्लिडस | पोलीयाँस | ० | पलित | पांढरा | ० | ० |
| ० | ० | केलाँस | ० | कल्य, कल्याण | कल्याण | कलाण | कलाण |
| स्वीट | स्वविस | हीडुस | ० | स्वादु | स्वादिष्ट | सवादिष्ट | सवादिष्ट |
| मिडल् | मीडिअस | मीसाँस | मैध्य | मध्य | मध्य, मधला | मधवच | मधवच |
| हाफ् | सेमी | हेमी | ० | सम | सम | सम | सम |
| न्यू | नोव्हस | निआँस | नव | नव | नवीन | नवा | नवूं |
| डेक्स्टरिटी | डेक्स्टर | डेक्सीआँस् | दषिण | दाक्षिण्य | दक्षता | दक्षता | दक्षता |
| सेम | सिमिलिस | होमाँस | हम | सम | सारखा | सारखा | सरखूं |
| बार्बरम् | बर्बरस् | बर्बराँस | ० | बर्बर | ० | ० | ० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| फुल्ल् | फ्लीनस | फ्लीऑस | ० | पूर्ण | पूर्ण | पूरन् | पूरण |
| ० | सिक्कस | ० | हुस्क | शुष्क | सुकें | सुका | सूकूं |
| माक्सिमम् | माक्सिमम् | मेनिस्टॉस | ० | महिष्ठ | मोठा | मोटा | मोटो |
| मेजर | मेजॉर | मीझॉन् | ० | महीयान् | महान् | ० | ० |
| ० | मॅग्नस | मेणस | ० | महान् | मोठा | मोटा | मोठा |
| यूथ | जुव्हेनिस् | ० | यवन् | युवन् | ज्वान | जुवान | जवान |
| ० | कयापट | केलफे | ० | कपाल | कपाळ | कपाल | कपाळ |
| फर्स्ट | प्रायमस् | प्रोटॉस | फ्रातेमो | प्रथम | पहिला | पेहेला | पेहेलो |
| टू | डच्युओ | डच्युओ | द्व | द्वि | दोन | दो | बे |
| थ्री | ट्रेस | ट्रेइस | थ्रायो | त्रयस् | तीन | तीन | त्रण |
| फाइव्ह | क्विंक्वी | पेंटी | पंचन् | पंच | पांच | पांच | पांच |
| सिक्स् | सेक्स | हेक्स् | क्ष्वस | षट् | सहा | छे | छ |
| सेव्हन् | सेप्टेम् | हेप्टा | हप्तन् | सप्त | साउ | सात | सात |
| एट् | ऑक्टो | ऑक्टो | अस्तन् | अष्ट | आठ | आठ | आट |

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नव | दस | वीस | सौ | फाड | ठोछे | जाण्यूं | साप | वा | मन | वांति | वाचा |
| नव | दस | वीस | सौ | फाड | ठरताँ | जाना | साप | वा | मन | वांति | वाचा |
| नऊ | दहा | वीस | शंभर | फाडणें | थांबतों | जाणतें | साप | वारा | मन | वांति | वाचा |
| नव | दशन् | विशांति | शतम् | दृ | तिष्ठामि | ज्ञात | सर्प | वात | मनस् | वम | वाच् |
| नव | दशन् | विशंति | शतम | दृ | हिस्तामि | ० | ० | वात | मनः | वम | वाक् |
| ऍनिया | डेक | ईकोशी | हेकटॉन् | डेरो | हिस्तेमि | नोटॉस | हिर्पेटॉन् | ० | मेनॉस | ईमिओ | ऑप्स |
| नोव्हेम् | डिसेम् | विजिंती | सेन्टम् | ० | स्टो | नोटस् | सर्पन्स | व्हेंटस | मेन्स | व्होमो | व्होकस |
| नाइन् | टेन् | ट्वेंटी | हन्ड्रेड | टिअर | स्टॅण्ड | नोन् | सर्पन्ट् | विंड | माइंट | व्हॅामिट | व्हॅाइस् |

याप्रमाणें, अन्तर्गत प्रमाणांवरून, व अनेकभाषातुलनाप्रकाशानें, संस्कृत, ह्मणजे अर्थातच प्राक्कालीन आर्यभाषा किंवा वैदिक संस्कृत, हीच मायभाषा अथवा सर्व भाषांची आदिजननी असल्याचें सिद्ध होतें. मात्र, इतकी गोष्ट आह्मांला सुद्धां कबूल आहे कीं, विद्वज्जनांच्या अत्युत्कट प्रयत्नानीं अनेक संस्कार होऊन, जी आर्यभाषा केवळ पूर्णत्वाला आणि उन्नतावस्थेला पोहोंचली, तिला सहजींच संस्कृत हें अन्वर्थ नामधेय प्राप्त झालें. तात्पर्य, आर्यभाषा, वैदिकभाषा, व संस्कृत, हे निव्वळ पर्याय शब्द होत. आणि हीच गोष्ट कित्येक नांवाजलेल्या पाश्चात्यांस व विद्वन्मुकुटमण्यांस देखील पूर्णपणें संमत आहे, असें त्यांच्याच ग्रंथावरून वाचकाच्या लक्षांत आपोआप आल्यावांचून खचितच राहणार नाहीं. कोलब्रूक[1] हा वैदिक भाषेला मातृपदाचा बहुमान देतो. कर्झन म्हणतो[2] कीं, झन्द, ग्रीक, ल्यॅटिन् गॉथिक, इत्यादि

---

१ कोलब्रूक म्हणतो, "The *ancient dialect* * * * especially that of the three first Vedas is extremely difficult and obscure : and...curious, as the *parent of a more polished and refined language* (*the classical Sanskrit.* ).

( H. T. Colebrooke's Misc. Essays. vol. I. 1872. P. 113 ).

२ कर्झननें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "I venture to affirm that they ( other languages such as Zandic, Greek, Latin, Gothic, &c ) have all sprung at different chronological periods from the Sanskrit, ( i. e. the *Vedic Sanskrit* )."

( J. R. A. S. vol. XV1. P. 177. )

भाषा वैदिक संस्कृतापासूनच भिन्न भिन्नकाळीं उद्भव-
लेल्या दिसतात. मूरनेंतर असें स्पष्टपणें लिहिलें आहे कीं,
पुराण संस्कृत किंवा आर्यभाषा म्हटली म्हणजे, वैदिक संस्कृ-
तच होय. शिवाय, संस्कृत हाच पुराणतम भाषा आहे;
आणि तसें मानल्याखेरीज गत्यंतरच नाहीं; कारण, तिच्यां-
तच प्राचीनतम धातूचीं रूपें सांपडतात; असें बीमनें प्रति-
पादन केलें आहे. आणि वैदिक भाषेपासूनच संस्कृताचा
उद्भव आहे, अशा मतलबाची वेबर टीका करतो.

सदरहूवरून, मूळ संस्कृत जननीपासूनच आर्यभाषेच्या
अन्य शाखा उत्पन्न होऊन त्या विस्तृत झाल्या; आणि त्या
जसजशा पूर्व व पश्चिम दिशेनें फैलावत गेल्या, तसतसे त्यां-

---

१ भारतीय साम्राज्य. पु. ९ वें. पान ७८ पहा.

डाक्तर मूर म्हणतो, " Sanskrit, by which must be understood the then current form or forms *of the Old Aryan Speech.* "

( Muirs. Sanskrit Texts. vol. II. P. 144-145 ).

भारतीय. साम्राज्य. पु. ९ वें पान ७९।८० पहा.

२ बीम लिहितो, "*We are driven, whether we like it or no, to look to Sanskrit for the oldest extant forms;* and we do undoubtedly *find them there,* as contrasted with " Prakrit and Pali. "

( J. R. A. S. 1870. vol. V. New-Series P. 149 ).

३ वेबर म्हणतो, " Both dialects ( Pali and Sanskrit ) were contemporaneously *evolved from one source, viz the Vedic language.* "

( भा. सा. पु. ९ वें. पान ८१. )

वरील अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता)

च्यांत अनेक भेद होत जाऊन, मूळ शब्दांतही महदन्तर पडत चाललें.

संस्कृत मायभाषेच्या संबंधानें कित्येक पाश्चात्यांची समजूत.

असो. अशा प्रकारची वस्तुस्थिति असून, ती तशी आहे असें मानण्यासही अनेक बलवत्तर कारणें दृग्गोचर होतात. तथापि, संस्कृत भाषेचा उचित असलेला हा मातृपदवीचा बहुमान तिला न देतां, कित्येक पाश्चात्य पंडित तिला स्थानभ्रष्ट करितात, व सहोदर पंक्तीलाच बसवितात. परंतु, हें त्यांचें करणें सयुक्तिक असल्याचें दिसत नाहीं. कारण, संस्कृत ही दुहिता किंवा शाखा ठरविली तर, ती ज्या भाषेपासून उत्पन्न झाली, अशी कोणती तरी तिच्याहून भिन्न अशी अन्य भाषा असली पाहिजे. परंतु तसें बिलकुल नसून, संस्कृत किंवा आर्यभाषा हीच जननी असल्यामुळें, तिच्याकडे मातृपदाचें श्रेष्ठत्व सहजीं येऊं पाहतें.

त्यांनीं घेतलेला आक्षेप व त्याचें निरसन.

आतां, कोणी कोणी असा आक्षेप घेतात कीं, हल्लींचा संस्कृत भाषा जी अगदीं पूर्णतेच्या उच्च कोटीप्रत पोहोंचलेली दिसते, ती प्रथमतःच तशी नसून, वेदकालीं किंवा त्याच्या पूर्वी जी संस्कृत भाषा प्रचारांत होती, तिजवर नाना प्रकारचे अलंकार चढल्यामुळें, तिला हल्लींची स्थिति प्राप्त झाली आहे. आणि ती ज्या मूळ स्थितींत होती, तिच्यापासूनच संस्कृताची सांप्रतची परिणति झाली असल्यानें, तत्कालीन आर्यभाषेचीच संस्कृत ही दुहिता किंवा शाखा होय. परंतु, हें त्यांचें म्हणणें युक्तिवादास अनुसरून आहेसें वाटत नाहीं. कारण, कोणत्याही भाषे-

च्या मूळ स्थितींत सामान्य बदल झाला, अथवा ती कालान्तरानें परिपक्व दशेप्रत पोहोंचली, एवढ्याच सबबीनें ती त्या प्रथमावस्थेंतील भाषेची दुहिता किंवा शाखा आहे, असें म्हणणें निराधार असून, तसें प्रतिपादन करण्यास देखील प्रत्यवाय येईल.

तद्विषयक मासल्याकरितां उदाहरण.

उदाहरणार्थ, **चॉसर** कवीच्या वेळच्या आणि सांप्रतकाळच्या इंग्रजी भाषेंत जमीन अस्मानाचें अन्तर दिसून येतें. इतकेंच नव्हे तर, **आंग्ल**भाषेची हल्लींची चारुता, तिचें सौंदर्य, तिच्यांतील विचारगांभीर्य, तिचें पदलालित्य, इत्यादि गुणांचा शतांश सुद्धां तिच्या त्या प्रथमास्थेंत किंवा बाल्यदशेंत, आविर्भूत झालेला नव्हता. तथापि, एवढ्याच कारणांनीं, तत्कालीन **आंग्ल**भाषेची हल्लींची इंग्रजी भाषा शाखा अथवा दुहिता आहे, असें म्हणणें जितक्या अंशानें असंबद्ध व वेडगळपणाचें होईल, तितक्याच अंशानें **संस्कृत** भाषेला **वेद**कालीन किंवा **आर्य**भाषेची शाखा अगर दुहिता ठरविणें होईल, अशी माझी अल्प समजूत आहे.

आर्यभाषा म्हणजे संस्कृतच होय.

वास्तविक रीतीनें विचार केला तर, आपणांस असें दिसून येईल कीं, **आर्य**भाषा म्हणजे केवळ **संस्कृत**च होय. किंबहुना, **आर्य**भाषा आणि **संस्कृत** हे निव्वळ पर्याय शब्दच आहेत, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. मात्र, भेद म्हणून इतकाच कीं, बाल्यावस्थेंत असलेली ती **आर्य**भाषा समजावयाची. पण, तीच पुढें सुसंस्कृत होऊन जेव्हां परिपूर्ण दशेप्रत पोहोंचली, व अनेक संस्कार घडून तिच्यावर शब्द-

रत्नांचे जेव्हां नानाविध अलंकार चढले, तेव्हां तिला अर्थात्च संस्कृत असें अन्वर्थ नामधेय पडलें.

ती मायभाषा मानण्यास कारणें.

संस्कृत भाषेपासून प्राकृत भाषा उद्भवल्या असल्याचें तर सर्वांसच कबूल असून, ही गोष्ट ज्याप्रमाणें सप्रमाण सिद्ध आहे, त्याचप्रमाणें संस्कृत भाषेपासूनच झन्द, ग्रीक, ल्याटिन, इत्यादि भाषा देखील प्रसूत झाल्या असल्याबद्दल निःसंशय होत आहे. कारण, प्राकृत भाषांतील शब्दांचें मूळ जसें संस्कृत भाषेंतच उपलब्ध होतें, तसें झन्द, ग्रीक, ल्याटिन, वगैरे भाषांचें मूळही ह्या गीर्वाण भाषेंतच सांपडतें. परंतु, संस्कृत भाषेच्या संबंधानें तशी गोष्ट बिलकुल दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हें तर, ह्या भाषेंतील शब्दांचें मूळरूप किंवा उगमस्थान, संस्कृताशिवाय अन्यत्र कोठें सुद्धां उपलब्ध होत नाहीं; अथवा, त्यांचीं मुळें देखील दुसरीकडे कोठेंही असल्याचें भासत नाहीं. सबब, संस्कृत हीच सद्रहू शाखांची मायभाषा होय, असें वाटतें.

संस्कृत व तिच्यापासून उद्भवलेल्या शाखा, यांत महदन्तर.

आतां, कोणी कदाचित् अशी शंका घेईल कीं, जर संस्कृत पासून ग्रीक, ल्याटिन्, इंग्रजी, इत्यादि भाषा उद्भवल्याचें मानलें, तर संस्कृतांतील, आणि ग्रीक, ल्याटिन्, इंग्रजी, वगैरे भाषांतील शब्दांत पुष्कळ फरक दिसून येत असल्यामुळें, ह्या भाषांची संस्कृत ही मायभाषा असेलसें वाटत नाहीं. परंतु, सदरीं निर्दिष्ट केलेल्या निरनिराळ्या भाषांत शब्दभिन्नता दृग्गोचर होते, एवढ्याच कारणानें, त्या भाषा

संस्कृतच्या शाखा नाहींत, असें म्हणतां येणार नाहीं. कारण, ज्याप्रमाणें संस्कृत, ग्रीक, ल्याटिन्, इंग्रजी, इत्यादि भाषांत महदन्तर आहे, त्याचप्रमाणें संस्कृत, व मराठी, बंगाली, हिन्दी, गुजराथी, वगैरे प्राकृत भाषांत देखील फारच भेद आहे. आणि असें असूनही, संस्कृत ही प्राकृत भाषांची मायभाषा असल्याबद्दल आखिल विद्वज्जनसमूहाचें मतैक्यच आहे. शिवाय, वेदकालीन संस्कृतांत व तदनंतरच्या लौकिक[1] संस्कृतांत देखील पुष्कळ फरक दिसून येतो. परंतु, तेवढ्याच कारणानें, प्राकृत, पाली, झन्द, ग्रीक, ल्याटिन्, इंग्रजी, इत्यादींची संस्कृत ही मायभाषा नव्हे, असें म्हणणें, किंवा वेदकालीन संस्कृत व तदनन्तरचें लौकिक संस्कृत ह्या भिन्नभिन्न भाषा होत, असें प्रतिपादन करणें, केवळ भ्रांतिमूलकच होईल, अशी माझी अल्प समजूत आहे.

मायभाषा ठरवितांना मुख्यत्वेंकरून विचार करण्याची गोष्ट.

ह्याखेरीज, मायभाषा कोणती आणि तिच्या शाखा कोणत्या, हें ठरविण्याच्या संबंधानें मुख्यत्वेंकरून विशेष मुद्याची गोष्ट पाहणें आहे ती ही कीं, समाजावस्थेंतील बाल्यदशेंत जे व्यावहारिक शब्द सर्वत्र प्रचारांत असण्याचा जास्त संभव आहे, ते शब्द ज्या भाषांत पर्यायानें अथवा अपभ्रष्टस्थितींत दृष्टीस पडतात, त्या भाषांस शाखा किंवा दुहिता समजून, अशा प्रकारच्या शब्दांचें मूळ, अगर खरें रूप, अथवा शुद्ध स्वरूप, ज्या भाषेंत दृग्गोचर होतें; इतकेंच नव्हे तर, तिच्या पलीकडे सदरहू शब्दांची मीमांसा

[1] लौकिक संस्कृत म्हणजे उत्कृष्टावस्थेप्रत पावलेली संस्कृत भाषा होय. हिलाच इंग्रजींत Classical Sanskrit म्हणतात.

करण्याला यत्किंचित देखील अवकाशच मिळत नाहीं, तिची गणना **माय**भाषेंत करणें अवश्य व यथान्याय आहे. आणि ह्याच मुद्यास अनुसरून सारासार विचार केला तर, आमच्या **प्राकृत**भाषा, व **पौर**स्त्य आणि **पाश्चात्य** इतर भाषा, ह्या केवळ शाखा किंवा दुहिता असून, **संस्कृत** हीच त्यांची **आ**दिजननी, अथवा **माय**भाषा किंवा त्यांचें **मूळ** असल्याचें निःसंशय ठरतें.

हीब्रू, फारसी, व आरबी, ह्या संस्कृताच्या शाखा.

फार तर काय सांगावें पण, **हीब्र्यू, फा**रसी, आणि **आ**रबी भाषा देखील **संस्कृत** भाषेपासूनच उद्भवल्या असाव्यात, असें मानण्यास बलवत्तर प्रमाण मिळतें. कारण, त्यांच्या कित्येक मूळ धातूंत व शब्दांत विशेष साम्य आढळून येतें.

**हीब्र्यू** भाषेच्या संबंधानें लिहितांना **मॅक्समुलर** असें म्हणतात कीं,

"This does not, however, exclude the possibility that both (Sanskrit and Semitic) are diverging streams of the same source, and the *Comparisons* that have been instituted between the Semitic roots, reduced to their simplest form and the roots of the Aryan languages *have made it more than probable*, that *the material elements with which they both started were originally the same.*"

(Lectures on the Science of Language.
vol. I. P. 326).

त्याचप्रमाणें, **संस्कृत, फा**रसी, व **आ**रबी भाषांच्या संबं-

धानें लिहितांना, हॉलेहेड्नें आपल्या बंगाली व्याकरणाच्या उपोद्घातांत खालीं लिहिल्याप्रमाणें विवेचन केलें आहे.

"I have been astonished to find *this similitude* of Sanskrit words *with those* of Persian and Arabic and *even of* Latin and Greek; and *these not in* technical and mataphorical terms, which the mutation of refined arts and improved manners might have occasionally introduced; but in the main groundwork of language, in monosyllables, in the names of numbers, and the appellations of such things as could be first discriminated on the immediate dawn of civilization."

संस्कृत भाषेविषयीं कित्येक विद्वानांची भलतीच कल्पना.

अशा प्रकारें, भाषाशास्त्रविषयक शोध दिवसानुदिवस ज्यास्त होत गेल्यानें, संस्कृत भाषेचा मातृपदाचा बहुमान बहुतेक स्थापित झाल्या सारखाच आहे. तथापि, सुमारें शंभर वर्षांपूर्वी, ह्या आदिभाषेच्या संबंधानें कित्येक विद्वानांच्या फारच चमत्कारिक, आणि कांहीं अंशानें अगदीं वेडगळ समजुती असत, व हल्लीं देखील आहेत. सबब, त्यांचेंही येथें थोडेंसें दिग्दर्शन केलें पाहिजे.

पाश्चात्य व ख्रिस्ती मत.

आंड्री[२] केंप हा आपल्या ("नन्दन[३] वनांतील भाषा"नामक) ग्रंथांत असें प्रतिपादन करतो कीं, परमेश्वर हा आदिमनु (आदाम) जवळ स्वीडिश भाषेंत बोलला अ-

---

[१] ह्यानें इ. स. १७७६ सालीं, हिंदूधर्मशास्त्र प्रसिद्ध केलें असून, तें लॉर्ड हेस्तिंगजनें आपल्या कारकीर्दीत, अकरा विद्वान पंडित एकत्र बसवून, त्यांजकडून तयार करविलें होतें.

[२] Andre Kempe. [३] Languages of Paradise.

सून, आदामनें त्याला डानिश भाषेंत प्रत्युत्तर दिलें. परंतु, सर्पानें फ्रेंच भाषेंतच ईव्हबरोबर भाषण केलें. शार्डिन् म्हणतो कीं, नन्दनवनांत फक्त तीनच भाषा प्रचारांत असल्याविषयीं इराणी ( फारसी ) लोकांची समजूत असे. ह्यापैकीं, तुर्कीभाषा गॅब्राएल बोले. आदाम आणि ईव्ह हे फारशींत बोलत. व सर्प आरबींतच आपले विचार प्रदर्शित करी. ईरोचें[१] असें मत आहे कीं, आदम हा बास्क भाषेंतच बोलत असे.

खरोखर, ईनमीन तीनजणांत ही भाषेची खिचडी, आम्हां भारतीय आर्यांस अतर्क्य व कल्पनातीत भासते; आणि निदान ख्रिस्तेतर जनांस तरी, ही अपूर्व कोटी समजण्यासारखी नाहीं, असें सहजीं वाटूं लागतें.

परंतु, येशूख्रिस्ताच्या पवित्रशास्त्रांत ( बायबलांत ) च जर आपण प्रत्यक्ष पाहिलें तर, याहीपेक्षां अगदीं भिन्न प्रकार दिसून येतो. कारण, पृथिवीवरील सर्व मानवी प्राप्राण्यांची ऐकचभाषा होती, असें त्यांत सांगितलें आहे. तेव्हां, ह्याचा आणि त्याचा कांहींच मेळ नाहीं, असें म्हणणें प्राप्त येतें.

तात्पर्य, शास्त्रीय दृष्टीनें, किंवा यथायोग्य विचार

शास्त्रीय दृष्टीनें बायबलाचा विचार.

करून आपण पाहिलें, तर आपल्याला असें खचितच दिसून येतें कीं, ख्रिस्तांचें पवित्रशास्त्र जें बायबल, हें

---

[१] J. B. Erro. ( *El Mundo primitivo.* Madrid. 1814 ).

[२] " And the whole earth was of one language and of one speech. " ( Genesis. XI. 1 )

केवळ बालिश खेळच होय. आणि ही गोष्ट ख्रिस्ती देशांतल्या विद्वान लोकांसही कबूल करणें भाग पडतें. सबब, त्यांतील अवश्य तितकाच वेंचा येथें थोडक्यांत देतों.

लेंगनें एके ठिकाणीं ( "मानवी प्राण्याची उत्पत्ति" नांवाच्या पुस्तकांत ) असें ह्मटलें आहे कीं,

" The latest conclusions of modern science show that uninterrupted historical records, confirmed by contemporary monuments, carry history back *at least 1000 years before the supposed Creation of Man* ( in the Bible ), and 2500 years beforə the date ot *Deluge*, and show then *no trace of a commencement*; but populous cities, celebrated temples, great engineering works, and a *high state* of the arts and of civilization, *already existing*." ( P. 2, )

" *Prior to him* ( Abraham ) *every thing is plainly myth and legend.* We have two accounts of the creation of the universe and of man in Genesis, *contradictory with one another, and each hopelessly inconsistent with the best established conclusions of astronomy, geology, ethnology*, and *other sciences.*, ( P. 236. )

" *Then comes the Deluge with all the flagrant impossibilities*, which have been pointed in a preceding chapter. " ( P. 237 ).

( Human Origins. By S. Laing. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

सामुद्रिक भाषा सर्व भाषांचें मूळ असल्याविषयीं कांहींचें मत.

असो. कित्येकांचें मत असें आहे कीं, सर्व आर्य भाषांचें मूळ केवळ सामुद्रिक भाषेंतच आहे. तसेंच, ल्याटिन, ग्रीक, संस्कृत, व यूरोपांतल्या यच्चावत् अर्वा-

चीन भाषा, ह्या देखील **सामुद्रिक** भाषेपासूनच उद्भवल्या आहेत; इतकेंच नव्हें तर, **सामुद्रिक** भाषेच्या परिशीलनानेंच भाषेचें एकंदर कार्य लक्षांत येतें, व तिची सामान्य रचना, तिची प्रवृत्ति, तिचा नियोग, आणि तिची गति, इत्यादि संबंधीं ज्ञानही तदवलोकनानेंच होतें, अशी त्यांची कल्पना आहे. तात्पर्य, **सामुद्रिक** हीच मानवी प्राण्याची **जन्मभाषा** होय, असें डाक्तर रे[१] प्रभृति मानतात, यांत शंका नाहीं. तथापि, अशा प्रकारचें प्रतिपादन किती भ्रांतिमूलक व अज्ञानाचें आहे, हें कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे. मग, **मॉक्समुल्लर** सारख्या विद्वान, बहु-

---

१ ह्यानें प्रसिद्ध केलेल्या लेखांत जें मत प्रदर्शित केलें आहे, त्यांतील उतारा **मॅाक्समुलर**च्या ग्रंथांवरून, येथें थोडक्यांत देतों. तो म्हणतो,

"That all those tongues which we designate as the Indo-European languages have their *true root* and *origin* in the Polynesian language.' 'I am *certain*, that this is the case as regards the Greek and Sanskrit : I find reason to believe it to be so, as to the Latin and other more modern tongues—in short, as to all European languages, old and young.' 'The second discovery which I believe I have made, and with which the former is connected, is that *the study of the Polynesian language gives us the key* to the original function of language itself, and to its whole mechanism."

( *The Polynesian* papers. By Dr. J. Rae. 1862 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

श्रुत, आणि अनेक भाषाकोविदानें, त्याचा सर्वस्वी निषेध व धिक्कार करावा, यांत तर कांहींच नवल[1] नाहीं.

डाक्तर ब्लीकचा[2] अभिप्राय याहून अगदींच निराळा असल्याचें दिसतें. तो ह्मणतो कीं, भाषाशास्त्राच्या संबंधानें विशेष शोध करण्याच्या कामीं, आफ्रिका खंडांतल्या भाषाच फार उपयोगी आहेत. कारण, मूळधातू, वचन, विभक्ति, आणि शब्दव्युत्पत्ति, इत्यादि विषयक महत्वाच्या प्रश्नांचा उलगडा, तत्परिशीलनानेंच होण्यासारखा आहे. ह्या आफ्रिकेंतील भाषांचें ब्लीक[3] प्रभृति दोन वर्ग करितात. १ उत्तर आफ्रिकेंतील अथवा हबशी[3] भाषा, व २ दक्षिण आफ्रिकेंतील अगर काफीर[4] भाषा. ह्यांपैकीं,

हबशी व काफीर-भाषा, अन्य भाषांचें मूळ असल्याबद्दल ब्लीकचें मत.

---

१ ह्यासंबंधानें मॉक्समुलर हा केवळ निर्भिडपणें असें लिहितो कीं, "Mere ridicule would be a very inappropriate and very inefficient answer to such a theory"

( Lectures. Sc. L. II. P. 10 ).

२ Dr. W. H. J. Bleek. Ph. D. *Comparative Grammar* of the South African languages. 1862.

३ हबशी लोक मिसर देशांतले असल्याविषयीं कांहींची समजूत आहे.

( Journal. American Oriental Society. vol. IV. P. 449. 1854 ).

४ काफीर भाषेवर ऑपल् यार्डनें एक पुस्तक लिहिलें आहे, तें पहा.

काफीर ही मानवी प्राण्याची आदिभाषा असल्याविषयीं, ह्या मंडळीच्या प्रतिपादनाचा झोंक दिसतो.

संस्कृत भाषेच्या महत्वाविषयीं कीची अपूज्य बुद्धि.

प्रोफेसर कीनें एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, 'संस्कृत हें भाषाशास्त्राचें केवळ मूलतत्वच होय, ह्मणून जो पाश्चात्यांनीं त्याचा मोठा देव्हारा माजविला आहे, तो निव्वळ अतिशयोक्तीचाच होय.' अर्थात्, संस्कृत भाषेला इतकें महत्व देण्याचें कारण नाहीं, असा प्रोफेसर मजकूरच्या ह्मणण्याचा आशय समजावयाचा, यांत शंका नाहीं.

---

१ काफीर भाषा दक्षिण आफ्रिकेंत प्रचारांत असून, त्यासंबंधानें डाक्तर ब्लीक असें म्हणतो कीं,

"It is perhaps not too much to say, that similar result may at present be expected from a deeper study of such *primitive forms of language as the Kafir* and *the Hattentot exhibit*, as followed at the beginning of the century, the discovery of Sanskrit, and the comparative researches of Oriental Scholars. *The Origin* of the grammatical form s, o gender and number, the etymology of pronouns, and many other questions of the highest interest to the philologist *find their true solution in Southern Africa.*"

सद्रहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

२ 'The Sanskrit language, as the Basis of Linguistic Science, and the Labours of the German School in that field, are they not overvalued'?

( Transactions of the Philological Society ).

Macaulay - no authority



संस्कृताविषयीं मेकॉलेचा अनादर.

मेकॉलेसारख्यांची धांव तर याही पुढें असून, ते आरबीला, आणि तिच्या बरोबर संस्कृत भाषेला देखील, केवळ निर्माल्यवत्च[1] समजतात. आणि त्यांतही विशेष आश्चर्य हें कीं, त्याजला ह्या दोन्ही भाषांचें बिलकुल ज्ञान नसून, व हें अज्ञान ते स्वतःच कबूल[2] करीत असतांही, ते अशा प्रकारचें धारिष्ट करितात. किंबहुना, ह्या संबंधानें ते खचितच अतीव धृष्टपणा दाखवितात, असें सुद्धां ह्मणण्यास हरकत नाहीं.

गिचार्ड व थोमॉसिन् यांचा भाषाविषयक अभिप्राय.

गिचार्ड व थोमॉसिन् यांचें असें मत असे कीं, सर्व भाषांची हीब्र्यू हीच आदिजननी होय. आणि त्यामुळें, प्रत्येक भाषेचें मूळ शोधण्यासाठीं, ते हीब्र्यूकडेच धांव घेत. पण, त्यांचा सिद्धांतच चुकीचा असल्याकारणानें, त्यांत त्यांना बिलकुल यश न येतां, त्यांचें व त्यांच्या सारख्या दुसऱ्या कित्येक दुराग्रही विद्वानांचे श्रम केवळ

---

१ "I have *never found one* among the Orientalists themselves, *who could deny that a single shelf* of a good European library *was worth the whole Native literature of India* and *Arabia*."

"*I doubt whether the Sanskrit literature be as voluable as that of our Saxon and Norman progenitors.*"

२ "*I have no knowledge of either Sanskrit or Arabic.* But I have done what I could to form a correct estimate of their value."

( Minute on Education. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

निष्फळ झाले, आणि त्यांस निराशेनें अगदीं स्वस्थ बसावें लागलें, यांत कांहींच नवल नाहीं.

लॉर्ड मॉनबोडोचें मत.

लॉर्ड मॉनबोडोची[1] अशी कल्पना असे कीं, मानवी प्राणी हा वानराच्या एका जोडप्यापासन झाला असून, मानवी भाषा व तिच्या शाखा आणि पोटभेद हे सर्व, मिसर देशांतील देवांनीं निर्माण केलेल्या एका भाषेपासूनच उद्भवलेले[2] आहेत. इतकेंच नव्हें तर, संस्कृतभाषा मुळची मिसर देशांतली असून, तेथूनच तिचा प्रवेश ऑसिरिसनें[3] भरतखंडांत केला; व त्या भाषेचीच ग्रीक ही शाखा होय; असेंही त्यानें आपलें मतान्तर कालान्तरानें प्रसिद्ध केलें.

तथापि, लॉर्ड मॉनबोडो हा विशेष दुराग्रही नसून, प्रत्यक्ष पुराव्याचेंच माप त्याच्या पदरांत पडल्यावर, तो लपंडाव करीत नसे. त्यामुळें, त्याला संस्कृत भाषेचें रहस्य आणि त्यांत स्वयमेव असलेली रसवत्ता, हीं तात्रडतोब कळून आलीं. कारण, संस्कृत भाषेच्या संबंधानें त्यानें एके ठिकाणीं[4] असें म्हटलें आहे कीं,

" There is a language still existing, and preserved among the Brahmans of India, which is a *richer and in every respet a finer lan-*

१ ह्याचा " भाषेची उत्पत्ति व प्रगति " नांवाचा ग्रंथ पहा.
Of the origin and Progress of Language. By Lord Monboddo. 2nd Edition. 6 vols. Edinburgh. 1774..

२ *Antient Metaphysics.* vol. IV. P. 357.

३ *Antient Metaphysics.* vol. IV. P. 322.

४ *Of the Origin and Progress of Language.* vol VI. P. 97. ( 1792 ).

*guage than even* the Greek of Homer. All the other languages of India have a great resemblance to this language, which is called the Shanskrit. But those languages are dialects of it, and formed from it, not the Shanskrit from them. Of this and other particulars concerning this language, I have got such certain infomation from India, that if I live to finish my history of man, which I have begun in my third volume of Antient Mataphysics, I shall be able clearly to prove that the Greek is *derived from* the Sanskrit, which was the antient language of Egypt."

संस्कृत भाषेच्या मातृपदाची पुनश्च प्रतिष्ठापना.

याप्रमाणें, आपल्या स्वयमेव तेजानें, आणि नैसर्गिक गुणांनीं, संस्कृत भाषेचें मातृपद आपोआपच प्रतिष्ठापित होऊन, ती पुनश्च स्वस्थानापन्न झाली, हें अगदीं साहाजिकच आहे. मात्र, लॉर्ड मॉनबोडोचे सदरीं नमुद केलेले कित्येक विचार निव्वळ भ्रांतिमूलक असल्यामुळें, अगदीं चुकीचे आहेत. सबब, त्याबद्दल येथें वेळींच दोन शब्द लिहिल्यावांचून सुटका नाहीं.

मॉनबोडोचें भ्रांतिमूलक मत, व त्याची दुरुस्ती.

संस्कृत भाषेचा उद्भव मिसर (इजिप्त) देशांत होऊन, नन्तर येथून ती भरतखंडांत गेली, असें ह्मणणें ह्मणजे, चन्द्रबिंबाचीं किरणें सूर्याला पोहोंचल्यामुळेंच हा तेजोराशि प्रकाशमान होतो; किंवा, पृथिवीपासूनच मेघराजावर जलवृष्टि होते; असेंच प्रतिपादन करणें होय. कारण, मिसर देशांतून आमचे आर्यपूर्वज भरतखंडांत गेले असल्याबद्दल, लेशमात्रही आधार नाहीं. एवढेंच नव्हें तर, उलट,

आमची जन्मभूमि जें आर्यावर्त, तेथेंच आमचा उदय होऊन, आमचे बाहू स्फुरण पावल्यावर, आम्ही आपल्या वसाहती चोहोंकडे वसविल्या; आणि कालान्तरानें मिसरदेशांत जाऊन, तोही देश सर केला, व तो आर्यसाम्राज्यास जोडला. पुढें, हा आमच्या साम्राज्याचा एक प्रांतच बनल्यामुळें, आह्मीं तेथें आपली वर्णसंस्था सुरू केली; आणि आमच्या व्यावहारिक संस्कृतभाषेंतच तेथील जित प्रजेस योग्य शिक्षण देऊन, सर्वांसच ज्ञानामृत पाजिलें. त्यामुळें, अर्थातूच, संस्कृत भाषेचा मिसर देशांत सार्वत्रिक प्रसार झाला; व आमची वस्ती जसजशी वाढूं लागली, आणि आमच्या साहसास ज्या मानानें प्रोत्साहन मिळालें, त्या मानानें आह्मी देशान्तरीं जाऊन वस्ती केली, व ग्रीस इतली, इत्यादि देशांत जाऊन राहिलों. त्या योगानें, उघडच, आमचें आर्यकुटुंब फैलावलें जाऊन, संस्कृत (ह्मणजे वैदिक आर्य) भाषेच्याही अनेक शाखा उत्पन्न झाल्या.

असो. सदरहू विवेचनावरून, आमच्या आर्य संस्कृत भाषेचें पौराणत्व सिद्ध होऊन, तिचा मातृपदाचा बहुमान देखील सर्वानुमतें स्थापित झाल्याचें वाचकाच्या लक्षांत सहजीं येईल.

---

१ इजिप्त (मिसर) देशांत आह्मा आर्यांची वसाहत असल्याबद्दल अनेक प्रमाणांवरून दिसून येतें. आमच्या आर्यवीरांपैकीं मनु व राम नांवाच्या साहसी पुरुषांनीं तो देश जिंकिला; तेथें त्यांनीं राज्य केलें; आणि आर्यधर्मही स्थापिला. ह्याच नामद्वयांचा अपभ्रंश होऊन, मीनीस् व रामॅसीस् हीं राजांचीं नांवें त्या देशांत सुप्रसिद्ध झालीं आहेत. (पुढील पान १५६–५७ वर लक्ष्य द्यावें.)

(Journal. R. A. S. vol. XVI 1854. पहा.)

परंतु, संस्कृत भाषेचें हें अतिप्राचीनत्व, तिला प्राप्त झालेला मातृपदाचा बहुमान, पृथ्वीवरील यच्चावत् भाषांवर तिचें सर्वप्रकारें कबूल झालेलें श्रेष्ठत्व, आमचे ऋग्वेदरूपी पुराणतम लेख, आह्मां आर्यांचें दिव्य ज्ञानभांडार, व त्यामुळें त्यांची दिगन्त पसरलेली कीर्ति, इत्यादि गोष्टी कित्येक पाश्चात्यांस केवळ असह्य होऊन, त्यांच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाल्याचें दिसतें. पण इलाज काय? सत्य तें सत्य. आणि त्याचा शेवटीं निःसंशयच जय. त्यामुळें, संस्कृत पीठासमोर मान वांकवून, फार नम्रतेनें आपले गुडघे टेकणें, केवळ निरुपायास्तवच त्यांस भाग पडलें. तथापि, ह्या झालेल्या दाहशमनार्थ, त्यांनीं एक रामबाण औषध शोधून काढिलें. इतकेंच नव्हें तर, त्यांनीं तें जिव्हास्त्ररसांत खलून, गालिप्रदानाच्या अति तीव्र मात्रेबरोबर यथेष्ट सेवन केलें. मग काय विचारता!! ड्युगल्डस्टयुअर्ट सारख्या अध्वर्यूंनीं, निन्दा आणि वाक्पारुष्याचें सत्र सुरूं केलें, व त्यांत ब्राह्मणांची आणि त्यांच्या अप्रतीम व अति पवित्र वेदग्रंथांची निर्भर्त्सना मांडिली. ती फारच अश्लील आणि ग्राम्य असल्या कारणानें, महाराष्ट्रवाणीला तिचा विटाळ न करता, परभारें दुसऱ्याच्या मुखानें, व परकीयांच्या भाषेंतच तिचें दिग्दर्शन करतों. प्रोफेसर मॉक्समुलर म्हणतातः—

> संस्कृत भाषेच्या संबंधानें कित्येक पाश्चात्यांत झालेला मत्सर, व असूया.

> त्यांत ड्यूगल्डस्टयुअर्टचें अग्रणीत्व.

“ Another Scotch philosopher, Dugald, Stewart, *was much less inclined to yield such ready snbmis-*

*sion.* No doubt, it must have required a *considerable effort for a man brought up in the belief* that Greek and Latin were either aboriginal languages, or modifications of Hebrew, to bring himself to *acquiesce in the revolutionary doctrine* that the classical languages were intimately *related to a jargon of mere savages;* for such all the subjects of rhe Great Mogal were then supposed to be. However, if the facts about Sansksit were true, Dugald Stewart *was too wise not to see that the conclusions drawn from them were inevitable. He therefore denied the reality of such a language as* Sanskrit *altogether,* and wrote his famous essay *to prove that* Sanskrit *had been put together after the model of* Greek and Latin, *by those arch-forgers and liars* the Brahmans, *and that the whole of Sanskrit* literature *was an imposition.* I mention this fact because it shows, better than any thing else, *how violent a shock was given by the discovery of Sanskrit, to prajudices most deeply engrained in the mind of every educated man. The most absurd arguments found favour for a time, if they could only furnish a loophole by which to escape from the unpleasant conclusion that Greek and Latin were of the same kith and kin as the language of the black inhabitants of India."*

( Lectures on the Science of Language. vol. I.
P. P. 188-189 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

कित्येक पाश्चात्त्यांच्या खऱ्या स्वरूपाचा मासला.

ह्यावरून, कित्येक पाश्चात्यांचें अन्तःस्वरूप कसें असतें, हें कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे. खरोखर, अशा प्रकारचा सौजन्याभाव, ह्या तऱ्हेची चित्ताची

असमता, हें परोत्कर्ष असहिष्णुत्व, आणि ही अन्वेषणपराङ्मुखता, वगैरे पाहून, आपणांस दुःख व सखेदाश्चर्य वाटल्यावांचून राहवत नाहीं.

अस्तु. कित्येकांचें असें मत आहे कीं, मनुष्यजाति एका जोडप्यापासून मिसापोटेमिया प्रांतांत उत्पन्न झाली; आणि कांहींच्या अभिप्रायाप्रमाणें ती आर्मीनियांत तीन जोडप्यापासून उद्भवली. मॅक्समुलर प्रभृतींचें असें म्हणणें आहे कीं, मानवीप्राण्याचें, निदान आर्य जातीचें जन्म तरी, मध्यआशियांतील पामीर नामक उच्च पठारावर झालें असून, तेथूनच त्यांच्या शाखा पूर्वपश्चिमदिशेनें आशियाखंडांत व यूरोपांत पसरल्या. अर्थात्, त्यांची भाषा आर्य होती, व त्यापासूनच संस्कृत, झन्द, पाली, ग्रीक, ल्याटिन्, इत्यादि भाषा उद्भवल्या.

मानवी प्राण्याच्या उत्पत्तीसंबंधीं पाश्चात्यांत मतभेद.

लेंगचें मत याहून अगदीं भिन्न असून, त्याला यापैकीं कोणतीही उपपत्ति संमत नाहीं. कारण, त्याचा असा अभिप्राय आहे कीं, मानवी प्राण्याची अमुक एक जन्मभूमि असल्याविषयीं लेशमात्रही पुरावा उपलब्ध नाहीं.

तद्विषयक लेंगचें मत.

---

१ "This theory, however, has pretty well broken down, since it has been shown that othor branches of the Aryan languages, specially the Lithuanian, contain more archaic elements than either Sanskrit or Zend; that language is often no conclusive test of race." ( P, 41I ).

"And although it is not denied that Max Mul-

( पुढें चालू )

डार्विनचें असें मत आहे कीं, मनुष्याचें आदिनिवासस्थान आफ्रिका खंडाच्या पूर्वेस असावें. परंतु, ब्रिटन्नें ते यूर–आफ्रिकेंत असल्याविषयींच आपला अभिप्राय दिला आहे. कित्येक[2] तें दक्षिणोत्तर द्वीपांत, किंवा अमेरिका खंडांत असल्याबद्दल सांगतात; आणि कांहीं कांहीं तर असें प्रतिपादन करितात कीं, मानवी प्राण्याची उत्पत्ति पृथक् पृथक् रीतीनें व भिन्न भिन्न प्रदेशांतच झाली असावी.

डार्विनचें मत.

हीं सर्व मतें, मीं वाचकांच्या माहितीसाठीं, येथें सादर केलीं आहेत. तथापि, त्यांत लेशमात्रही प्रमाण नाहीं; आणि म्हणूनच त्यांचा विचार करण्याची अवश्यकता नाहीं, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे. कारण, एतद्विषयक सूक्ष्म शोध ह्या भूतलावरील प्रत्येक देशांत किंवा निरनिराळ्या खंडांत झालेले नसून, ते फक्त ह्या भूतलावरील कांहीं नियमित भागांतच झालेले असल्यामुळें, केवळ एकदेशीयच आहेत. सबब, त्यांवरून सर्वसामान्य सिद्धान्त करण्यास खचितच अडचण आहे.

सदरहू मतांचें प्रामाण्यराहित्य.

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालू)

ler's "Somewhere in Asia" may turn out to be a correct guess, it is denied that there is at present a particle of evidence to support it."

(P. 412. Human Origins. By S. Laing).

१ Races and Peoples नांवाचें पुस्तक पहावें.

२ लैंग. (मानवी प्राण्याची उत्पत्ति. पान ४१६–४१७–४१८ पहा.)

तद्विषयक प्रमाण.

तथापि, आम्ही पूर्वी विवेचन केल्याप्रमाणें, सर्व शास्त्रीय शोधांचा विचार करतां असें वाटतें कीं, हा भूगोल कालान्तरानें निर्वृत गेल्यावर, त्याजवरील हिमाचलासारखे उच्च प्रदेश खुले पडून, त्याच्या आसमंतांतील व दक्षिणेकडील निम्नप्रांत देखील शनैः शनैः पाण्यावर आले. पुढें, ह्या निम्नभागांत म्हणजे आर्यावर्त्तांत, जीवनानुकूल परिवेष्टन तयार झाल्यावर, तेथें मानवी प्राणी जन्मला, आणि तोच आर्य नामधेयानें कालान्तरानें प्रसिद्धीस आला. येथूनच त्यानें दिगन्तरीं पर्यटन केलें, व उत्तरध्रुवाजवळीलही प्रदेशांत जाऊन, तेथें मुद्धां त्यानें अनेक प्रान्त वसविले.

शास्त्रीय,

आतां, हिमाचल व त्याचा निम्नभाग, हा पाण्याच्या सपाटीवर येऊन ज्या वेळीं कोरडा पडत चालला, त्या वेळीं उत्तरध्रुवाकडे वस्ती असण्याचा बिलकूल संभवच नव्हता. कारण, तो फारच निम्नप्रदेश असल्यामुळें पाण्यांतच असे, आणि त्याच कारणानें तो भूचर प्राण्यांच्या वस्तीस व जीवनाला अगदीं अनुकूल नव्हता, हें उघड आहे.

अर्थात्, मानवी प्राण्याची प्रथमची वस्ती आर्यावर्त्त नांवानें सुप्रसिद्धीस आलेल्या हिमालयाच्या दक्षिण प्रदेशांतच झाली; आणि येथूनच आमचे आर्यपूर्वज पूर्व,

१ मागें पान १२७।१२८ पहा.

२ Geikie's Physical Geography. ( P. 106 ).
Geikie's Geology. ( P. 126 ).

३ जो कालान्तरानें **आर्यावर्त्त** अथवा **भरतखंड** या नांवानें सर्वांस महशूर झाला.

पश्चिम, उत्तर, व दक्षिण[1] दिशेनें सर्वत्र पसरले. मात्र, ही उत्तरध्रुवाजवळील वस्ती, तो प्रदेश पाण्याबाहेर निघून कोरडा पडल्यावरच झाली असावी, असें वाटतें.

आम्ही आपल्या दिग्विजयाच्या पताका, धन व यश-

ऋग्वेदांतलें, व प्राप्त्यर्थ, पूर्व, पश्चिम, आणि उत्तर दि-शेकडे फडकाविल्या असल्याचें, ऋग्वेदाच्या बहुतेक आरंभींच वर्णन आहे. कारण, एका ऋचेंत असें म्हटलें आहे कीं, "अहो कुशिकांनो, तुम्ही सुदासाचा अश्व संपत्ती-साठीं मोकळा सोडा; म्हणजे, इन्द्र त्याचें संरक्षण करील; व पूर्व, पश्चिम, आणि उत्तर दिशांकडील शत्रूंस मारून ते प्रांत निर्भय ठेवील; व असें झाल्यानें, पृथिवीच्या अत्युच्च स्थानीं यज्ञ करण्यास आपणांस हरकत येणार नाहीं."

**उप प्रेत कुशिकाश्चेतयध्वमश्वं राये प्र मुंचता सुदासः । राजा वृत्रं जंघनत्प्रागपागुदगथा यजाते वर आ पृथिव्याः ॥ ११ ॥**

(ऋ. वे. अ. ३. अ. २ व. २१. मं. ३ अ. ४. सू. ५३. २८७).

अशा प्रकारें, आम्ही आर्यावर्त्तांतून चाऱ्ही दिशेनें

सांप्रतचें. चोहोंकडे पांगल्यावर, कालाच्या अनन्त घडामोडींत, प्रचंड जलप्रलय[2] एकाएकी झाला; आणि त्या कारणानें सर्वत्र वाताहात होऊन, पुष्कळच स्थित्यन्तर घडून आलें. ह्या जलविप्लवांत, असंख्य प्राण्यांची हानि झाली; अगणित जीवजंतू वाहून गेले; व कोटयावधि प्राण्यांवर

---

१ भारतीय साम्राज्य, पूर्वार्ध. पु. ६. भा० ३७. पान १६२ ते २०० पहा.

२ ह्याचें खरें कारण शास्त्रज्ञांस देखील कळत नाहीं.
( Paradise Found. P. 75. Warren. 1893. ).

नाना प्रकारच्या पदार्थांचे थरच्या थर चढले. ह्याचें प्रत्यक्ष प्रमाण हल्लींही क्वचित् दृग्गोचर होतें. कारण, जमिनींत खणल्यावर, आपल्यास कांहीं ठिकाणीं, भूगर्भांत, बर्फाखालीं, आणि अन्यत्र, प्राक्कालचें अवशिष्ट सांपडतें; व त्यांत स्तनपान करणाऱ्या प्राण्यांचीं हाडें, सांपळे, आणि अन्य पदार्थही आढळून येतात.

सर्व भाषांचें एक मूळ.

असो. झन्द, पाली, प्राकृत, ग्रीक, ल्याटिन्, हीब्र्यू, आरबी, इत्यादि भाषांचें मूळ एकच असल्याविषयीं, पूर्वीं[1] दिग्दर्शन झालें असून, हें मूळ म्हणजे, **संस्कृत** किंवा आर्यभाषा होय, असेंही मीं कळविलें. परंतु, तुराणी शाखेचें मूळ देखील **आर्य** म्हणजे संस्कृत भाषेंतच आहे कीं कसें, याबद्दलचें दिग्दर्शन पूर्वीं झालेलें नसल्याकारणानें, तें येथेंच करण्याची आवश्यकता आहे.

संस्कृत, हीब्र्यु, व तुराणी, यांतील साम्य.

आतां, एकंदर भाषांचें शोधक बुद्धीनें सूक्ष्म अवलोकन केलें, तर आपणांस असें दिसून येईल कीं, संस्कृत आणि हीब्र्यू यांत जें साम्य दृग्गोचर होतें, त्यापेक्षां तुराणी व संस्कृत यांतील साम्य पुष्कळ प्रमाणानें कमी आहे. ह्याचीं कारणें अर्थातच अनेक प्रकारचीं व भिन्न भिन्न आहेत. परंतु, त्यांतही विशेष मुद्याचीं म्हटलीं म्हणजे राजकीय, धार्मिक, आणि सामाजिक, अशीं असून, ह्यांचें न्यूनाधिक्य जितक्या प्रमाणानें असतें, तितक्याच मानानें मूळ भाषेंत किंवा तिच्या शाखेंत, कमी अथवा

१ मागें पान १३० ते १४२ पहा.

ज्यास्ती साम्य दृष्टीस पडतें; अगर प्रसंगविशेषीं त्यांचा अभावही भासमान होतो.

राष्ट्रपरिवेष्टनानुरूप भाषाभिन्नत्व.

सकृद्दर्शनीं, एक महत्वाची गोष्ट आपणाला प्रथमच कबूल करावी लागेल. तीही कीं, लोकभेदानें अगर राष्ट्रभिन्नतेमुळेंच, अनेक भाषा उद्भवल्या, आणि कालवशात् हे लोक निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन राहिल्या कारणानेंच, त्या त्या प्रदेशांतील परिवेष्टनानुरूप भिन्न भिन्न भाषा प्रचारांत आल्या. याप्रमाणें, अनेक भाषांचें मूलकारण केवळ लोकच असल्यामुळें, हे कोणत्या देशांतून कोठें गेले, व कसकसे पसरले, याबद्दलचा कांहीं दाखला मिळाला तर पाहूं; म्हणजे त्यावरून, एकंदर वस्तुस्थिति ध्यानांत येईल.

सर्व राष्ट्रांची जन्मभूमि भरतखंड असल्याविषयीं पौराणिक मत.

विष्णु पुराणासारखीं आमचीं कित्येक पुराणें बरींच प्राचीन[1], खरी, आणि ऐतिहासिक असून, त्यांवरून असें कळून येतें कीं, आमच्या आर्यवर्गापैकीं ज्यांनीं

---

१ कोलब्रूक म्हणतो, "Itihàsa and Puranàs are anterior to Vyaas," ( Misc. Essays. I. P. 11 ).

प्रोफेसर विल्सन् लिहितो, "*A* very great portion of the contents of many ( Puranas ), some portion of the contents of all, is genuine and old."

( Vishnu Puran. Preface. P. VI ).

कर्झन असें प्रतिपादन करतो कीं, "There can be little doubt that the primitive portions of the Puranas, are next, in point of antiquity, to the Suktas of the the Vedas, and generally more ancient than the Brahmanas, Upanishads, and Sutras, and the two great heroic poems."

( R. A. Society. vol. XVI. 1854. ).

ज्यांनीं म्हणून आपला सनातन धर्म सोडला, ते पतित होऊन भ्रष्ट झाले. इतकेंच नव्हें तर, ते आमची भरतभूमी सोडून देशान्तरीं गेले. त्यामुळें, त्यांच्या त्या भिन्न भिन्न अवस्थांत आणि नानाविध स्थितींत, अनेक व अतर्क्य परिवेष्टनांनीं हरएक बाबतींत फरक होत जाऊन, त्यांच्या मूळच्या प्रचारांत, आणि विशेषतः भाषेंत महदन्तर पडत चाललें.

तद्विषयक प्रमाण.

ह्याचा प्रत्यक्ष दाखला आमच्या पारसीक बंधूचाच होय. हे व आम्ही अगदीं नजीकचे गोत्रज असतांही, फक्त धर्माच्या बाबतींतच त्यांचा आणि आमचा लढा पडल्या कारणानें, त्यांजला खरोखरच देशत्याग करून, शेवटीं इराणांत राहणें भाग पडलें.

विष्णुपुराणांतलें.

ह्या संबंधानें विष्णूपुराणांत देखील एके ठिकाणीं महत्वाचा उल्लेख आहे. सबब, तो येथें नमुद करतों.

**तेच निजधर्मपरित्यागद्ब्राह्मणैश्च परित्यक्ता म्लेच्छतां ययुः।** ( विष्णुपुराण ४. ३. २१ ).

मनुस्मृतींतलें.

याहीपेक्षां प्राचीनतर प्रमाण मनुस्मृतींतलें असून, तींत देखील असें सांगितलें आहे कीं, स्वकर्म त्याग आणि क्रियालोप झाल्यामुळें, आर्यवर्गांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, इत्यादि जातींस हीनत्व येऊन, ते कालान्तरानें शक, यवन, चिनी, किरात, वगैरे बनले.

---

१ एतद्विषयक साद्यन्त माहिती भारतीय साम्राज्याच्या सातव्या पुस्तकांत दिली आहे. ( भाग ४० पान १०५ ते ११० पहा. )

**शनकैस्तुक्रियालोपादिमाःक्षत्रियजातयः**
**वृषलत्वं गतालोके ब्राह्मणादर्शनेनच ॥ ४३ ॥**
**पारदाःपल्हवाश्चीनाःकिरातादरदाःखशाः॥४४॥**
( मनुस्मृति. अ० १० ).

महाभारतांतलें.

याच्याही पूर्वींचा दाखला महाभारतांत आढळून येतो, व त्यावरून, आमचे कित्येक आर्य, चालरीत, धर्म, आणि कर्म, यांत भ्रष्ट झाल्यामुळें, त्यांस म्लेच्छत्व प्राप्त झालें, असें उत्तम प्रकारें व्यक्त होतें.

भरतखंडांतला ययाति नांवाचा राजा आबालवृद्धांस माहित असून, त्याला पुरु, यदु, तुर्वसु, द्रुह्यु, व अनु, असे पांच पुत्र होते. परंतु, एक खेरीज करून बाकी-च्यांनीं आपल्या पित्याची आज्ञा भंग केल्याकारणानें, त्यां-जला त्यानें शाप दिला, आणि तुमची प्रजा धर्मभ्रष्ट होऊन नाश पावेल, म्हणून सांगितलें. त्यामुळें, यदूपा-सून यादव झाले. तुर्वसूपासून यवन निपजले. द्रुह्युपासून वैभोज उदयास आले. व अनूपासून म्लेच्छ अवतरले.

**यदोस्तु यादवा जाता स्तुर्वसोर्यवनाः स्मृताः ।**
**द्रुह्योः सुतास्तु वैभोजा अनोस्तुम्लेच्छ जातयः ॥**
( महाभारत. १,३९३३ ).

रामायणांतलें.

पण, ह्यापेक्षांही पुराणतर प्रमाण मिळावें, एतदर्थ, आपण क्षणभर रामायणाकडे वळूं, आणि त्यांत कोणता आधार उपलब्ध होतो, तें पाहूं.

विश्वामित्रानें वसिष्ठमुनींचा छल करून, त्याची काम-

धेनु बलात्कारानें नेली, व मोठा अनाचार मांडला. त्यामुळें, त्याचा प्रतिकार करण्यासाठीं तिनें तत्काल मोठा हंबरडा फोडून, पल्हव, शक, यवन, कांबोज, बर्बर, इत्यादि नानाविध प्रबल प्रजा उत्पन्न केली, आणि विश्वामित्राच्या सैन्यास जेरीस आणिलें.

**तस्याहुंकारतोजाता: कांबोजा रविसंनिभा: ।**
**ऊधसश्चाथ संभूता बर्बरा: शस्त्रपाणय: ॥ २ ॥**

( रामायण. बालकांड. सर्ग ४९ )

ह्या, व या खालीं नमुद केलेल्या कथाभागावरून, आणि पूर्वीं सांगितलेल्या प्रमाणांवरून, शक, यवन, चीनी, म्लेच्छ, इत्यादि लोक भरतखंडांतच उत्पन्न होऊन, सर्वत्र पसरल्याचें अनुमान होतें.

ऐतरेय ब्राह्मणांतलें, व

आतां, अनार्य व दस्यु लोक, आणि अन्ध्र, पुण्ड्र, बर्बर, पुलिन्द, मूतिब, वगैरे दूर-दूरच्या उपान्तवर्ती व नानाविध-जाती, कशा आणि कोणत्या कारणानें झाल्या, या विषयींचें एक चमत्कारिक कथानक ऐतरेय ब्राह्मणांत[1] देखील आहे. त्यावरून, असें स्पष्ट दिसून येतें कीं, सदरहू पर्यंतवर्ती जाती विश्वामित्रापासूनच उत्पन्न झाल्या. कारण, ह्याचे पन्नास पुत्र असून, ते आज्ञोल्लंघन करणारे निघाले. सबब, त्यानें त्यांचा धि:कार केला, व असा शाप दिला कीं, तुमची प्रजा प्रान्तनिवासी होऊन, सरहद्दीवरील फार लांबलांबच्या आणि जंगली प्रदेशांत राहील. पुढें हीच प्रजा अन्ध्र,

श्रुतींतलें.

१ ऐतरेय ब्राह्मण ऋग्वेदाचे होत. सबब. त्यावरून त्यांचें प्राचीनत्व सहजीं ध्यानांत येईल.

पुण्ड्र, शबर, पुलिन्द, मूतिब, बर्बर, इत्यादि नांवांनीं प्रसिद्धीस येऊन, तिच्यापासून दस्यु प्रजा देखील झाली.

ऐतरेय ब्राह्मणांतील मूळ संहिता खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

दस्यू वगैरेंची उत्पत्ति.

**ताननुव्याजहार । अन्तान् वः प्रजा भक्षीष्टेति । तेएतेअन्ध्राः पुण्ड्राः शबराः पुलिन्दा मूतिबा इत्युदन्त्या बहवो भवन्ति । वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः (७. १८).**

सिंहावलोकन, व आर्यभाषेपासून इतर भाषांची उत्पत्ति.

याप्रमाणें, आह्मां आर्यांपासूनच भिन्न भिन्न लोक आणि निरनिराळीं राष्ट्रें उत्पन्न होऊन, तीं पृथक् पृथक् देशांत पसरलीं असल्याचें, सदरीं निर्दिष्ट केलेल्या प्रमाणांवरून उघड दिसतें; व त्यावरून आर्य भाषेपासूनच अन्यभाषा उद्भवल्या असल्याचें अनुमान होतें.

तत्संबंधीं परधर्मातलें, म्हणजे बायबलांतलें प्रमाण.

अर्थात्, सर्व भाषांचें मूळ एक असल्याविषयीं, जी मॉक्समुलरची उपपत्ति आहे, ती खरी मानण्याला आमच्या सदरीं नमुद केलेल्या कथानकांचें बलवत्तर साहाय्य आणि पुष्टीकरण मिळतें. एवढेंच नव्हे तर, अखिल भूतलावर प्रथमारंभीं एकच भाषा प्रचारांत असून, तीच सर्व लोक बोलत होते, अशाविषयींचें प्रमाण[1] ख्रिस्ती धर्माच्या पवित्रशास्त्रांत[2] देखील आढळून येतें.

---

1 "And the whole earth was of one language and one speech." (Genisis. XI. I.)

२ ख्रिस्ती धर्म बौद्धधर्माची नक्कल असून, बौद्धधर्म हिंदुधर्माचें पिलूं असल्याविषयीं, भारतीय साम्राज्याच्या सातव्या पुस्तकांत आम्हीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. (ग्रंथकर्ता.)

शिवाय, शास्त्रीय दृष्ट्या, ही गोष्ट पर्यायानें मॉक्समुलरासुद्धां संमत झाल्यासारखी दिसते. कारण, तो एके ठिकाणीं असें म्हणतो कीं,

"We can understand not only the origin of language, but likewise the *necessary breaking up of one language into many*; and we perceive that *no amount of variety in the material or the formal elements of speech is incompatible with the admission of one common source.*"

"The science of language thus leads us up to that highest summit, from whence we see into the very dawn of man's life on earth, and where the words which we have heard so often from the days of our child hood—'. nd the whole earth was of one language and of one speech'—assume a meaning more natural, more intelligible, more convincing, than they ever had before."

(Lectures. Sc. Language. vol. I. P.P.447,448).

सर्व भाषांचें मूळ एकच असल्याबद्दल मॉक्समुलरचा अभिप्राय, व

तसेंच, ह्या भूतलावरील नानाविध भाषांचें मूळ एकच असणें बिलकूल असंभवनीय नाहीं, असेंही त्याचें मत आहे. कारण, तो स्पष्टपणें असें प्रतिपादन करतो कीं,

"We have exmined all possible forms which language can assume. and we have now to ask, can we reconcile with these three distinct forms, the radica!, the terminational, and the inflectional, the admission of one Common origin of human speech? I answer decidedly, yes."

(Science of Lauguage P. 375 vol. I)

फार तर काय सांगावें पण, तुराणी कुटुंबाची जी तुर्की

ईवालड्चें मत. शाखा, तिचें आणि आर्यभाषेचे घटकावयव एकच असल्याविषयीं, प्रोफेसर ईवाल्डचा देखील अगदीं ठाम अभिप्राय आहे. सबब, त्यासंबंधानें मॉक्समूलर असें लिहितात कीं,

"Nay, he (Professor Ewald) goes so far as to admit some formal elements, which Turkish shares in common with the Aryan family." * *

(Science of language vol. I P. 385).

शिवाय, तुराणी भाषा अनार्य वर्गांत मोडत असून, ह्या भाषांच्या संबंधानें बीम्स्चें असें मत आहे कीं, ह्यांतील पुष्कळ शब्द आर्यमूलात्मक म्हणजे संस्कृत आहेत. तो म्हणतो:—

"But *this is admitted on all hands* that a *very large proportion* of their (Non-Aryan Languages) *Constituent parts* is of Aryan Origin." (Mr. Beames' article in the Journal of the Royal Asiatic Society for 1870. vol. V. P. 150).

आतां, संस्कृत म्हणजे जी आर्यभाषा[1], तिच्यांतील शब्दांचें रूप अगदीं पुराणतम असून, इतकें प्राचीनतम मूळरूप अन्यत्र कोठेंही नाहीं, हें सर्वांस पक्केपणीं समजलें आहे. तथापि, त्याबाबतींतही, एका बहुश्रुत पाश्चात्य पंडिताचा दाखला, वाचकाची खात्री होण्यासाठीं, येथें नमुद करतों.

---

१ संस्कृतभाषा अथवा आर्यभाषा हे केवळ पर्याय शब्दच होत, असें आह्मीं भारतीय साम्राज्याच्या नवव्या पुस्तकांत सप्रमाण सिद्ध करून दाखविलें आहे. सबब, त्या पुस्तकांतल्या ५२ व्या भागांतील ५१ ते ९५ पानांवर वाचकांनीं आपलें लक्ष्य पुरवावें. (ग्रंथकर्ता.)

एतद्विषयक विवेचन करतांना, मूर ह्मणतोः–

" *We are driven, whether we like it or no, to look to Sanskrit for the oldest extant forms; and we do undoubtedly, find them there.*"

( Muirs Sanskrit Texts. vol. II. P. 144 ).

सरदहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

अन्य पुरावा.

तथापि, **संस्कृत** ह्मणजे **आर्य**, ही सर्वांची **मायभाषा** असून, ज्याप्रमाणें तिच्यापासूनच **झन्द**, **पाली**, **महाराष्ट्र**, **ग्रीक**, **ल्याटिन्**, **जर्मन्**, इत्यादि **आर्य**भाषा प्रसवल्या, त्याचप्रमाणें **शमी**, **तुराणी**, **सामुद्रिक**, वगैरे भाषा सुद्धां ह्याच उद्गमस्थानापासून उद्भवल्या आहेत, असें मानण्यास आणखी एकादें बलवत्तर कारण किंवा जोराचा पुरावा असल्यास, तोही आपण यथावकाश पाहूं, आणि केवळ निःपक्षपातानें तपासूं.

शब्दांचें अन्तर्गत प्रमाण.

वास्तविकपणें विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, भाषेंतील शब्द हेच तिच्या खऱ्या स्थितीचें आभ्यन्तर प्रमाण होत. आणि म्हणूनच, भाषेच्या उद्गमस्थानाचें ते निःसंशय द्योतक आहेत, असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं. सबब, ह्यांच्याच सुकाबल्यानें आपण **शमी**, **तुराणी**, व **सामुद्रिक**, या भाषांतील शब्दांचें परिशीलन करूं, आणि त्यांचें उद्गमस्थान शोधून काढूं.

**अम्बा** ह्मणजे माता, हा मूळ **संस्कृत** शब्द होय. या-

अंबा शब्दाचें रूपांतर.

साठीं, तो हीब्रू ह्मणजे शमी भाषेंत कोणत्या रूपानें आढळतो, व तुराणी भाषेंत त्याचीं रूपान्तरें कशीं झालीं आहेत, हें आपण लक्ष्यपूर्वक पाहूं.

अंबाचें द्राविडी भाषेंत अम्मा असें रूप होऊन, हीब्रू ( शमी ) भाषेंत ह्या शब्दाचें एम् व इम्म ( = आई ) असें रूपांतर झालें आहे. तसेंच, शक ( सिथियन ) भाषेंत अम्माल, अम्मेइ, अम्मन; सीरियन० आमो; सामोयेडी अम्म; सिन्दी० अमा; मल्याळी० अम; याप्रमाणें अन्य भाषांत देखील केवळ अपभ्रंशानेंच ह्या मूळ ( अंबा ) शब्दाला कांहीं निराळें रूप प्राप्त झाल्याचें दिसतें. आतां, तुळू व तुडू नांवाच्या ज्या द्राविडी भाषेच्या शाखा आहेत, त्यांत अम्मा व अप्पा, या शब्दांच्या अर्थाचा परस्फर फेरबदल झाला असावा, असें वाटतें. कारण, तुळु भाषेंत अम्मे ह्मणजे बाप, आणि अप्पे ह्मणजे आई, असा अर्थ होतो; व तुडू भाषेंत एन = बाप, अक = आई, या अर्थाचाच तो शब्द वाचक आहे. मोगली भाषेंत देखील अम म्हणजे बापच होय. प्रायः, तिबेटी वगैरे भाषांत, 'प' किंवा 'पो', आणि 'म' अथवा 'मो', हे लिंगवाचक प्रत्यय असल्याचें दिसतें. ह्मणजे, पहिले पुरुषवाचक असून, दुसरे स्त्रीवाचक आहेत. उदाहरणार्थ ति० बोत्प ह्मणजे पुरुष, व ति० बोत्म ह्मणजे स्त्री होय. महाराष्ट्र भाषेंतील आई शब्द हा अंबाचाच अपभ्रंश आहे, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

आतां, अम्बाल शब्द, संबंधवाचक आहे. इतकेंच नव्हें

तर, समाजाच्या बाल्यावस्थेंत तो प्रथमतःच व्यवहारांत आला असावा, असें कोणालाही कबूल केलें पाहिजे. आणि ज्यापेक्षां ह्या शब्दाची प्रथमावस्था फक्त संस्कृतांतच दृग्गोचर होते, व त्याचें रूपान्तर मात्र शमी, तुराणी, सामुद्रिक, इत्यादि भाषांत आढळून येतें, त्यापेक्षां संस्कृत रूपी आर्यनिर्झरापासूनच अन्य शाखांस जीवन मिळून, त्यांचा प्रवाह सुरू झाला असावा, असें मानण्यास बलवत्तर कारण मिळतें.

अव् म्हणजे इच्छिणें, तोषविणें, इत्यादि अर्थाचा हा

अव्, अस्सल संस्कृत शब्द असून, त्याचा तामील भाषेंत अवा (=इच्छा) असा अपभ्रंश होतो, आणि त्याचेंच शमी (हीब्र्यू) भाषेंत अव्वा हें रूप झाल्याचें दिसतें.

फल् म्हणजे फलास येणें, हा मूळ संस्कृत शब्दच आहे.

फल्, व ह्याचा परु (=पिकणें, फलद्रूपहोणें,) असा तामिल भाषेंत अपभ्रंश होतो. त्याचप्रमाणें, हीब्र्यु॰ पारा=फूल येणें, पेरी=फळ, आर्मीनी॰ पर्क=फळ; फारसी॰ बर=फळ; इत्यादि भाषांतही त्याचा कालदेशानुरूप अपभ्रंश झाला आहे.

संस्कृत शाण म्हणजे पोतें, हा शब्द तर, मुख्य मुख्य

शाण इत्यादि शब्द. सर्व आर्य व अनार्य, पौरस्त्य आणि पाश्चात्य भाषांत, थोड्याबहुत रूपांन्तरानें दृग्गोचर होतो. तामिल॰ शाक्कु. शमी (हीब्र्यु) सक. मल्याळी॰ चाक्क, ग्रीक॰ साक्कास, साकास. इंग्रजी॰ सॅक. सेल्टिक॰ सॅक. फिनी॰ सक्की. मागीर॰ साक.

संस्कृतांतील सम शब्दांचें तामिळ भाषेंत शेव्वे (=सारखा) हीब्र्यूत शावा, व चाल्डींत शेवा, याप्रमाणें रूपान्तर होतें. संस्कृत ईक्ष=पाहणें, याचा हवै भाषेंत इके (=त्यानें पाहिलें अगर जाणलें), असा अपभ्रंश होतो; आणि सं० मन=हवै० मनाव; सं० ज्ञा (जा)=ह० नू=वाटणें, नू=जाणणारा, शहाणा. सं० कल्=ग्रीक० कलीन=बोलावणें, इत्यादि अनेक भाषांत नानाविध फेरफार झाल्याचें दिसतें.

सम, इत्यादि शब्दांचा वृत्तांत.

याप्रमाणें, शमी व तुराणी[1] भाषांतील अनेक शब्दांत संस्कृत माय भाषेचें ऋण व तज्जन्य शब्दांचें निकटसाम्य सूक्ष्म अवलोकनानें दृग्गोचर होऊन, तें व्याकरण मीमांसेनें देखील सिद्ध होण्यासारखें आहे.

सिंहावलोकन.

---

१ तामिल अथवा द्राविडी भाषा तुराणीच्या शाखा असल्याविषयीं, पाश्चात्यांचें मत आहे. परंतु, आमच्या अल्प समजुतीप्रमाणें, त्या आर्य म्हणजे संस्कृत भाषेच्याच शाखा असून, आम्ही तें मागें ( पान ३७।१६५ पहा ) सप्रमाण दाखविलें आहे. त्याचप्रमाणें, प्रबुद्ध भरतांत देखील तत्संबंधीं विवेचन आहे. सुप्रसिद्ध स्वामी विवेकानंद म्हणतो कीं, तामिल लोक आर्यच होत.

" The great ancestors of the Aryan race—the great Tamilians."

( प्रबुद्ध भरत. No 54. Jan 1901. P. 14 ).

———



A
ated

जें भरतखंड, त्याच्याच पादपीठाशीं प्रथमतः धांव घेऊन, तेथूनच प्रारंभ केला पाहिजे. कारण, आर्यावर्त्त हेंच मानवी प्राण्याचें आदिनिवासस्थान असल्याविषयीं अनेक प्रमाणांवरून दिसत असून, त्याबद्दलचीं सम्यक् कारणें व पाश्चात्यांचे अभिप्राय देखील पूर्वी[1] दिले आहेत. इतकेंच नव्हे तर, शास्त्रीयदृष्टया सुद्धां तेंच सयुक्तिक आहेसें वाटतें.

आर्यावर्त्त.

आर्यावर्त्त हा शब्द आर्य + आवर्त्त, या दोन शब्दांपासून झाला असून, त्याचा अर्थ आर्यांचें निवासस्थान असा होतो. आर्यभूमि व आर्यदेश हे याच अर्थाचे शब्द होत. आर्यावर्त्ताचा उल्लेख मनुस्मृतिकारांनीं केला आहे, आणि त्यांत त्यांनीं ह्या देशाची मर्यादा सुद्धां स्पष्टपणें कळविली आहे.

**आसमुद्रात्तुवै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् ।**
**तयोरेवान्तरं गिर्योरार्यावर्त्तं विदुर्बुधाः ॥ २२ ॥**

(मनुस्मृति. अ० २.)

शिवाय, आर्यावर्त म्हणजे आर्यांचीच खास जन्मभूमि असून, येथें ते वारंवार उत्पन्न होतात व उदयास येतात, असें कुल्लूक भट्टाचार्यांनीं आपल्या मनुस्मृतीवरील टीकेंतही ध्वनित केलें आहे. कारण, ते म्हणतात, " आर्या अत्रावर्तन्ते पुनःपुनरुद्भवन्तीत्यार्यावर्तः ।

आर्यावर्ताला भरतभूमी देखील म्हणतात, व भरतांचा

---

१ मागें पान १२७ व १५६ ते १५८ पहा.

लेंगच्यामतें ईजिप्त ( मिसर ) देशच पुराणतम होय. परंतु, त्याच्या प्रतिपादनास बलवत्तर असा कांहींच आधार नसून, शास्त्रीय विचारानें देखील ती गोष्ट शाबीद ठरत नाहीं. आणि म्हणूनच त्यांचें म्हणणें केवळ एकदेशीयसेंच भासतें.

उल्लेख वेदांत ठिकठिकाणीं केल्याचें आढळून येतें. ह्या भरतभूमीलाच **आर्यावर्त** असें नामधेय पडलें. कारण, आम्हां भारतीयांचें अगदीं पहिलें, जगद्वन्द्य, आणि जगद्विख्यात नांव म्हटलें म्हणजे **आर्य** असून, **आर्यांचें** जें निवासस्थान तें **आर्यावर्त्त**, अशा समजुतीनें हें अन्वर्थ अभिधान प्रचारांत आलें असावें, हें उघड आहे.

शब्दांचें रूपांतर.

आतां, **आर्य, आर्यावर्त्त**, इत्यादि अनेक शब्दांचें कसकसें स्थित्यन्तर, स्थलांतर, व रूपांतर झालें, त्यांनीं कोणकोणत्या देशांत किती दूरवर पर्यटन केलें, आणि नानाविध देशांत त्यांचे घटकावयव कशा रीतीनें बदलत गेले, याबद्दलचा थोडक्यांत विचार करूं.

आर्यशब्द.

आमच्या जन्मभूमींत, म्हणजे **आर्यवर्तांत**, किंबहुना सकल मानवी प्राण्याच्या ह्या **आदि**-निवासस्थानांत, आम्ही आपल्यांस **आर्य** म्हणवीत असूं. अर्थात्, आमच्या चाली रीतीचे, व आम्हांप्रमाणें **आर्यांच्या** सनातन[2] धर्मावर विश्वास ठेवणारे मात्र, ह्या श्रेष्ठ अशा **आर्य**पदवीस पात्र असत; आणि धर्मभ्रष्ट किंवा पतित झाल्यामुळें, जे आमच्या यज्ञयागांचा विध्वंस करीत, ते आमचे शत्रू बनल्याकारणानें, त्यांस आमच्या कळपा बाहेरचे व कमी दरज्याचे समजून, आम्ही त्यांजला दस्यू[3] असें नामधेय दिलें होतें.

---

१ ऋग्वेद. (अ ३. अ २. व १४. मं ३. अ. ३. सू. ३३–२६७).

२ **कर्तव्यमाचरन्‌कार्यमकर्तव्यमनाचरन्‌ ।**
**तिष्ठति प्रकृता चारे सवा आर्य इतिस्मृतः ॥**

३ **भार**तीय साम्राज्य. उत्तरार्ध. पु. ८ भाग ४६. पान १९२, व. **भा.** सा. उ. पु. ९ भाग ५२ वा पहा.

विजानी ह्यार्या न्येच दस्यवो
बर्हिष्मते रंधया शासदव्रतान् ॥ ८ ॥
( ऋ. मं १. अ. १०. सू. ५१. )

हा **आर्य** शब्द प्रथमतः आमच्या सर्व चातुर्वर्ण्यालाच लागू असे. परंतु, कालान्तरानें, तो फक्त **ब्राह्मण, क्षत्रिय,** आणि **वैश्य,** या त्रिवर्णांचाच वाचक झाला. **शत-**

त्याची पूर्वकालीन व्याप्ति, व तदनन्तरची मर्यादा.

**पथ ब्राह्मणांवरून** तर, ही गोष्ट स्पष्टच दिसून येते. कारण, त्यांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, **ब्राह्मण, क्षत्रिय,** व **वैश्य,** ह्यांसच यज्ञ करण्याचा अधिकार असल्यामुळें, फक्त तेच **आर्य** समजावयाचे. इतकेंच नव्हे, तर, ह्या वर्णत्रयानें **शूद्रां**जवळ बोलूं देखील नये. आणि बोलण्याचें कारणच पडल्यास, " **शूद्रा**ला अमुक सांग, " असें म्हणावें.

**अथर्ववेदावरून** देखील हाच अर्थ ध्वनित होतो, असें त्यांतील कित्येक वचनांवरून सहजीं ध्यानांत येईल.
( ४. २०. ४; १९. ६२. १ ).

असो. पूर्वी सांगितल्याप्रमाणें धर्मसंबंधीं कित्येक बाबतींत आमचा व आमच्या **पारसीक** बंधूंचा बेबनाव होऊन, ते आमच्यापासून विभक्त झाले. तदनंतर, त्यांनीं ह्या **आर्यावर्ता**तून आपला गाशा गुंडाळला, आणि वायव्यदिशेकडे आपला मोरचा फिरवून, कांहीं **वीरखंडांत** (बॅक्ट्रियांत) गेले, व बाकीच्यांनीं **बलूरताग** आणि **मुस्तागच्या निम्नप्रांतांत**, व **अक्षय्या** ( Oxus ) आणि **जगत्सरित** (Jaxartes) **नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत** आपला तळ दिला.

याप्रमाणें, त्यांनीं जो देश नवीन व्यापला, त्याला ते ऐर्या ह्मणत, असें झन्दअविष्टा म्हणून जो त्यांचा धर्मग्रंथ आहे, त्यावरून व्यक्त होतें. कालान्तरानें, झरथुष्ट्रधर्म पश्चिमगामी होऊन, तो पर्शिया, इलिमाई, व मीडिया, येथें पसरला; व हे सर्व देश आर्य नांवानेंच विकं लागले. पर्शियाला इराण किंवा आरिया, आणि मीडियाला आरिया ह्मणत, व मीडियन् लोकांस आरी हेंच नामधेय असे. अत्रोपटीन हा मीडियाचा अगदीं उत्तरेकडील भाग होय. पण ह्याला देखील आरियाना ह्मणत. इलिमाई मात्र ऐलमा[1] नांवानें सुप्रसिद्ध असून, हें नांव ऐर्यमाचा केवळ अपभ्रंशच होय, हें उघड आहे.

ऐर्या.

पारसीकांचा राजा जो सुप्रसिद्ध डरायस् ह्यानें सुद्धां आपल्यास आरिय[2] व आरिय-चित्र (ह्मणजे आर्य व आर्यवंशज) असें ह्मटलें आहे. फार तर काय सांगावें पण, अहुरमझ ह्मणून जो पारसीकांचा परमेश्वर, त्याला देखील आर्यांचा[3] देवच ह्मटलें आहे; तसेंच, आरिस्टॉटल्चा शिष्या जो युडिमॉस् त्यानें सुद्धां पारसीकांच्या प्रांताला आरिया असेंच नामधेय दिलें आहे; आणि सासानी (मसदेनपूजक)

आरिय.

१ ह्या ऐलमाचेंच खिस्ती धर्मांतील ईलम (the Elam of Genesis) झालें असावें, असें वाटतें. ह्याचीं भिन्न भिन्न रूपें, निरनिराळ्या लिपींत व शिलालेखांत दृग्गोचर होतात. उदाहरणार्थ, ऐलान, ऐरान्, अनिलान्, व अनिरान्.

२ शराचिन्हात्मक शिलालेख पहा.

३ बिहिस्तून शिलालेख, व त्यांचें तुराणी भाषांतर पहा.

राजांनीं पण "आर्य व अनार्यांचे² प्रभू" अशी पदवी आपल्याला धारण केली आहे.

इराण.

पर्शियाला अजून देखील इराण म्हणतात, व त्यावरून तो देश आमच्या **आर्य** पूर्वजांच्याच एका जवळच्या शाखेनें वसविला असून ती त्यांचीच वसाहत होती, असें आजमितीलाही स्मरण होतें; एवढेंच नव्हें तर, त्यांच्या श्रेष्ठ नामधेयाचें आणि पराक्रमशीलतेचें शिक्कमोर्तब अद्यापि देखील कायम व मोहोरबंद आहे, असें कबूल करावें लागतें.

आरी व आर्मीनिया.

आर्मिनियासुद्धां **आरियानाचाच** अपभ्रंश असावा असें वाटतें. **आंक्वेटिल्**च्या मतें आर्मीनिया हा **ऐर्यमन्**चाच प्रतिशब्द होय. परंतु, तें म्हणणें सप्रमाण दिसत नाहीं. तथापि, **आर्मीनियन्** भाषेंत, **आरि** शब्द **आर्य** व इराणी यांचा वाचक आहे, यांत बिलकुल शंका नाहीं. मात्र, तो व्यापक आणि बहुमानार्थी आहे, इतकी गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. **आर्मीनियाच्या** पश्चिमेस व **कास्पियन्** समुद्राला लागून, **आल्बेनिया** नांवाचा एक प्रदेश आहे, आणि त्याला तेथील लोक **अघोवन्** म्हणतात. आतां, **आर्मीनियन** भाषेंत, **र** किंवा **ल**च्या ऐवजीं **घ** चा उपयोग होत असल्यामुळें, **अघोवन्**चें खरें रूप **अरोवन** अथवा **अलोवन्** असें होतें; व त्याच कारणानें, तें **आरियन**चा अपभ्रंश आहे, असें **बोर**चें मत आहे. शिवाय, **कॉकेजस** पर्वताच्या दरींत **आर्यांचे** वंशज असून, ते **आर्य** भाषा

² पर्शियाला इराण अशी संज्ञा असल्यामुळें, ह्याचें पल्हवींतलें भाषान्तर "इराण व अनिराण," असें होतें.

ह्मणजे अर्थात् तिची अपभ्रष्ट शाखा बोलतात, आणि ते आपणास आर्यन म्हणवितात, असें कळून येतें.

पण, एवढ्यानेंच सर्व बाजार आटोपला नसून, आम्ही **आर्य** याच्याही पेक्षां फार दूर दूर गेलों असल्यामुळें, आम्हांबरोबरच आमच्या **आर्य** शब्दांनीं देखील धांव घेतली, व फार लांब लांबच्या देशांत पर्यटन केलें. त्यायोगानें त्यांचा दिगंतरीं प्रसार होऊन, तुराणी लोकांच्या विस्तृत राज्यांत सुद्धां त्यांनीं आपलें कायमचें ठाणें बसविलें. परंतु, ह्यांत फारसें नवल नाहीं. कारण, ते आमच्यापैकींच होत. म्हणजे आमच्या **आर्य** कुटुंबापैकीं, जे जे म्हणून व्यवहारशून्य व धर्मभ्रष्ट होऊन पतित झाले, त्यांस देशत्याग करावा लागल्यामुळें, ते भरतखंड सोडून देशान्तरीं गेले; आणि त्यांनीं दूरदूरच्या देशात आपली वस्ती केली. पुढें, कालान्तरानें, त्यांच्या कुटुंबाचा व आमचा परस्पर संबंध तुटत गेल्यामुळें, त्याच्या चालीरीतींत, धर्मबाबतींत, भाषेंत, आणि एकंदर व्यवहारांत, पुष्कळच फरक पडत गेला; व त्याकारणानें त्यांची एक स्वतंत्र शाखाच बनली. तदनन्तर, तीच तुराणी नांवानें सर्वांस महशूर झाली. ( मागें पान १६३ ते १६८ पहा. ). तेव्हां तुराणी लोक **आर्य** कुलोत्पन्न असल्यानें, तुराणी भाषेंत, **आर्य** शब्दाचें मूळ प्रत्यक्ष किंवा पर्यायानें दृग्गोचर होणें अगदीं साहजिक आहे.

असो. तात्पर्य ह्मणून इतकेंच कीं, अक्षय्या ( Oxus ) नदीच्या पलीकडे देखील, **आर्य**-शब्दांनीं अनेक प्रांत व अफाट मुलुख काबीज केला असून, तेथें अवश्य

आर्यसी, अन्तार्याणी, स्पर्गापिथिस्, इत्यादि.

ती मजबूत तटबंदी केल्यावर, ते ह्या दुर्भेद्य दुर्गांत कायम जाऊन राहिले असावें, असें अनुमान होतें. ह्या प्रदेशांत, आर्यसी[1] व अन्तार्याणी नांवाचे लोक अजूनही आहेत, व डरायसूच्या कारकीर्दीत तुराणी किंवा सिथियन् लोकांचा आर्यन्तस्[2] नांवाचा राजाही तेथें होता. इतकेंच नव्हे तर, क्षीराक्षसाच्यां[3] समकालीनाचें नांव अरिपिथिस् ह्मणजे आर्यपति असें होतें, आणि अस्पकर, अस्परथ, स्पर्गपिथिस्, इत्यादि, अश्वकर, अश्वरथ, व स्वर्गपति, या संस्कृत शब्दांपासूनच झालेले, परंतु अपभ्रष्ट स्थितींत राहिलेले सिथियन (ह्मणजे तुराणी) शाखेंतले शब्द होत, यांत संशय नाहीं.

याप्रमाणें, आशियाखंडांत आमच्या आर्य पूर्वजांनीं कसकसें व कोठें पर्यटन केलें, आणि आपल्या नामधेयाचा चलनी शिक्का कोठपावेतों चालू ठेविला, याचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें. सबब, आतां, यूरोपखंडाकडे वळूं, व तिकडे आर्यनामाचें मूळ कोणकोणत्या प्रदेशांत, किती, आणि कशा प्रकारें खोल गेलें आहे, याविषयींचा विचार करूं.

यूरोपखंडांत आर्यशाखांचा प्रवेश दोन मार्गांनीं झाला

---

१ हीं आर्य शब्दोद्भवच नांवें होत, यांत संशय नाहीं.

२ हें नांव कदाचित् आर्यन्त असावेंसें वाटतें. अर्थात्, आर्यांनीं ह्या राजाचा पराभव केल्यावर, तो इकडे पळून आला असल्याचें संभवतें. कारण, "आर्यांनीं केला आहे अन्त ह्मणजे पराभव ज्याचा, तो आर्यन्त," असें समासावरून दिसतें.

३ Xerxes.

युरोपखंडांतील आर्यनामधेयाची मुद्रा.

असल्याचें दिसतें. कित्येक भरतखंडांतून खोरासान मध्यें उतरले, आणि येथून ते रूस, काळासमुद्र, व थ्रेस कडे वळले. कांहींनीं आर्मीनियांत प्रवेश केला, आणि तिकडून त्यांनीं कॉकेजस् पर्वत, ग्रीस, इताली, व आयर्लंड, इत्यादि देशाकडे आपला मोरचा फिरविला. पण कित्येक तर, डॉन्यूब नदी उतरूनच जर्मनी वगैरे देशांत शिरले. आतां, सदरहू प्रदेशांत, आर्यनामाची मुद्रा कोणकोणत्या ठिकाणीं दृग्गोचर होतें, हें पाहूं.

आरिया ऊर्फ थ्रेस, आर्यल्यांड किंवा आयर्लंड, व उत्तर कुरु अथवा हायपर बोरियन्स.*

थ्रेसचें प्राचीनकाळचें नांव आरिया[1] होतें; आणि जर्मनीच्या उत्तर प्रान्तनिवासी लोकांसही आरि अशी संज्ञा असल्याचें आढळतें. इतकेंच नव्हें तर, आर्यमूलक शब्द ज्याप्रमाणें इराणी विशेषनामांत पुष्कळ सांपडतात, त्यांचप्रमाणें जर्मनीच्या इतिहासांत देखील आरियोव्हिस्टस् वगैरे अनेक नांवें दिसून येतात. आयर्लंडांत, म्हणजे युरोपखंडाच्या अगदीं पश्चिम सरहद्दीला तर, आर्यभूमिसंज्ञक असें प्रत्यक्ष नांवच दृग्गोचर होतें. कारण,

---

[1] Stephanus Byzantinus. * मागें पान १४. टिप १.

२ मॉक्समूलर. ( भाषाशास्त्रविषयक व्याख्यानें. भाग १ ला. पा. २८३. सन १८८०. )

३ असें पाश्चात्य पंडितापैकीं देखील कित्येकांचें मत आहे, आणि प्रोफेसर मॉक्समुलर सुद्धां ती गोष्ट कबूल करतात. कारण, ते एके ठिकाणीं असें म्हणतात कीं,

" Though we look invain for any traces of this old national name ( Arya ) among the Greeks and

( पुढें चालू )

**आयर्लंड** म्हणजे **आयर्लॅण्ड** असून, ह्या शब्दाच्या पूर्वपदाचा तर दीर्घ देशान्तरामुळें बराच अपभ्रंश होऊन, उत्तरपदाचा मागमूसही कालान्तरानें न राहिल्याच्या योगानें, तद्देशीय व त्या लोकांच्या परिचयाचें (ल्यांडअसें) एक नवीन पदच, पूर्वपदाला चिकटवून दिलें आहे. अर्थात्, त्याचा बोध **आर्यांची** भूमि असाच होतो, यांत बिलकुल शंका नाहीं.

इतर आर्य म्हणजे संस्कृत शब्दांचें रूपांतर.

याप्रमाणें, आमच्या **आर्य**राष्ट्रत्वाचा वाचक जो **आर्य** शब्द, तो कोणकोणत्या खंडांत कशा प्रकारें गेला, आणि त्याची व्याप्ति कोणत्या प्रदेशांत कितीसें रूपान्तर होऊन झाली, याविषयींचें अवश्य तें दिग्दर्शन थोडक्यांत केलें. सबब, आणखी ज्यास्त खुलासा होण्यासाठीं, **संस्कृत** भाषेंतील अन्य शब्दांकडे वळूं, व स्थित्यन्तर आणि देशान्तरासंबंधानें त्यांचा ही संक्षिप्त इतिहास देऊं.

**संस्कृता**तील मूळशब्द **अग्नि**, याचें **ल्याटिन्** भाषेंत **इग्निस्** ( Ignis ) असें रूपान्तर झालेलें दृष्टीस पडतें. **द्यौः** शब्दाचा अपभ्रंश **ग्रीस** देशांत **झिअस्** (Zeus), इतालींत **ज्यूपिटर** (Jupiter), व **टयूटॉनिक्** भाषेंत **त्यू** (Tiu), असा आढळतो. **उषस्**चें **ग्री**क भाषेंत इऑस् ( Eos ), **नक्ता**चें

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

Romans, some scholars believe that it may have been preserved in tho extreme west of the Aryan migrations, in the very name of Ireland. "

( Lectures on the science of language.
vol. 1. P. P, 273-84, )

**निक्स्** ( Nyx ), आणि **सूर्याचें हिलिॲस्** ( Helios ), असें रूपान्तर झालें आहे. **भग** शब्द **पुराण** इराणी भाषेंत **बग**, व **पुराण** स्ल्यॅव्हॅनिक भाषेंत **बोगू** ( Bogu ), असा झालेला आहे. **वरुणाचा ग्रीक** भाषेंत **युरेनस्** ( Uranus ), **वाताचा वोटन्** ( Wotan ), **वाक्**चा **व्हॉक्स्** ( Vox ), **मरुत्**चा **मार्स्** ( Mars ), **अयस्**चा **ल्याटिन** भाषेंत **एरिस** ( Aeris ), **पुराण जर्मन** भाषेंत **एर** ( Er ), अर्वाचीन **जर्मन** भाषेंत **ईझन्** ( Eisen ), **गॉथिक** भाषेंत **एस**, इंग्रजींत **आयर्न** ( Iron ), असा अपभ्रंश झाल्याचें नजरेस येतें. त्याचप्रमाणें, **पर्जन्य** शब्द **लेटिश** भाषेंत पर्कुनॅस ( Perkunas ), **पुराण प्रशियन** भाषेंत **परक्युनॉस्** ( Perkunos ), **पुराण स्ल्यॅव्हॅनिक** भाषेंत **पेरून** ( Perun ), **पोलिश** भाषेंत **पायोरन्** ( Piorun ), आणि **बोहीमियन** भाषेंत **पिरॉन्** ( Piraun ), या रूपान्तरानें आढळतो; व सदरहू भाषांत, या **पर्जन्य** शब्दाचा अर्थ **मेघगर्जित** अथवा **मेघदेवता** असा होतो.

ह्या **पर्जन्य** शब्दाचें स्थित्यन्तर, त्याचें स्थलान्तर, व अपभ्रंशानें झालेलें त्याचें रूपान्तर, हीं मनांत आणिलीं ह्मणजे, असें भासमान होतें कीं, जो वृष्टिवाचक शब्द सुमारें आठ दहा हजार वर्षांपूर्वीं आमच्या **आर्यांनीं भरत**-खंडांत मेघप्रसादार्थ वापरला होता, तोच शब्द कांहीं अपभ्रंशानें, परंतु तदर्थवाचकच, **यूरोपखंडांत** सुद्धां, केवळ गेल्या शतकापर्यंतही प्रचारांत होता. आणि ही गोष्ट

---

१ हा अपभ्रंश **स**काराच्या ऐवजीं **ह**कार, आणि **र**च्या ऐवजीं **ल** होऊन, झाला आहे.

जरी प्रथमदर्शनीं बिलकुल महत्वाची वाटत नाहीं, तरी त्या संबंधानें जरा सूक्ष्म विचार केला म्हणजे, गेलेला प्राचीनकाळ हल्लींच्या अर्वाचीनकाळीं देखील प्रत्यक्ष दृष्टिगोचर झाला, असें भासतें. इतकेंच नव्हें तर, तत्कालीन प्राचीन शब्द अर्वाचीन शब्दांप्रमाणेंच अजूनही प्रचारांत आहेत, असें अनुमान होऊन, सदरहू शब्द आर्यकुलोत्पन्न शाखांतच वापरते असल्यामुळें, ते सुप्रसिद्ध पुराण आर्यलोक पूर्वनिवासस्थानांतच जणु काय पुनश्च अवतरून देशान्तरीं गेले, असें वाटतें.

आशियाखंडाच्या उत्तरेस, व अक्षया नदीच्या पलीकडे सिथियन भाषेंत, " अश्व " शब्दाचा " अस्प " असा अपभ्रंश होऊन, " स्वर्गाचें " " स्पर्ग " असें रूपान्तर झालें आहे; आणि " पती " चें " पिथिस " बनलें आहे.

आफ्रिकाखंडांतील आर्यांच्या वसाहती,

आतां, आपण क्षणभर आफ्रिकाखंडाकडे आपली दृष्टि फेकूं, आणि तेथें अनेक आर्य शब्दांचें तीव्र तेज कितीसें फांकलें आहे, हें पाहूं.

यूरोपखंडापेक्षांही आफ्रिकाखंडांत आमच्या वसाहती फार लवकर गेल्या असल्याचें दिसतें. कारण, भरतखंडांत, म्हणजे आमच्या जन्मभूमींत, आर्य पूर्वजांनीं चोहों दिशांनीं आपलें राज्य विसृत केल्यावर, त्यांचे बाहू स्फुरण पावूं लागले. त्यामुळें, त्यांचें साहस सहजींच वाढून, ते सिंधु नदीच्या मुखानें हिन्दी महासागरांत उतरले; आणि तेथून, त्यांनीं आपलीं जहाजें पूर्व, दक्षिण, व पश्चिम दिशेकडे हांकारलीं. अर्थात्, कित्येक सुमात्रा, जाव्हा, इत्यादि ठिकाणीं[१]

१ भारतीय सामाज्य. पूर्वार्ध. पु. ६ वें. भाग ३७ वा पहा.

पूर्वेस गेले, व तेथें त्यांनीं आपलें राज्य चालविलें. कांहीं दक्षिण दिशेनें मॉरिशियस आणि आफ्रिकाखंडाच्या पूर्व किनाऱ्यावर उतरले, व तेथें त्यांनीं आपली वसाहत केली. आणि कित्येकांनीं आपला मोरचा पश्चिमेकडे फिरवून, ते तांबड्या समुद्रांत शिरले. इतकेंच नव्हें तर, मिसर (ईजिप्त) देशांत जाऊन, तेथें त्यांनीं आर्यांचें साम्राज्यही स्थापिलें.

व तेथें झालेलें संस्कृत शब्दांचें रूपान्तर.

असो. ईजिप्त देशाला प्राचीनकाळीं मिसर देश म्हणत असून, मिसर हा मिश्र शब्दाचा केवळ अपभ्रंशच होय. मिश्र म्हणजे थोर किंवा, सद्गृहस्थ होय; व हा शब्द आर्य लोक आपणांस लावीत, आणि आपणांस आर्यमिश्रही म्हणवीत. अर्थात्, मिश्रलोकांनीं (म्हणजे आर्यांनीं) जिंकलेला देश तो मिश्र देश असून, मिश्र देशाचाच मिसर देश हा अपभ्रंश आहे, यांत तिळभरही शंका नाहीं.

मिश्र, मनु, व राम, यांचें स्थित्यन्तर.

मिश्र देशांत, मिनीस व रामास असे दोन मोठे बलाढ्य राजे प्राचीन काळीं होऊन गेले. पण हे देखील आमच्या आर्य पूर्वजांचेच वंशज असून, पौराणिक मिसर देशांत आमच्या आर्यांची वसाहत, त्यांचे वर्णाश्रम धर्म, आणि त्यांचीं पवित्र पुस्तकें, हीं सर्रास्त प्रचारांत असल्याचें अनेक प्रमाणांवरून व्यक्त होतें. फार तर काय सांगावें, पण मिनीस व रामास हीं केवळ मनू आणि राम यांचींच रूपान्तरें व अपभ्रष्ट झालेलीं नांवें होत, हें कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे.

१ Royal Asiatic Society. vol. XVI.

नीलचें नाईल.

नाइल हें देखील **नील** नदीचें विकृतरूप असून, हा आर्य शब्द असल्याविषयीं सुप्रसिद्धच आहे. तसेंच, आफ्रिकाखंडाच्या पूर्वेस जें मॉरिशियस् नांवाचें बेट आहे, त्याचें हें सांप्रतचें नांव केवळ **मारीच** शब्दाचा अपभ्रंश होऊनच झालेलें आहे; ह्या बेटावर, पूर्वी **मारीच** नांवाचा राक्षस राहत असे, व त्यावरूनच त्या बेटाला **मारीचद्वीप** अशी संज्ञा पडली.

मारीचचें मॉरिशियस.

एतद्विषयक कथानक असें आहे कीं, **विश्वामित्र ऋषि** यज्ञ करीत असतां, त्याला ह्या व दुसऱ्या अनेक राक्षसांनीं विघ्नें केलीं. त्यावेळीं, रामानें त्याच्याशीं युद्ध करून, त्याला जेरीस आणिलें. इतकेंच नव्हें तर, त्याच्याबरोबर शरसंधान रचून, **रामानें** त्याजवर बाणाचा तीव्र आघातही केला. त्यामुळें, **रामाचा** बाण मारीचाला लागून, तो समुद्रांत जाऊन ह्या बेटावर पडला. पुढें मारीचानें हें बेट वसविलें, आणि प्रसंगानुसार हा वृत्तान्त त्यानें **रावणास** देखील कळविला. तो म्हणाला.[१]

**आगतोहमथ हन्तुमुद्यतो**
**मांविलोक्य शरमेकमाक्षिपत् । ( रामः )**
**तेनविद्धहृदयोहमुद्भ्रमन्**
**राक्षसेन्द्र पतितोस्मिसागरे ॥ १**

सिध्धींचें एथिओपियन.

आफ्रिकेंतील लोक काळेकभिन्न, आरक्तनेत्र, व उग्र असल्याकारणानें, आम्ही भारतीय ( म्हणजे हिन्दी ) लोक, त्यांस सिध्धी म्हणतों, हें सर्वांसच महशूर

१ भारतीय साम्राज्य. पु. ३ रें. भाग १० वा. पान ११८ पहा.

आहे. हा शब्द संस्कृत ( इन्ध = जळणें, पेटणें, या धातू ) पासून झाला असून, त्याचा अर्थ उग्र, किंवा रखरखीत दिसणारे, अथवा आरक्त नेत्राचे, असा समजावयाचा. ह्या सिध्धी शब्दापासूनच एथिओपिन शब्द बनला, आणि तो यूरोपखंडांत प्रचारांत आला. त्यामुळें, तिकडे सिध्धीला एथिओपियन् अशी संज्ञा आहे, हें विशेष रीतीनें सांगावयास नको.

आफ्रिकेंतील आमच्या वसाहतींसंबंधीं पाश्चात्य मत.

ह्यावरून, आफ्रिका खंडांत आमची वसाहत पुष्कळच प्राचीन असल्याचें दिसतें. तेथें आमच्या आर्य पूर्वजांचा विजयध्वज चोहोंकडे फडकूं लागल्यावर, त्यांचा दरारा सर्वत्र बसला; त्यांच्या संस्था इतस्ततः चमकूं लागल्या; त्यांच्या ( संस्कृत ) भाषेचा फैलाव होत चालला; त्यांच्या वीरवंशजांचें तेज कालान्तरानें असह्य झालें; व पुढें तेथेंच मनूनें आपलें राज्यही स्थापिलें. अर्थात्, हा मनु सुप्रसिद्ध स्मृतिकार नव्हे, हें उघड होय.

ह्या संबंधानें कर्झन्चा लेख विशेष महत्वाचा असल्यानें त्यांतील अवश्य तें अवतरण, वाचकाच्या सोईसाठीं, येथें देतों. तो म्हणतोः—

" The Menes of the Egyptians and Manu of the Hindus refer to an historical personage—an Aryan chief—*who first invaded and conquered* Egypt—*from* India; and I think this event is the *earliest* well-defined instance of the migrations of the Aryans west-ward, which I have above noticed." * * *

---

[१] मॉक्समुलर. ( भाषाशास्त्रविषयक व्याख्यानें. भाग २ रा. पान ९ पहा. नवी आवृत्ति. इ. स. १८८० ).

" The name of Ramas borne by several kings of Egypt *is certainly the* Sanskrit *Ráma*, a genuine Hindu appelation; but these kings must not be confounded with the three celebrated Ramas of the Hindus, any more than our own Henries with the Henries of France; nor must Menes be identified with the snpposed author of the Institutes, but is a *distinct personage, though bearing the same name*, and *of the same race as the Hindus themselves.* My own opinion is that the Egyptians were originally Non-Vedic Aryans and Schismatics. Their Schism from the established religious system of the latter took place long prior to the succession of Buddha from the same. "

( J. R. A. Society. vol. XVI. 1854. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता ).

---

# भाग पांचवा.

## भाषाशास्त्राच्या संबंधानें आमच्या आर्यपूर्वजांचे प्राक्कालीन परिश्रम, व पौरस्त्य प्रयत्न.

भाषाशास्त्रासंबंधीं आमच्या आर्यपूर्वजांचे परिश्रम.

मागील भागांत शब्दांची व्युत्पत्ति, त्यांचें स्थलान्तर, व त्यांचें रूपान्तर, यांविषयींची अवश्य ती माहिती दिली. सबब, प्रस्तुत भागांत, भाषेच्या संबंधानें अथवा भाषाशास्त्रविषयक, आमच्या पूर्वजांनीं कोणत्या प्रकारचे कसे परिश्रम केले, आणि त्या कामांत त्यांना कितीसें यश आलें, याबद्दलचें तपशिलवार विवेचन करण्याचें योजिलें आहे.

भाषाशास्त्राच्या विवेचनांत, मुख्यत्वेंकरून तीन गोष्टींचा अन्तर्भाव होतो. १ व्याकरण, २ कोशरचना, आणि ३ साहित्य. पहिल्यांत, अर्थाविष्करण, वाक्यावबोध, व शब्दव्युत्पत्तिमीमांसा, इत्यादींचा तपशील असतो. दुसऱ्यांत, शब्दसंग्रहासंबंधीं वृत्तान्त येतो. आणि तिसऱ्यांत, छन्द, काव्य, व अलंकार, वगैरेचें वर्णन असतें. यासाठीं, त्या सर्वांचा आपण क्रमशः विचार करूं.

## व्याकरण, अथवा शब्दव्युत्पत्तिमीमांसा.

भाषानिरूपणार्थ पहिला प्रयत्न ब्राह्मणें.

आतां, शब्दांचें विवरण, अथवा वाक्याचें निरूपण, किंवा अर्थाचें स्पष्टीकरण, इत्यादि संबधानें आमच्या आर्य पूर्वजांचा पहिला प्रयत्न म्हटला म्हणजे निःसंशय **ब्राह्मणेंच** होत. आणि ह्या ब्राह्मणांचा मूळ व मुख्य हेतु काय असावा, याजवर आपण चांगलें लक्ष पुरविलें, तर आपल्यास असें दिसून येईल कीं, संहितेंतील यज्ञविषयक गूढ ऋचांचा योग्य अर्थ सर्वांस समजावा, व यज्ञक्रिया बरोबर व्हाव्या इतकाच होता, यांत बिलकुल संशय नाहीं. कारण, यज्ञविधीच्या संबंधानें, भिन्न भिन्न ऋषींचीं निरनिराळीं मतें पडल्यामुळें, अमुक मत खरें आहे, किंवा अमुक ऋचेचा अर्थ अमुक तऱ्हेनें केला पाहिजे, अथवा एकंदर तात्पर्यार्थ अमुक रीतीनेंच समजला पाहिजे, असें ब्राह्मणांत सांगितलें असल्याचें तदवलोकनानें चांगलें व्यक्त होतें. अर्थात्, यज्ञ व त्यांचा विधि, आणि मंत्र व तदुक्त क्रिया, यांची एकवाक्यता अमुक प्रकारें होते; अथवा, ती होण्यासाठीं त्यांचा अर्थ अमुक तऱ्हेनें केला पाहिजे; अगर त्यांची व्यंजकता अमुक रीतीचेंच विवरण केल्यानें होण्यासारखी आहे; इत्यादि विवेचन ब्राह्मणांत सांगितलें असून, ह्याच कारणासाठीं, त्यांस "व्याख्याविषयक आदिलेख[१]" असें ह्मणावें लागतें.

---

१ ह्यासंबंधानें रॉथ म्हणतोः—"The *oldest attempts at interpretation* seem to be contained in *Bráhmans*, in collections of passages ( *nigama* ), in collections of words ( *nighantu* ), and in explanations ( *nirukta* ).* * *

( पुढें चालू. )

ब्राह्मणानन्तर, शब्दमीमांसाविषयक असा मुख्य आणि महत्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे, प्रातिशाख्य होय. ह्याचा प्रधानहेतु वेदाक्षराचें शुद्धोच्चारण, पदाध्ययन, संधिनियमन, आणि यथार्थ स्वररक्षण, इतकाच असावा, असें स्पष्ट दिसतें. सर्व प्रातिशाख्यांत, ऋग्वेदाचें प्रातिशाख्य पुराणतम आहे. सबब, त्यांतील अवश्य तें अवतरण येथें देतों. म्हणजे, त्यावरूनच त्यांतील विषयाचें दिग्दर्शन सहजीं होईल.

तदनंतर प्रातिशाख्यें.

गुरुत्वं लघुता साम्यं ऱ्हस्वदीर्घप्लुतानि च ।
लोपागमविकारश्च प्रकृतिर्विक्रमः क्रमः ॥ ५ ॥
स्वरितोदात्तनीचत्वं श्वासो नादस्तथोभयम् ।
एतत्सर्वं च विज्ञेयं च्छांदोभाषामधीयता ॥ ६ ॥

( ऋग्वेदप्रातिशाख्यसूत्र. )

हल्लीं उपलब्ध अशीं चारच प्रातिशाख्यें आहेत. १ ऋग्वेदांतील शाकल शाखेचें प्रातिशाख्य; हें शौनकानें केलें आहे. २ कृष्णयजुर्वेदांतील तैत्तिरीय शाखेचें प्रातिशाख्य. ३ शुक्लयजुर्वेदांतील वाजसनेयि गोत्रापैकीं माध्यंदिन शाखेचें प्रातिशाख्य; ह्याला वाजसनेयि प्रातिशाख्य देखील म्हणतात; व तें सुप्रसिद्ध वार्तिककार जो का-

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

तसेंच वेबरही असें लिहितो कीं :—We thus find in them ( *Brahmans* ) the oldest rituals we have, *the oldest linguistie explanations*, the oldest traditional narratives, and the oldest philosophical speculations."

( History of Sanskrit Literature. P. 12 ).

त्यायन त्यानें केलें असल्याविषयीं कल्पना आहे. ४ साम-वेदाचें प्रातिशाख्य; ह्याला ऋक्तंत्र व्याकरण असें नामधेय आहे. आणि ५ अथर्ववेदप्रातिशाख्य; ह्यालाच शौनकीया चातुराध्यायिका अशी संज्ञा आहे.

प्रातिशाख्य म्हणजे वेदांचें व्याकरणच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि त्यावरून, भाषाविषयक अन्वेषण, वेदमंत्रांचें सत्यावबोधन, शब्दांचा अर्थ, त्यांची मीमांसा, व त्यांची व्युत्पत्ति, इत्यादि संबंधानें फार प्राचीकाळींसुद्धां आमच्या आर्यपूर्वजांत विलक्षण जिज्ञासा उत्पन्न होऊन, त्यांचें कुतूहल बरेंच जागृत झाल्याचें भासमान होतें. कारण, प्रातिशाख्यासारख्या केवळ स्वतंत्र ग्रंथांतच ह्या बाबतींचें निरुपण आहे असें नाहीं. तर, क्वचित् प्रसंगीं ब्राह्मणांत देखील शब्दव्युत्पत्तीचा अंकुर स्वयमेव दृष्टीस पडतो, असें म्हटलें असतां चालेल.

कृष्णयजुर्वेदांतील ऐन्द्रवायवग्रहब्राह्मणांत, एके ठिकाणीं खालीं लिहिल्याप्रमाणें उल्लेख आहे.

"वाग्वै पराच्य व्याकृताऽवदत् । ते देवा इन्द्रमब्रुवन्निमांनो वाचं व्याकुर्विति । सोऽब्रवीद्वरं वृणै । मह्यंचैवैषवायवेसह गृह्याता इति । तस्मादैन्द्रवायवः सहगृह्यते । तामिन्द्रो मध्यतोवक्रम्य व्याकरोत् । तस्मादियं व्याकृता वागुच्यते" इति । (६. ४.)

ह्यावरून, वाचेची मीमांसा, तिची व्युत्पत्ति, तिचें व्याकरण, आणि तिचें स्पष्टीकरण, हीं येथें कशा रीतीनें

---

१ हें बर्नेलनें इ. स. १८७९ सालीं मंगलोर येथें छापविलें होतें.

व्यक्त होतात, हें वाचकाच्या लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे.

प्रातिशाख्याचा दुसरा मुख्य हेतु म्हटला म्हणजे, पदांवरून संहिता तयार करण्याचा असून, त्यामुळेंच त्याचें अध्ययन करण्यांत विशेष महत्व मानीत. ऋक्प्रातिशाख्यावर उअटाची उत्तम टीका आहे. कृष्णयजुर्वेदांतील प्रातिशाख्यसूत्रांत, आत्रेय, कौंडिन्य, भारद्वाज, वाल्मीकि, आग्निवेश्य, आग्निवेश्यायन, पौष्करसादि, इत्यादि सुमारें वीस वैय्याकरणांचीं नांवें दिलीं आहेत. त्यावरून, त्यावेळीं भाषाशास्त्राचें अध्ययन फार झपाट्यानें चालू होतें, असें दिसतें. शिवाय, शुक्लयजुर्वेदांतील प्रातिशाख्यांत सुद्धां, शाकटायन, शाकल्य, गार्ग्य, काश्यप, दाल्भ्य, जातुकर्ण्य, शौनक, औपशिवि, काण्व, आणि माध्यंदिन, यांचीं नांवें मधून मधून चमकतात.

शुक्ल यजुर्वेद-प्रातिशाख्याच्या पहिल्या अध्यायांत, संज्ञा व परिभाषा, यासंबंधीं विवेचन असून, दुसऱ्या अध्यायांत स्वराबद्दलचें विवेचन आहे. तिसरा, चौथा, आणि पांचवा, यांत संस्कार विवेचन आहे; सहावा व सातवा क्रियापदांवरील स्वरासंबंधीं आहे; आणि आठव्यांत स्वाध्यायाविषयींचे नियम सांगितले आहेत.

अथर्व वेदाच्या प्रातिशाख्याला शौनकीयाचतुराध्यायिका असें नामधेय असल्याचें आह्मीं पूर्वी सांगितलेंच आहे. ह्या प्रातिशाख्यांत, विशेषत: व्याकरणविचार आहे, व त्यांत शाकटायन वगैरे अनेक वैय्याकरणांचीं नांवें दृग्गोचर होतात.

असो, प्रातिशाख्यानन्तर शब्दमीमांसाविषयक असा आर्यांचा दुसरा अतिप्राचीन व महत्वाचा ग्रंथ निघंटु होय. ह्याचा मूळ-

निघंटु.

इतिहास जरा ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. सबब, त्याची थोडीशी हकीकत येथें देतों.

आमचे वेदकालीन ऋषी मोठे शीघ्र कवी असून, यज्ञयागादि क्रियांत तर ते फारच तत्पर असत. त्यामुळें, ते स्वत: ऋचा बनवीत, आणि त्यांत सांगितल्याप्रमाणें ईशस्तवन करीत. इतकेंच नव्हें तर, ते नानाविध मंत्रही रचीत, व त्याप्रमाणें भिन्नभिन्न देवतांस निरनिराळे हविर्भाग देत. अर्थात्, ते जीं जीं कर्मे करीत, अगर जीं जीं वचनें बोलत, अथवा जे जे शब्द उच्चारीत, ते ते सर्व समजून, आणि त्यांचा अर्थ ध्यानांत आणूनच एकंदर व्यवस्था लागे. त्याकारणानें, वाचा व क्रिया, बोलणें आणि चालणें, शब्द व अर्थ, यांत केव्हांही विपर्यास होण्याचा संभवच नसे.

अशा प्रकारें, ह्या आदिकवींच्या कवनस्फूर्तीचा झरा जोंपर्यंत एकसारखा वाहत होता; जों पावेतों हें कर्मकांड अव्याहत चालत असे; जावत्कालपर्यंत ही

वेददुर्बोधत्वामुळें त्याची उत्पत्ति.

यज्ञपरंपरा अबाधित होती; जोंवर ह्या सर्वांचें ऐतीह्य समाजाच्या हृत्पटीकेवर बिंबलेलें होतें; आणि जोंपर्यंत तत्कालीन संप्रदाय पूर्णत्वानें अस्तित्वात व प्रचारांत होता; तोंपर्यंत शब्दाचा अर्थ, वाक्याचा हेतु, आणि मंत्राचें इंगित समजण्यासंबंधानें कोणत्याही तऱ्हेची अडचणच पडत नसे, व त्याकारणानें सर्व क्रिया अगदीं सुरळीतच चालत.

पुढें, हजारों वर्षे लोटल्यावर, नवीन पिढीला त्या प्राक्कालीन वेदऋचांचें दुर्बोधत्व भासूं लागलें. तेव्हां, उघडच, मुखानें उच्चारलेले मंत्र, आणि हातांनीं घडलेली यज्ञक्रिया, ह्यांत कांहीं तरी मेळ आहे कीं नाहीं, याविषयीं आमच्या तत्कालीन पूर्वजांचें मन कालान्तरानें सहजींच साशंक होऊं लागलें. त्यामुळें, मूळमंत्रांच्या अर्थाचें अवबोधन व्हावें एतदर्थ, त्यांनीं वैयाकरण, नैयायिक, तत्ववेत्ते, शास्त्री, आणि पंडित, यांजकडे हें महत्वाचें काम सोंपविण्याची योजना केली; व त्यांजकडून, अनेक पर्यायशब्दांचा एक ग्रंथ तयार करविला. तदनन्तर, हे तुल्यार्थशब्द एके ठिकाणीं ग्रथित होऊन, त्यांचा एक कोशच बनल्याकारणानें, त्याला निग्रंथु अशी संज्ञा पडली. पुढें, ह्याचाच निघंटु असा अपभ्रंश झाला, आणि ज्या विद्वज्जनांनीं हा कोश तयार केला, त्यांजला नैघंटुक ह्मणूं लागले.

पूर्वींचे निघंटुकार.

हे नैघंटुक किंवा निघंटुकार बरेच होऊन गेले असावे, असें दिसतें. कारण, यास्कांनीं देखील, वेदार्थप्रकाशक ह्मणून, सुमारें सतराजणांचीं नांवें दिलीं आहेत. हीं खालीं लिहिल्याप्रमाणें होत:—

१ अग्रायण, २ औदुंबरायण, ३ और्णनाभ, ४ कात्थक्य, ५ कौत्स, ६ क्रौष्टुकि, ७ गार्ग्य, ८ गालव, ९ चर्मशिरस्, १० तैटीकि, ११ वार्ष्यायणि, १२ शतबलाक्ष, १३ मौद्गल्य, १४ शाकटायन, १५ शाकपूणि, १६ शाकल्य, आणि १७ स्थौलाष्ठीवि.

ह्या निघंटूचा एक ग्रंथ सांप्रत उपलब्ध असून, त्याचे

निघंटूचे प्रकार.

पांच अध्याय आहेत. पहिल्या तीन अध्यायांत नैगमपदांचें, म्हणजे वेदांतील २७८ निरनिराळ्या शब्दांचें वर्गीकरण आहे; आणि त्यांत पर्याय शब्द सुद्धां दिले आहेत. चौथ्या अध्यायांत वेदांतील कठीण शब्दांची नामावळी आहे; व पांचव्यात भिन्न भिन्न देवताची नावें सांगून, त्यांचें वर्गीकरण केलें आहे. याखेरीज अथर्वसंहितेचा निघंटु आणि शुक्लयजुर्वेदांचें निगमपरिशिष्ट, हे ग्रंथही उपलब्ध असल्याचें कळतें.

निरुक्त.

आह्मीं पूर्वीं सांगितलेंच आहे, व ते वाचकांच्या ध्यानांतही असेल कीं, आमचे पुराण वेद जसजसे जुने होत चालले, तसतशी त्यांची भाषा कठिणशी वाटूं लागली; आणि त्यांजला सुलभता प्राप्त व्हावी म्हणून, निघंटुसारखे ग्रंथ मुद्दाम पंडितांकडून तयार करविले. परंतु, कालान्तरानें असा कांहीं योग आला कीं, वेदांचें दुर्बोधत्व नाहींसें करण्यासाठीं ज्या निघंटूची कल्पना झाली, त्यांचाच अर्थ सामान्य जनांस देखील समजेनासा होऊन, अर्थबोधाच्या संबंधानें मोठी पंचाईत पडूं लागली. तेव्हां अर्थातूच, टीकाकारांच्या साहाय्याची अपेक्षा पुनश्च दिसून आली. परंतु, यास्कानें हें महत्वाचें कृत्य मोठ्या नेटानें हातीं घेऊन, ती सर्वांशीं भासमान होत असलेली अडचण बऱ्याच प्रमाणानें दूर केली. सबब, ह्या भाषातत्वज्ञाचे केवळ कृतज्ञतापूर्वक आपण फारच आभार मानले पाहिजेत.

त्याचे कर्ते यास्क.

ही यास्काची कृति ह्मटली ह्मणजे, त्याचें सुप्रसिद्ध निरुक्त होय. ह्याचे दोन भाग पाडलेले आहेत. १ पूर्वषट्क, आणि

२ उत्तरषट्क. पूर्वषट्काचे सहा अध्याय असून, उत्तर षट्काचे आठ अध्याय केलेले आहेत; आणि ह्या सर्वांची वेदांगांतच गणना होते. पूर्वार्धाच्या पहिल्या अध्यायांत प्रस्तावना व उपोद्घातादाखल सामान्य विवेचन आहे. इतकेंच नव्हें तर, तितक्याही पुरातनकाळीं, भाषाशास्त्रात्मक व शब्दव्युत्पत्तिविषयक अशी मुद्देसूत आणि महत्वाची मीमांसा देखील या समवेतच दृग्गोचर होते. शिवाय, ह्यांतच व्याकरणासंबंधींही अवश्य तें दिग्दर्शन केलें आहे. दुसऱ्या आणि तिसऱ्या अध्यायांत निघंटूंत दिलेल्या वैदिक शब्दांचें विवरण केलें आहे. परंतु, ह्यांत अपूर्तता असल्याकारणानें, व्यक्त होत असलेली कमतरता दुर्गानें आणखी ज्यास्त व्याख्या देऊन भरून काढली आहे; व चवथ्या, पांचव्या, आणि सहाव्या अध्यायांत नैगमांचें, म्हणजे वेदांतील शब्दांचें विवेचन आहे. आतां, उत्तरार्धांतील पहिल्या सहा अध्यायांत, वेदांतील अनेक देवतांची माहिती दिली आहे. मात्र, सातवा आणि आठवा अध्याय प्रस्तुत विषयाला धरून असल्याचें फारसे दिसत नाहीं.

निरुक्ताचें महत्व.

तथापि, एकंदरीनें पाहतां, व भाषाशास्त्र, शब्दव्युत्पत्ति, पौराणिक ऐतीह्य, आणि दैवतपारंपर्य, इत्यादि दृष्टीनें विचार करतां, हें निरुक्त खरोखर फारच महत्वाचें व विशेष उपयोगाचें आहे, यांत लेशभरही शंका नाहीं. कारण, तें आम्हांला आमच्या पूर्वजांचें बुद्धिप्रागल्भ्य दाखवितें; त्यांची तीव्रमति व्यक्त करतें; आणि आम्हांला सुद्धां त्याच प्रकारचें वळण लावून देतें. इतकेंच नव्हें तर, आमच्या सारखीं विशेष

पुरातन म्हणून मानलेलीं जीं इतर पौरस्त्य व पाश्चात्य राष्ट्रें, तीं तत्कालीं आमच्या तुलनेनें किती बाल्यावस्थेंतील, कशीं मागासलेलीं, आणि मूढ दशेंत होतीं, याचीही कल्पना करण्याला त्यावरूनच चांगलें साधन मिळतें.

त्याची इतर देशाशीं तुलना, व त्यांजवर त्याची सरशी.

युरोप व अमेरिकाखंडांतील पाश्चात्य राष्ट्रें ग्रीस[1] देशाच्या ज्ञानसंपत्तीबद्दल वारंवार पोंवाडे गातात; आणि आमच्या भरतखंडासंबंधीं ते केवळ अज्ञानांधकारांतच असल्यामुळें, ते आम्हांला रानटी समजून, त्या देशालामात्र सुधारणेच्या अगदीं उच्चशिखरावर नेऊन ठेवितात. परंतु, भारतीय ज्ञानाचें तीव्रतेज एकदां कां त्यांजला भासमान झालें, म्हणजे त्याच्याच प्रभेंत ते अहोरात्र फिरावयाचा यत्न करितात; आणि तें तेज सहन झाल्यानंतर, ह्या दिव्य, अफाट, व अगाध ज्ञानोदधींतच ते मनसोक्त बुडी मारून राहतात.

त्याचें कारण.

याप्रमाणें, भारतीयज्ञानामृताची अपूर्व रुचि आणि मिठासपणा कोणाच्याही जिव्हेला एकदां लागल्यावर, बाकीचे सर्व रस

---

१. ह्या नांवाजलेल्या ग्रीक लोकांबद्दल, सुप्रसिद्ध पाश्चात्य इतिहासकार जो ऑक्ले, त्याचें कसें मत आहे, ते वाचकाच्या सोईसाठीं येथें देतों. तो म्हणतो,

"*They* ( the Easterns ) *first communicated it* (knowledge) *to the Greeks* ( a vain, conceited people, *who never penetrated the depths of Oriental wisdom* ); *from whom the Romans had theirs.*"

( Ockley's History of the Saracens. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

त्याला केवळ नीरस, निःसत्व, व बेचव लागतात. फार तर काय सांगावें पण, आमच्या उज्ज्वलित ज्ञानभांडारानें पाश्चात्य दर्पास देखील आळा घातला जाऊन, तो आपो-आप मावळतो. त्यामुळेंच, त्यांच्या डोळ्यांवरील अज्ञानाचें पटलही जातें. त्या योगानेंच त्यांची दृष्टि देखील विसृत होते. त्यांचा ज्ञानौघ सुद्धां त्याच कारणानें वाढीस लागतो. आणि आर्यप्रमाणानें[1] इतर सर्व राष्ट्रांचें ज्ञानही त्यांजला केवळ भातुकलीसारखेंच वाटतें.

तद्विषयक पाश्चात्य मत.

ह्या संबंधानें पौरस्त्यांनीं, आणि त्यांतही विशेषतः आम्हीं भारतीयांनीं विशेष गौरवानें लिहावें, यांत तर कांहींच आश्चर्य नाहीं. परंतु, पाश्चात्य विद्वानांपैकीं, फार नांवजलेले पंडित देखील आमच्या प्रचंड वाङ्मयाची विलक्षण प्रशंसा व मोठी तारीफ करतात. एके

---

१ ह्यासंबंधानें मॉनियरविल्यम्स एके ठिकाणीं म्हणतोः—

"An *adequate idea* of the *luxuriance* of Sanskrit *literature can with difficulty be conveyed to Occidental Scholars.*"

( Indian Wisdom. P. 1 ).

"*In India, literature,* like the whole face of nature, *is on a gigantic scale.*" * * *

"*There is,* in fact, *an immensity of bulk about this* ( poetry ), *as about every other department of Sanskrit literature, which to a European Mind, accustomed to a more limited horizon, is absolutely bewildering.*"

( Indian Wisdom. P. 309 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

ठिकाणीं सर. विल्यम जोन्स[१] हा अगदीं निष्प्रांजलपणें असें लिहितो कीं, हिंदूंच्या ग्रंथसंपत्तीचें अवलोकन करून, त्यांतील कोणत्याही शाखेकडे आपण पाहिलें, म्हणजे ह्या भारतीय वाङ्मयाचा बिलकुल अन्तच नाहीं, अशी सहजींच कल्पना होते. कारण, ह्या भूतलावरील अत्युच्च पर्वत हिमाचलच असल्यामुळें, तो जसा आपलें डोकें सदैव वर करून इतर पर्वतसमुदायास केवळ वल्मीक किंवा लहान लहान वारूळाप्रमाणेंच मानतो, तद्वतच ह्या भरतखंडाबाहेरील यच्चावत् ग्रंथसमुदायाची स्थिति असून, अन्य देशांतील प्रचंड वाङ्मय म्हणजे इकडील ( भरतभूमींतील ) केवळ बालक्रीडाच होय.

आतां, पाश्चात्यांच्या अभिप्रायाप्रमाणें सर्व बाजूंनीं सुधारलेला असा जो ग्रीसदेश, आणि त्यांनीं रानटी म्हणून जगजाहीर केलेलें व ठरविलेलें असें जें आमचें भरतखंड, यांची परस्पर तुलना केली तर, आपणांस असें दिसून येईल कीं, भाषेच्या संबंधानें ग्रीसदेशांत श्रीगणेशायनमःच्या धड्याची सुरुवात देखील नव्हती, अशा वेळीं, भरतखंडांत शब्दव्युत्पत्तिचें विवेचन आणि भाषाशास्त्राचा ऊहापोह सरास्त चालला होता. आणि म्हणूनच, ती गोष्ट मॉक्समुलरसा-

१ तो म्हणतो,

"Wherever we direct our attention to Hindu *literature*, the notion of *infinity* presents itself, and surely the *longest life would not suffice for a single perusal of works, that rise and swell protuberant* like the Himalayas *above the bulkiest composition of every land beyond the Confines of India.*"

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

रख्या अनेक भाषाकोविदाला देखील कबूल करणें भाग पडलें. कारण, त्यानें प्राक्कालीन संस्कृतभाषेच्या इतिहासांत असें स्पष्टपणें लिहिलें आहे कीं,

" There are some *discussions* in the beginning of the Nirukta which *are of the highest interest with regard to Etymology. While in Greece the notions of one of her greatest thinkers,* as expressed in the Cratylus *represent the very infancy of Etymological science, the Brahmans of India had treated some of the vital problems of Etymology with the utmost sobriety.*

( Muller's Ancient Sanskrit Literature .)

निरुक्ताचें सामान्य विवेचन.

वाचकांच्या लक्षांत असेलच कीं, सामान्य जनास वेदाचा अर्थ सुलभ रीतीनें कळावा यासाठीं, निघंटु नांवाचा कोश तयार करण्यांत आला होता. यास्कांनीं सुद्धां ती गोष्ट कबूल करून, त्याचा उल्लेख त्यांनीं आपल्या निरुक्तांत केला आहे.

**समाम्नायः समाम्नातः सव्याख्यातव्यस्त-मिमंसमाम्नायं निघंटवइत्याचक्षते**[१]। (निरक्त. १.१.).

इतकेंच नव्हें तर, निरुक्ताचा हेतु देखील वेदांतील मंत्रांचा अर्थ चांगल्या प्रकारें व्यक्त करून त्यांचें दुर्बोधत्व नाहींसें व्हावें, इतकाच असल्याबद्दल त्याचें स्पष्ट वचन आहे.

---

१ पवित्र वेद एकत्र करून जी त्यांची व्याख्या झाली, तिला निघंटु अशी संज्ञा आहे, इतकाच सदरहू संहितेचा अर्थ होय.

निरुक्ताची अवश्यकता.

**अथापीदमन्तरेण मंत्रेष्वर्थप्रत्ययो न विद्यते । अर्थमप्रातियतो नात्यन्तं स्वरसंस्कारोद्देशः ।**

(१. १९. निरुक्त).

त्याचप्रयाणें, वेदार्थाचें अवबोधन होण्यासाठीं, **निरुक्ताची** खरी व मोठी अवश्यकता आहे, असें **सायणाचार्यांनींही** ऋग्वेदावरील भाष्यांतील प्रस्तावनेंत लिहिलें आहे.

**तस्माद् वेदार्थावबोधायोपयुक्तं निरुक्तम् ।**

भाषाशास्त्राच्यासंबंधानें त्याचा उपयोग

आतां, व्याकरण किंवा शब्दव्युत्पत्तीच्या संबंधानें **निरुक्ताचें** केवढें महत्व आहे, आणि **भाषाशास्त्राला** त्याचा किती उपयोग झाला आहे, हें वाचकाच्या लक्ष्यांत थोडक्यांत येण्यासाठीं, त्यांतील कित्येक उपयुक्त वेंचे येथें देतों.

वृत्रशब्दाचें विवेचन.

ऋग्वेदांत **वृत्र** शब्द हा वारंवार आढळत असून, त्याचा अर्थ भिन्नभिन्न शास्त्रज्ञ निरनिराळ्या प्रकारचा करीत असल्याविषयीं **यास्क** लिहितात. **वृत्र** म्हणजे मेघ असें **निरुक्तकार** समजतात. ऐतिहासिक किंवा इतिहासकार हे त्यालाच **असुर** व **त्वष्ट्रीचा** पुत्र मानतात. कांहींचें असें मत आहे कीं, मेघ म्हणजे जल व तेज यांचें संमिश्रण असून, त्यालाच दृष्टान्तानें आकाशांतील युद्ध, किंवा मेघ, अथवा वृत्राची लढाई, असें म्हटलें आहे. **मंत्र** आणि **ब्राह्मणवादी** हे वृत्ताला सर्प मानतात; व ह्यांच्या समजुतीप्रमाणें, हा सर्प जेव्हां लांबलचक पसरतो, तेव्हां

पाणी बंद झाल्यामुळें वृष्टि होत नाहीं; व त्याचा नाश झाल्यावरच वृष्टि होऊन पाणी पडूं लागतें.

तत्को वृत्रो मेघ इति नैरुक्तः। त्वाष्ट्रोऽसुरइत्यैतिहासिकाः। अपांच ज्योतिषश्च मिश्रीभावकर्मणो वर्षकर्मजायते तत्रोपमार्थेन युद्धवर्णाभवंति। आहिवत्तु खलुमंत्रवर्णा ब्राह्मणवादाश्च। विवृध्याशरीरस्य स्रोतांसि निवारयांश्चकार तस्मिन्हते प्रस्यन्दिर आपः।

(निरुक्त. २.१६).

प्रयाज व अनुयाज-यज्ञासंबंधानें मताभिन्नता.

प्रयाज आणि अनुयाज नांवाच्या यज्ञासंबंधानें देखील शास्त्रीयमत अशाच प्रकारें भिन्न असल्याचें निरुक्तकारांच्या लिहिण्यावरून कळून येतें. कारण, कोणी म्हणतात कीं, ते यज्ञ अग्नि देवतेसाठीं होते. कांहींचें मत असें आहे कीं, सदरहू यज्ञांची योजना छन्दस्‌देवते निमित्त असे. कित्येकांच्या अभिप्रायाप्रमाणें, हे यज्ञ ऋतु देवतेसाठीं करीत. कोणी असे मानतात कीं, ते प्राण देवतेकरितां होत असत. कांहींच्या मताप्रमाणें, ते आत्मा देवतेसाठीं होते. आणि खुद्द यास्कांचा अभिप्राय पाहिला तर, ते यज्ञ केवळ अग्निदेवते साठींच असल्याचें दिसतें.

अथकिं देवताः प्रयाजानुयाजाः। अग्नेया इत्येके। ....छन्दोदेवता इत्यपरम्।....ऋतुदेवता इत्यपरम्। प्राणादेवता इत्यपरम्।....अग्नेया इतितु स्थितिः।

( निरुक्त. उ. ष. २. २१. )

अश्विनी देवतांच्या बाबतींतसुद्धां अशाच प्रकारचा मत-

अश्विनी देवतांविषयीं अनेक मतें.

भेद व्यक्त होतो, आणि भिन्न भिन्न मीमांसकारांचे अगदीं निरनिराळे अभिप्राय पडतात. कारण, और्णवाभ म्हणतो कीं, अश्विनींचे अश्व ( घोडे ) असल्यामुळें, त्याजला तद्वाचकच नामधेय पडलें आहे. कित्येकांचें असें मत आहे कीं, अश्विनी म्हणजे द्यावापृथिवी होत. कांहींच्या म्हणण्याप्रमाणें त्यांजला दिवस व रात्र समजावयाचे. कोणी म्हणतात कीं, ते सूर्यचंद्र होत. आणि ऐतिहासिकांच्या मतें तर ते कोणी पुण्यशील राजेच असल्याचें दिसतें.

**अश्वैरश्विनावित्यौर्णवाभः । तत्कावश्विनो द्यावा पृथिव्यावित्येके । सूर्याचन्द्रमसावित्येके । राजानौ पुण्यकृतावित्यैतिहासिकाः ।** ( निरुक्त. उ. ष. ६. १ ).

वाचेचे प्रकार, व तत्संबंधीं अनेकांचा निरानिराळा अभिप्राय.

वाचा कशी उत्पन्न झाली, याविषयीं ऋग्वेदांत एके ठिकाणीं सांगितलें असून, त्याच ऋचेंत तिचे चार प्रकार असल्याबद्दल ही वर्णन आहे.

**चत्वारिवाक् परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा येमनीषिणः ॥ ४५ ॥**
( ऋ. वे. अ. २. अ ३. व २२. मं १. अ २२. सू. १६४)

ह्या चार वाचा कोणत्या, याविषयींची मीमांसा निरुक्तकारांनीं तपशिलवार केली आहे. सबब, ती ध्यानांत ठेवण्यासारखी असल्यामुळें, त्यांतील अवश्य तितकें अवतरण वाचकाच्या सोईसाठीं, येथें देतों.

**कतमानि तानि चत्वारि पदानि । ओंकारो महाव्याहृतयश्चेत्यार्षम् । नामाख्याते चोपसर्गनिपा-**

**ताश्चेति वैयाकरणाः । मंत्रकल्पो ब्राह्मणं चतुर्थी व्यावहारिकीति याज्ञिकाः । ऋचोयजूंषि सामानि चतुर्थी व्यावहारिकीति नैरुक्ताः । सर्पाणां वाग्वयसां-क्षुद्रस्य सरीसृपस्य चतुर्थी व्यावहारिकीत्येके । पशु-षुतूणवेषु मृगेष्वात्मनि चेत्यात्मप्रवादाः ।**

( निरुक्तः उ. ष. ७. ९. मागें पान ८२, ८३ पहा. )

असो. ह्या **निरुक्तावरून** असें स्पष्टपणें आणि उत्तम प्रकारें दिसून येतें कीं, **यास्काच्या-** वेळीं व त्याच्याही अगोदर, **भाषा-** शास्त्राची अभिरुचि आम्हां **भार-** तीयांस विशेषेंकरून लागली असून, आमचा भर आणि मनाचा ओघ, प्रायः **शब्दव्युत्पत्ति** व **व्याकरण,** यांजवरच फार असे. शिवाय, व्याकरण हें **भाषाशास्त्राचें** एक मुख्य आणि महत्वाचें अंग आहे, अशी देखील तत्कालीन विद्व-ज्जनांची समजूत होती, यांत तिळभर सुद्धां शंका नाहीं.

यास्काच्या वेळीं व त्याच्या अगोदर भाषेची अभिरुचि.

ह्याचें प्रत्यक्षप्रमाण पाहणें असल्यास, आपल्याला क्षणभर **निरुक्ताकडेच** वळून, आपली खात्री करून घेतली पाहिजे. कारण, त्यांत सुप्रासिद्ध निरुक्तकार **यास्क** हे असें म्हणतात कीं,

**तदिदं विद्यास्थानं व्याकरणस्य कात्स्न्यंस्वार्थ साधकंच**

( निरुक्त. १. १९ ).

आतां, आमचे हे अशाप्रकारचे भाषाविषयक शोध, शब्दव्युत्पत्तिसंबंधीं आमचे प्रगल्भ-विचार, आणि **व्याकरणाबद्दलची** आमची विलक्षण व नितान्त अभि-

त्यासंबंधानें पाश्चात्यमत.

रुचि, इत्यादि बाबतींत पाश्चात्य पंडित आणि अनेक भाषाकोविद यांचें कसें मत आहे तें पाहूं, व त्याचें विहंगमदृष्ट्या किंचित् निरीक्षण करूं. म्हणजे त्यावरून, आमच्या पूर्वजांनीं आपल्या इतिकर्तव्यतेची बजावणी किती अंशानें केली; ती करतांना, केवळ निरपेक्षबुद्धीनेंच त्यांनीं आपलें शरीर कसें कष्टविलें; आणि फक्त शास्त्रान्वेषणार्थच त्यांनीं आपला देह कशा तऱ्हेनें झिजविला; याचें सहजीं दिग्दर्शन होईल.

वेबर.

संस्कृत भाषेच्या इतिहासांत निरुक्ताचें विवेचन करतांना, वेबरनें असें म्हटलें आहे कीं, भाषाशास्त्रासंबंधीं हालचाल, व शब्दव्युत्पत्तिविषयक चळवळ, यास्काच्यावेळीं फारच होती. इतकेंच नव्हें तर, कौषीतकी ब्राह्मणांवरून देखील ह्या महत्वाच्या विषयाचा अभ्यास ब्राह्मण लोक मोठ्या उत्साहानें आणि प्रेमपूर्वक करीत, यांत संशय नाहीं.

( Weber's H. S. L. P.26. 1882. )

मॉक्समुलर.

मॉक्समुलर म्हणतो कीं, निरुक्तांतील कित्येक ठिकाणचें निरूपण व भाषाविषयक विवाद हे निःसंशय अतिमहत्वाचे असून, शब्दव्युत्पत्तीच्या कामांत त्यांचा फारच उपयोग आहे. आणि त्यावरूनच असें दिसतें कीं, ज्यावेळीं ग्रीसदेश अगदीं बाल्यावस्थेंत होता, व शब्दव्युत्पत्तिशास्त्राचा पहिला धडा देखील त्यानें घेतला नव्हता, त्यावेळीं, ह्याच भाषाशास्त्रविषयावर, भरतखंडांतील ब्राह्मण मोठ्या गांभीर्यानें आणि फारच विचारपूर्वक ऊहापोह करीत.

( Muller's Ancient Sanskrit Literature. )

मॉनियर विल्यम्स.

मॉनियर विल्यम्सनें एके ठिकाणीं[1] असें स्पष्टपणें लिहिलें आहे कीं, निरुक्तांत भाषाशास्त्रविषयासंबंधीं महत्वाच्या प्रश्नाचा विचार केला असून, हें निरुक्त म्हणजे वेदावरील पुराणतम व्याख्याच होय. आणि ह्याच कारणासाठीं, त्याला साहजिकच येवढें गुरुत्व आलें आहे.

बेन्फे, रॉथ, एलफिन्स्टन,

बेन्फेच्या लेखावरून[2] असें दिसतें कीं, व्याकरण व भाषाशास्त्रांत हिंदूंचा (भारतीयांचा) मतिप्रकर्ष विशेष असून, त्यांत त्यांचा हातखंडा आहे. आणि रॉथ तर असें प्रतिपादन करतो कीं, व्याकरणांत भारतीयांनीं ग्रीक

---

१ " The first ( chapter ) of the twelve is a kind of introduction, which contains some *interesting discussions* of *philological questions* and a sort of summary or sketch of grammar. "

" The value of the work consists in its being the *oldest extant commentary* on the Veda. When words are explained, Vedic passages are quoted in illustration, and the author often enters into curious etymological investigations which possess *great interest* from their *universally admitted antiquity*, but are difficult to understand from the extreme brevity and obscurity of their style. "

( Indian Wisdom. P. 168 ).

२ " The Indians with *their genius* for *grammar*, or *philology generally*. " * * *

( Article on India. Indian antiquities. P. 245 ).

लोकांवरही तान करून, आपलें वर्चस्व सर्वतोपरि स्थापिलें आहे[१]. आणखी दुसऱ्या अनेक विद्वानांचाही अशाच मासल्याचा अभिप्राय असून, संस्कृत भाषेचा प्रभाव, तिचें गौरव, व तिचें महत्व, इत्यादि गुण त्यांच्या लेखांवरूनें[२] उत्तम रीतीनें व्यक्त होतात.

हंटर व दादाभाई नवरोजींचा अभिप्राय.

---

१ " We can therefore, at least, boast, by way of compensation, on behalf of the Indians, that *they have far out-stripped the* Greeks *in the department of grammar.* "

( Introduction to Nirukta. P. III ).

भारतीयांनीं चालविलेलें हें जें व्याकरणाचें दीर्घ परिशीलन, त्यासंबधानें आणखी एका ठिकाणींही रॉथनें मोठ्या गौरवानें लिहिलें आहे. कारण, तो असें म्हणतो कीं,

" And it ( the Sacred book ) became the first problem to be solved by grammar, – a science *which was far more commonly studied,* and at an *earlier period attained a far higher stage, in India than in Greece.* "

( Roth's Intro. to Nirukta ).

२ सुप्रसिद्ध इतिहासकार एल्फिन्स्टन् म्हणतो:—

" The language *so highly commended* seems always to have received the attention it deserved. * * * Panini's works and those of his successors have established a system of grammar, *the most complete* that ever was employed in arranging the elements of human speech. "

( History of India P. 282 ).

डाक्टर हंटर असें लिहितो कीं,

" The science of language, indeed, had been re-

( पुढें चालू. )

अस्तु. यास्कानन्तर भाषाशास्त्र, शब्दव्युत्पत्ति, आणि व्याकरण, हे अत्यंत महत्वाचे विषय हातीं घेऊन त्यांचें परिशीलन करणारा, व त्यांच्या योग्यतेनुरूप सशास्त्र विवेचन करून त्यांची एकंदर व्यवस्था लावणारा, असा एक पाणिनिच होय. तथापि, पाणिनीनें ज्या प्रचंड ऋषीच्या ग्रंथाधारानें येवढा मोठा विभू रचला, त्याचा थोडाबहुत तरी वृतान्त देणें अगदीं अगत्याचें आहे. सबब, तत्संबंधीं अवश्य ती हकीगत येथें देतों.

हा ऋषि म्हटला म्हणजे शाकटायन[१] होय. हा मोठा

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

duced in India to *fundamental principles* at a time when the grammarians of the West *still treated it on the basis of accidental resemblances.* * * * The grammar of Panini stands *supreme among the grammars of the world* alike for its *precision of statement,* and for its *thorough analysis* of the *roots* of the language, and of the formative *principles of words*.......It stands forth as one of the *most splendid achievements* of human invention and industry."

( The Indian Empire. P. P. 100-101 ).

मि. दादाभाई नवरोजी असें लिहितात.

"The *achievements* of the Bràhmans *in grammatical analysis* which date from six centuries B.C., are still *unsurpassed by any nation.*"

( D. N. Speeches & Essays. P. 5 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

१ शाकल्य, गार्ग्य, काश्यप, गालव, आपिशली, शाकटायन,

( पुढें चालूं. )

शाकटायनाची हकीकत.

वैयाकरण असून, ह्याचें नांव पूर्वी लिहिल्याप्रमाणें ऋग्वेदाच्या प्रातिशाख्य सूत्रांत दृग्गोचर होतें. तसेंच शौनकीयाचतुरध्यायिका नांवाचें जें अथर्वणवेदाचें प्रातिशाख्य सूत्र[1] आहे त्यांत, व यास्काच्या निरुक्तांत, आणि पाणिनींत देखील तें आढळून येतें. त्यावरून, हा ऋषि त्यांच्याही पूर्वींचा व पुष्कळ पुरातन असावा, असें मानणें भाग पडतें.

त्याचा ग्रंथ.

यक्षवर्म्याच्या लेखावरून, शाकटायन हा जैन असल्याचें दिसतें. कारण, त्यानें ह्याला महाश्रमण संघाधिपति, असें म्हटलें आहे. ह्याचा उपलब्ध व सर्वांस माहित असलेला असा ग्रंथ म्हटला म्हणजे शब्दानुशासन हा असून, त्याजवर सदरहू यक्षवर्म्यानेंच चिंतामणिवृत्ति नांवाची टीका केली असल्याचें आढळून येतें. ह्या शब्दानुशासनांत शब्दव्युत्पत्ति संबंधींचें विवेचन फार उपयुक्त असल्यामुळें तें विशेष महत्वाचें आहे.

पाणिनि.

याप्रमाणें, शाकटायनाची अवश्य तितकी हकीकत वाचकापुढें सादर केल्यामुळें, आतां पाणिनीकडे वळतों. हा खरोखर प्र-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

भारद्वाज, आश्वलायन, स्फोटायन, व चक्रवर्मा, ह्यांस पाणिनी आधारभूत मानतो. तथापि, त्यांतही शाकटायन हा अग्रेसर असल्याचें दिसतें.

[1] ह्याखेरीज, अथर्ववेदाचें आणखी एक प्रातिशाख्य बुल्हरला उपलब्ध झालें आहे, असें म्हणतात.

चंड बुद्धीचा मनुष्य असल्याकारणानें, त्याच्या मतिप्रकर्षाची जेवढी म्हणून तारीफ करावी तेवढी थोडीच. कारण, सर्व भाषांचें मूळ व्याकरणच असल्यानें, एकंदर शब्दांचें शास्त्रीय विवेचन, त्यांची व्युत्पत्ति, त्यांचें नियमन, व तद्विषयक संक्षिप्त विवरण, इत्यादि त्यानें इतक्या पूर्णत्वानें आणि व्यापकतेनें केलें आहे कीं, त्याबद्दलचें कुतूहल, ह्या प्रस्तुतच्या एकोणीसाव्या शतकांत ही, यच्चावत् पौरस्त्यांस व पाश्चात्यांस वाटून, तें साश्चर्य तोंडांत बोटेंच घालतात.

अष्टाध्यायी, व तिचें महत्व.

ह्या जगद्विख्यात पाणिनीनें आपल्या अष्टाध्यायींत संस्कृत भाषेची अमूल्यसेवा फारच मार्मिकपणानें आणि आश्चर्यकारकरीतीनें केली आहे. इतकेंच नव्हें तर, ह्या अपूर्व भाषेचें नियमन त्यानें अवघ्या ३९८३ सूत्रांत करून, अज्ञानजन्य मतिभ्रमाचें सर्वथैव निरसन करण्याचा जणु काय विडाच उचलल्याप्रमाणें, त्यानें हातीं घेतलेलें काम पूर्णपणें शेवटास नेलें आहे.

**येनधौता गिरः पुंसां विमलैः शब्दवारिभिः ।**
**तमश्चाज्ञानजं भिन्नं तस्मै पाणिनयेनमः ॥**

पाणिनीच्या अष्टाध्यायी रूपी अत्यन्त मनोहर, विचित्र, विस्तीर्ण, आणि भव्य मंदिराविषयीं, पृथिवीवरील प्रत्येक राष्ट्राचा अभिप्राय केवळ सानुकूलच असणें, अगदीं साहजीक आहे. कारण, संपूर्ण माहितीनें भरलेला असा व्याकरणविषयक ग्रंथ पाणिनीच्या अष्टाध्यायी खेरीज, अखिल जगत्तलावर कोठेंही नाहीं. शिवाय, शब्दव्युत्पत्तीच्या संबंधानें तर, हींत अगदीं अप्रतीम व साद्यन्त विवेचन केलेलें दृष्टीस पडतें. धातुव्य-

वच्छेद फारच मार्मिकपणानें आणि व्यापकतेनें केल्याचें आढळून येतें. लघुविवेचनांत, पाणिनीचा हातखंडाच असल्याचें भासतें. भाषामूलतत्वाच्या विवेचनपद्धतींत, त्याचा कोणी सुद्धां हात धरणारा नसल्याचें दिसतें. आणि विषयोपन्यासांत, व अथपासून इतिपर्यंत विसृत ऊहापोह करण्यांत, त्याची बरोबरी करणारा देखील कोणीही नसल्याचें व्यक्त होतें. यामुळें, हें अनुपम लावण्यरत्न, विद्वज्जनसमूहास व पंडित वृन्दास, आपल्या अद्वितीय तेजोराशीनें अत्यन्त आल्हाद देऊन, निरंतर उज्वलित राहतें; आणि अक्षय्य व पुराण प्रभेनें मंडित होऊन, जसेंच्या तसेंच चिरकाल चमकतें.[1]

कालनिर्णय विचार.

आतां, शाकटायन, यास्क, आणि पाणिनि, हे प्रमुख वैयाकरण व भाषाशास्त्रज्ञ केव्हां होऊन गेले, तें समजण्यासाठीं, त्या

---

१ ह्यासंबंधानें वेबर म्हणतोः—

" And we at once pass into the *magnificent edifice* which bears the name of Panini, and *which justly commands* the *wonder and admiration of every one who enters.* Panini's grammar *is distinguished above all similar works of other countries, partly by its thoroughly exhaustive investigation of the roots of the language* and the *formation of words,* partly by its precision of expression; * * * and which by the very fact of its *sufficing for all the phenomena* which the language presents, bespeaks at once the *marvellous sagacity* of its inventor, and his *profound penetration of* the *entire material of the language.*"

( Weber's H. I. Literature. P 216 ).

बद्दलचें थोडेसें दिग्दर्शन याठिकाणींच केलें पाहिजे. कारण, तसें न केलें तर, कालनिर्णय होण्याला, प्रस्तुतग्रंथांत कांहीं एक साधन उपलब्ध होणार नाहीं. सबब, ही दर्शनींच भासमान होत असलेली उणीव दूर व्हावी म्हणून, तत्संबंधीं अवश्य तें विवेचन येथें करतों.

शाकटायन व यास्क यांचा काल अजूनही यथार्थ निश्चित झालेला नाहीं. तथापि, हे दोघेही पाणिनीच्या पूर्वींचे असल्याविषयीं निर्विवाद असून, पाणिनीचा काळ थोडयाबहुत प्रमाणानें ठरल्यासारखाच आहे. सबब, ह्याचा काल प्रथमतः देऊन, त्यावरून राहिलेल्या वैयाकरणद्वयांच्या कालाची मर्यादा वाचकापुढें ठेवितों.

पाणिनीचा काल, व त्यासंबंधानें पौरस्त्य व पाश्चात्यांत मतभेद.

पाणिनीचा काल आम्हा पौरस्त्यांच्या मतें बराच प्राचीन असून, कित्येक पाश्चात्य त्याला तितका पुरातन समजत नाहींत. पंडित सत्यव्रत सामश्रमीच्या अभिप्रायाप्रमाणें[1], तो इ० स० पूर्वी २४०० वर्षांच्या सुमारास उदयास आला असल्याचें दिसतें. परंतु, डाक्तर रामकृष्ण गोपाळ भांडारकर[2] यांचें तसें मत नाहीं. कारण, ते असें म्हणतात कीं, तो इ० स० ७०० सालीं झाला असावा. आतां, पाश्चात्य[3] विद्वानांकडे पाहिलें तर ते पाणिनीला याहीपेक्षां अर्वाचीनत्व आणूं पाहतात, आणि असें प्रतिपादन करितात कीं,

---

१ उपोद्घात. निरुक्त. भाग ४ था. पान ३०.

२ दक्षिणचा प्राचीन इतिहास. आवृत्ति २ री. पा. ९.

३ बोटलिंग, वेबर, मॉक्समुलर, इत्यादि.

तो इ० स० पूर्वी ३५० व्या वर्षी, अथवा त्या सुमारास, उदयास आला असल्याचें विशेष संभवतें. तथापि, पाश्चात्यांत सुद्धां, एतद्विषयक मतैक्य झालेलें नसून भिन्नभिन्न पंडितांचीं निरनिराळीं मतें आहेत. उदाहरणार्थ, गोल्डस्टकर[1] म्हणतो कीं, पाणिनीचा काल बुद्धाच्या पूर्वी, म्हणजे इ० सनाच्या अगोदर ५४३ वर्षें असावा. परंतु, लॉसनला[2] ह्याचा उदयकाळ बुद्धिनिर्वाणानंतरच असल्याचें वाटतें.

पाणिनीचा काल इ. स. पूर्वी ३५० वर्षांच्या सुमारास असावा, व त्यापूर्वी नसावा, असें जें कित्येक पाश्चात्य मानतात, त्याचें पहिलें व मुख्य कारण असें दिसतें कीं, पाणिनीनें आपल्या अष्टाध्यायींत यवन[3] शब्दाचा उल्लेख केला आहे. आणि ज्यापेक्षां यवन व शिकन्दराची स्वारी यांचा केवळ प्रत्यक्ष संबंध, किंबहुना तादात्म्यच आहे, असें काहीं पाश्चात्य[4] समजतात; इतकेंच नव्हे तर, ह्या स्वारीमुळेंच भारतीयांची आणि ग्रीक लोकांची नवीन

ह्या मतभेदाचें पहिलें कारण पाश्चात्यांची भ्रांतिमूलक समजूत.

---

1 Professor Goldstucker on Panini. P. 227

2 Lassen. Indian antiquities. ( vol. I. First Edn. P. 739. 2nd Edn. P. P. 864-866. vol. II. 476 ).

३ इन्द्रवरुणभवशर्वरुद्रमृडहिमारण्ययवयवनमातुलाचार्याणामानुक्।
( पाणिनि. अष्टा. ४. १. ४९. )

४ एके ठिकाणी डाक्तर बुल्हर म्हणतो,

" Now, it is wellknown that this name ( यवन ) is a corruption of the Greek Ionian, and that in

( पुढें चालू )

ओळख होऊन, निकट परिचय झाला; व त्यांनींच यवन हें नूतन नामधेय ह्या ग्रीक लोकांस दिलें, असेंही ते म्हणतात; त्यापेक्षां पाणिनीच्या कालसंबंधानें त्यांची अशी भ्रांतिमूलक समजूत होणें अगदीं साहजीक आहे. येवढेंच नाहीं तर, ज्याज्या ठिकाणीं त्यांनीं यवन शब्द केवळ काल निर्णायक, म्हणजे ग्रीक लोकांचा वाचकच मानलेला आहे, त्या त्या ठिकाणीं त्यांची अशी चूक होण्याचा विशेष संभव आहे.

दुसरें कारण संस्कृत ग्रंथोदधीला अर्वाचीनत्व आणण्याची पाश्चात्य प्रवृत्ति.

दुसरें कारण असें कीं, कांहीं अपवादखेरीज करून, बहुतेक पाश्चात्यांचा कल आम्हां भारतीयांच्या ग्रंथसंपत्तीला अर्वाचीनत्व आणण्याकडे असतो. त्यामुळें, आमचा सर्व ग्रंथोदधि आणि अखिल कविसमूह, यांस ते केवळ अर्वाचीन दृष्टीनेंच पाहतात; व त्याचा परिणाम

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

India it was applied in ancient times, to the Greeks, and especially to Bactrian and Indo Bactrian Greeks who ruled in the second century B. C., over a portion of Northern India. As there is no historical evidence to show that the Indians became acquainted with the Greeks before the invasion of Alexander in the fourth century B. C., it has been held that, works containing the word *yavana* cannot have been composed before 300 B. C."

( Sacred Books of the East. vol. II. Part I. Intro-puction. P. lvi. )

१ हें आम्हीं भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांत सप्रमाण दाखविलें आहे. ( भा. सा. पू. पुस्तक २ रें. पान ८६ ते २०४ पहा. )

अर्थातच असा होतो कीं, त्यांची दृष्टि दूषित होऊन, ते राळे राळे, गुरव गुरव, असें करूं लागतात; आणि आम्हां भारतीयांचें सर्व कांहीं अर्वाचीनच आहे, अशी त्यांची आपोआपच कल्पना होते.

अशाप्रकारच्या विपक्षवृत्तींचें कारण,

आतां, अशा प्रकारच्या विपक्षवृत्तीचें हे पाश्चात्य कोणत्या हेतूनें अवलंबन करितात; व ज्या ठिकाणीं आमचें अति प्राचीनत्व केवळ निर्विवाद आहे, अशा ठिकाणीं देखील ते त्याला कशासाठीं अर्वाचीनत्व आणूं पाहतात; ह्याचें योग्य कारण आमच्या लक्षांत तर खाचितच तिळमात्रही येत नाहीं. तथापि, आम्हा भारतीयांविषयीं त्यांची तिरस्कारबुद्धि, आपल्याच शहाणपणाविषयीं त्यांस असलेली मोठी घमेंडी, आणि स्वतःच्या बुद्धिमत्तेचा वृथादर्प, इत्यादि योगांचीच ही परिणति असावी, असें सहजीं अनुमान होण्यास बलवत्तर कारण मिळतें.

अनादर व धिक्कार, व त्यासंबंधीं टॉड्चें मत.

आम्हां भारतीयांच्या संबंधानें कित्येक पाश्चात्य इतका अनादर व असा धिक्कार निष्कारण व्यक्त करतात, आणि तो इतका अनावर व हद्दीबाहेर असतो कीं, त्याबद्दलची खुद्द त्यांच्या बान्धवांस देखील मोठी लाज वाटतें, आणि त्याविषयींचा ते आपला अत्यन्त तिरस्कार ही प्रसंगोपात् दर्शवितात. राजस्थानचा सुप्रसिद्ध इतिहासकार करनल् टॉड् ह्यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

" *A contempt for all that is Asiatic too often marks our countrymen in the East.* "

( Tod's Rajasthan. P. P. 117-118 ).

आम्हां लोकांस गौरकाय हे किती क्षुद्र व तुच्छ मानतात, याचा अनुभव सर. जॉन मालकम् यांस स्वतःचाच असल्या कारणानें, त्यांच्या लेखांतील अवश्य तो उतारा येथें दिला तर, अप्रासंगिकपणाचा दोष येणार नाहीं, असें समजून तो देतों. ते म्हणतात कीं,

मालकमूचा स्वतःचा अनुभव.

"माझी स्वतःची एतद्देशीय लोकांविषयीं पहिल्यानें काय समजूत होती, ती अजून मला आठवते; व ती आठवली असतां माझी मलाच मोठी शरम वाटते! ती (समजूत) अशी होती कीं, माझ्या हाताखालीं जे नेटिव्ह कामगार आहेत, ते माझ्यापेक्षां सर्व प्रकारें किती हलके आहेत! असे मला बरेच दिवस वाटत असे. पण, जसजसें येथील लोकांविषयीं व माझे स्वतःविषयीं मला अधिकाधिक कळूं लागलें, तसतसा आमच्या मधील भेद कमी कमी होत गेला. आमचे इंग्रज लोक आपल्या श्रेष्ठपणाचा मोठा डौल मिरवितात, हें मी पुष्कळ ठिकाणीं पाहिलें आहे; व ऐकिलेंही आहे. पण यूरोपांतील व हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रतीच्या लोकांची त्यांच्या त्यांच्या मानानें परस्पर तुलना केली तर, तिकडच्या लोकांत गर्व मिरविण्यास मोठेंसें कारण दिसेल असें वाटत नाहीं. तसेंच, सगळ्या हिंदूंविषयीं एकंदर सरसकट जें मत ज्याच्या त्याच्या तोंडून ऐकूं येतें कीं, ते सारे लोक येथून तेथून लुच्चे लबाड आहेत; त्यांची भल्यानें संगत करूं नये; आणि ते बुद्धीचे इतके मंद आहेत कीं, विद्याभ्यासाच्या योगानें ज्यांचीं मनें विशाल व उदार झालीं, अशा युरोपियन लोकांच्या संभाषणास व स्नेहास ते अगदीं लायक नाहींत; हेंही मला बिलकुल मान्य नाहीं.

१ निबंधमाला पहा.

तत्संबंधीं मॅानियर विल्यम्सचा अनुभव.

ह्या गोष्टीची सत्यता सर मॅानियर विल्यम्सला वाटून, त्यानें सुद्धां ह्या संबंधाचे उद्गार प्रकट केले आहेत. तो म्हणतो,

"There seems *too great a disposition among* European *scholars to regard the Hindus as destitute of all originality.*[१]"

कित्येक पाश्चात्यांच्या वृथादर्पाचा अनुभव आॅक्लेला आल्यावरून, त्याचें पित्त एकदम खवळलें जाऊन, त्यानें सारासीन् (महमदी) लोकांच्या इतिहासांत, खरी वस्तुस्थिति वाचकापुढें मांडली आहे. त्याचें लिहिणें इतकें खरमरीत व निःपक्षपाती आहे कीं, त्यांतील अवश्य तितकें आणि मुद्द्याचें अवतरण येथें दिल्यावांचून राहवत नाहीं. तो सांगतो,

आॅक्ले इतिहासकाराचें मत.

"And to be more particular, the folly of the Westerns *in despising the wisdom of the Eastern Nation, and looking upon them as brutes, and barbarians whilst we arrogate to ourselves every thing that is wise and polite;* and if we chance to light upon a just thought *we applaued ourselves upon the discovery,* though it was *better understood three thousand years ago*"

१ आमची कल्पकता आजमितीसही कायम असून, ती अनादिकालापासून सतत चालू असल्याविषयीं, अनेक पाश्चात्य व खुद्द इंग्रज देखील निष्प्रांजलपणें कबूल करितात. (ग्रंथकर्ता.)
(The Times of India. Dated 11th July 1896, Hunter, Weber, M. Louie Jacolliot, Sir. W. Jones, &c. &c. &c. इत्यादींच्या लेखानींच आमचें ह्मणणें सप्रमाण ठरतें).

"This happens *to us* *through want* of *good reading* and a true way of thinking; for the case is this, that *little* smothering of *knowledge* what we have is *entirely derived from the East*. They first *communicated it to the* Greeks ( a vain, conceited people, who never penetrated the *depths of Oriental wisdom* ); from whom the Romans had theirs.... ... *And it is the wildest conceit that can be imagined, for us to suppose that we have greater geniuses, or greater application, than is to be found in those countries.*" ( Ockley's History of the Saracens. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

पाश्चात्यांच्या मनाचा कल.

आतां, भारतीय वाङ्मयाला, किंबहुना अखिल आर्य-ग्रंथसंपत्तीला, आणि त्यांतही पुराणतम लेखांना, अर्वाचीनत्व आणण्याकडे बहुतेक पाश्चात्यांची, व त्यांतही अनेक विद्वज्जनांची, आणि नांवाजलेल्या पंडितांची, कशा तऱ्हेची प्रवृत्ति झाली आहे, व अजून देखील होत आहे, याबद्दलचें थोडेसें दिग्दर्शन येथेंच केलें पाहिजे. कारण, तसें न केलें तर, प्रमाद होण्याचा विशेष संभव आहे. सबब, एकंदर वस्तुस्थिति वाचकाच्या ध्यानांत येण्यासाठीं, ही अल्प सूचना अगाऊ देण्याचें साहस करीत आहे.

संस्कृत ग्रंथांचें पौरणत्व.

शिवाय, भाषाशास्त्राच्या संबंधानें ब्राह्मणांचे प्रवर्तक, निघंटुकार ( नैघंटुक ), शाकटायन, यास्क, पाणिनि, इत्यादि खचितच फार महत्वाचे असून, त्यांच्या प्राचीनत्वाबद्दलही काडीमात्र शंका उद्भवत नाहीं. परंतु, पाश्चात्यांस तसें वाटत नसून, हे आमचे पुरातन लेख ते केवळ

कूटरचना व ठकबाजीच[१] समजतात. सबब, हें त्यांचें मत अगदींच अप्रशस्त असल्याकारणानें, वाचकास आगाऊ जागे करून त्यांस तसें निक्षून सांगणें आम्हांस केवळ भागच पडतें.

त्यांस अर्वाचीनत्व आणण्याचा पाश्चात्य प्रयत्न.

असो. आमच्या प्राचीन ग्रंथांस अर्वाचीनत्व आणण्याचें कित्येक पाश्चात्यांचें काम इतकें अन्यायानें, परंतु राजरोस आणि निर्भयपणें चाललें आहे कीं, तत्संबंधीं त्यांस कोणत्याही प्रकारचा विधिनिषेध न वाटतां, ते निःशंकपणें असें म्हणतात कीं, अमुक एक लेखाला अर्वाचीनत्व येण्यासारखें असेल तरच बरें होईल; अथवा, अमुक लेखाला अर्वाचीन काळांत ढकलतां आलें, तरच आमच्या मनाचें समाधान होईल! आणि यासंबंधानेंही विशेष आश्चर्य हें कीं, प्रोफेसर मॉक्समुलर सारखे पंडिताग्रणी म्हणविणारे देखील अशा प्रकारचे अविचाराचे लेख लिहून, ते सर्रास जगापुढें मांडतात.

पाश्चात्य पंडितांचे निरर्गल लेख.

ह्या निरर्गल लेखांचें खरें स्वरूप कसें आहे तें समजण्यासाठीं, व त्यांचा शोचनीय परिणाम आमच्या पुराणतम वाङ्मयावर होऊं नये एतदर्थ, तसेंच आमच्या प्रियं-

---

१ मॉक्समुलर म्हणतो,

"We must take Indian literature as it is, and try to make the best of it. And in doing this, we must, as much as possible, divest ourselves of the idea that Hindu writers always wish to impose upon us, and to make every thing as old as possible.

(India What can it teach us? P. 356, 1883)

(भारतीय साम्राज्य पु. २ रें पान १०४ ते ११४ पहा.)

वाचकास अगाऊ जागें करणें किती अगत्याचें आहे हें कळण्यास्तव, त्यांतील अवश्य तें अवतरण येथें देतों. मॉक्समुलर म्हणतो—

"I should like *to see a possibility*, by which we could explain *the addition* not of Valakhilya hymns only; but of other much more modern sounding hymns, at a *later time than the period of the Pratishakhya.*"

"*I say again, that I am not free from misgivings on the subject,* and my critical *conscience would be far better satisfied, if we could ascribe the Pratishakhya, and all it presupposes to a much later date.*"

( Max-Muller's Translation of the Rig-Veda. I. Introd. P. P. XXXIX, XL. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

आपल्या लौकिकाचा मॉक्समुलर व वेबर वगैरेनीं केलेला दुरुपयोग.

**मॉक्समुलर, वेबर**, इत्यादि पाश्चात्य विद्वानांचे लेख, यूरोप व अमेरिकाखंडांत केवळ "**बाबा वाक्यं प्रमाणम्**," याप्रमाणें झाले आहेत. आणि ह्यांच्याच लेखांना जर कोणत्याही प्रकारचा आळा नाहीं, तर इतर बाजारबुणग्यांची विचारसरणी व लेखनपद्धति कशी असेल; त्यामुळें, आमच्या विशाल संस्कृत ग्रंथोदधींतील अनुपम रत्नांचीं कशीं असंख्य छकलें होत चाललीं आहेत; हीं छकलें भलत्याच कोंदणांत ठेवून त्यांजला निराळेंच स्वरूप देण्याचा प्रयत्न कसा ज्यारीनें सुरू आहे; मूळचें पुरातन स्वरूप बदलून नवीन मुलामा

[१] Roth. Preface to the Worterbuch. P. VII.
भारतीय साम्राज्य. पु २ रें. पान १९३ ते २०३ पहा.
तेलंगकृत भगवद्गीता. उपोद्घात पहा. ( पान ३२ ).

व उजळा दिल्या कारणानें, आमच्या पुराणतम ग्रंथांस देखील अर्वाचीनत्व येण्याला एकंदर साधनांची सामग्री कशी जुळून येत आहे; आणि त्या योगानें आमच्या संस्कृत वाङ्मयाचें किती मोठें, व कसें भयंकर नुकसान होत आहे; याबद्दलचा विचार करण्याचें काम मी आपल्या प्रिय वाचकाकडेसच सोंपतों.

आमच्या प्रतिपादनाची सत्यता, व त्याचें साधार पुष्टीकरण.

आतां, हें जें आह्मीं लिहिलें आहे, तें केवळ मनाची कल्पना, किंवा कवीचें लाघव, अथवा वैतालिकांची अतिशयोक्ति नसून, तें वस्तुस्थितीस इतकें मिळतें आहे कीं, त्याचा प्रत्यक्ष अनुभव पौरस्त्य विद्वानांस आणि नामांकित पंडितांसच आल्यामुळें, तेही साशंक होतात, व संस्कृतग्रंथोदधीस अर्वाचीनत्व आणण्याच्या कामांत, पाश्चात्यांचें पाऊल कसें एकसारखें पुढेंच पडत आहे, हें पाहून ते आश्चर्य पावतात.

डा. भांडारकरांचा अभिप्राय.

महाभारताच्या कालाविषयीं विवेचन करतांना डा. भांडारकर हे एक ठिकाणीं स्पष्टपणें असें लिहितात कीं,

" And in the view he ( Col. Eilis ) has put forth, *he but represents, in a some what exaggerated form, the tendency of most European scholars and antiquarious to modernize every thing Hindu.* "

( Dr. Bhandarkar, on the date of Mahabharata. ).

नामदार काशिथराव तेलंगचा अभिप्राय.

कैलासवासी नामदार काशिनाथ त्रिंबक तेलंग, यांनीं देखील पाश्चात्यांच्या ह्या अति निंद्य प्रवृत्तीबद्दल त्यांस दूषण देऊन, आमच्या पुरातन वाङ्मयाला आणवेल

तितकें अर्वाचीनत्व आणण्याचा पाश्चात्य लोक सतत प्रयत्न करितात, असें त्यांनीं निर्भिडपणें लिहिलें आहे. ते म्हणतात,

" It appears to me that *in these days, there has set in a powerful tendency in Europe to set down iudividual works and classes of works of our ancient Sanskrit literature, to as late a date as possible.*"

( Telang's Bhagwatgita. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

पाश्चात्यांची धरसोड व त्यांचा लपंडाव.

आपलें प्रतिपादन सिद्ध करून दाखविण्यासाठीं, कित्येक पाश्चात्य विद्वानसुद्धां कशी धरसोड करितात, व बुद्धिपूर्वक कशा प्रकारचा लपंडाव माजवितात, हें अनेक उदाहरणांनीं तपशिलवार दाखवून, नामदार तेलंग हे आणखी असेंही सांगतात कीं, कालनिर्णय करण्याच्या बाबतींत ज्या ज्या गोष्टींची आणि प्रमाणांची अवश्यकता आहे त्याविषयीं पूर्ण दुर्लक्ष करून, व आपल्या नांवाच्या महत्वावरच विशेष भिस्त ठेवून, ते मनसोक्त सिद्धान्त ठोकून देतात. तेलंग लिहितात.

" I cannot leave this topic *without entering an emphatic protest against the perfectly arbitrary method of fixing dates, in the history of* Sanskrit *Literature.*" "*Not o ly are hypothesis formed on the weakest possible collectton of facts,* but upon such hypotheisis further superstructures ofspeculation are raised. And when that is done, the *essential weakness of the base is often effectually kept out of view.* By such methods, *the whole* of Sanskrit Literature, or nearly the whole of it, *is being shown to*

*be much more recent, than it has hitherto been thought.*"

( Telang's Translation of the Bhagwat Gita.
P. P. XXXI. XXXII. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

नामदार तेलंग हे एक नामांकित विद्वानांपैकीं असून, त्यांच्या मनाची समता देखील अलौकिक होती. परंतु, त्यांजला सुद्धां अशा प्रकारचा पाश्चात्यांचा पक्षपात, लपंडाव, व विपक्षवृत्ति बिलकुल पसंत नव्हती, असें उघड दिसतें; व तें वाजवी आहे असेंही वाटतें. कारण, बड्या बड्या धेंडांनीं आणि नामांकित पंडितांनींच जर आपल्या नांवाचा असा दुरुपयोग केला तर, त्याबद्दल कोणालाही वाईट वाटणें अगदीं साहजीक आहे. आणि म्हणूनच नामदार मजकूरनीं त्यासंबंधानें जरा खर्पूस टीका केली असल्याचें व्यक्त होतें. ते म्हणतात,

" And in considering the *worth* of the supposition, the reader of these sentences ( of Professor Weber ) will doubtless take due notice of the auxiliary verb ' *May* ' which is to be observed in such *profusion* in them. We seem here to be *dealing with that* " *German license of conjecture,* which was reprobated, and *justly reprobated,* by the late eminent Historian of Greece. "

" The third point is a good specimen of the vagueness in which *great names can afford to indulge with impunity.*"

( Telang's Bhagwat Gita. P. P. XXVII.
XXVIII. XXXIII. )

सदरहू अवतरणांतील इतालिकवर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

घटित गोष्टींवरून, अथवा वस्तुस्थितिअन्वयें, अमुक एक गोष्ट सिद्ध होते, किंवा निदान शाबीत तरी होण्यासारखी आहे, असें शोधक, विचारी, निःपक्षपाती, आणि इतिहासज्ञ प्रतिपादन करतात. परंतु, कित्येक पाश्चात्यांचें याहून अगदींच उलट असल्याचें दिसतें. कारण, आपल्या मताप्रमाणें इच्छित गोष्ट स्थापित करण्यासाठीं, हे गृहस्थ घटित गोष्टींत अगर वस्तुस्थितींत देखील हवा-तसा फेरफार करूं पाहतात. अर्थात्, एका फ्रेंच तत्ववे-त्याप्रमाणें, त्यांचा अगदीं कृतनिश्चयच असतो कीं, घटित गोष्टी किंवा एकंदर वस्तुस्थिति जर आपल्या इच्छेनुरूप जुळून आली नाहीं, तर त्या गोष्टींतच आपण अवश्य तो[1] फेरफार करूं.

वस्तुस्थितींत फेरफार करण्याची त्यांची दानत.

तेव्हां, पाश्चात्य मनाची अशा प्रकारची जर ठरीव प्रवृत्ति झाली, तर त्यापासून कांहींएक फायदा न होतां, उलट तोटाच होणारा आहे. इतकेंच नव्हें तर, त्या योगानें सत्यान्वेषणाला ग्रहण लागून, दंभाचा देव्हारा माजेल, ह्यांत लेशमात्रही संशय नाही. आणि ह्याच गोष्टीचें वाईट वाटून, नामदार तेलंग हे यूरोपस्थ पंडितांची चांगली कानउघा-डणी करतात. ते म्हणतात,

नामदार तेलंगनीं यूरोपस्थांची केलेली कानउघाडणी.

"It appears to me, I confess, that it is this reserve of "*likings*" and "*satisfactions*" and "*foregone conclusions*," lying in the back ground of

---

१ हा असें म्हणत असे कीं, "If the facts do not suit my theory, so much the worse for the facts."

most of the *logical artillery,* which European *scholars have brought to bear upon the chronology of our ancient Literature; it is this* that is temporary *doing damage to its antiquity.* Those foregone conclusions easily throw these scholars into the frame of mind, in which to borrow the terse vigour of Chillingworth's language, "*they dream what they desire, and believe their own dreams.*"

( Telang's Bhagwat Gita. P. CXIX. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

नामदार तेलंगांचे सदरचे उद्गार अगदीं अक्षरशः खरे असून, त्यांची सत्यता त्यांनीं प्रत्यक्ष उदाहरणें देऊनच सिद्ध केली आहे. तथापि, कित्येक पाश्चात्यांना हें देखील खरें वाटणार नाहीं. सबब, त्यांचेच माप त्यांच्या पदरांत घालणें विशेष श्रेयस्कर व इष्ट वाटल्यावरून, ह्यांच्या लेखाच्या पुष्टीकरणार्थ, आणखी एका नामांकित पाश्चात्य पंडिताच्या ग्रंथांतील अवश्य तितकें अवतरण येथें देतों. गोल्डस्टकर म्हणतो,

त्यांस पाश्चात्य लेखाचा मिळालेला दुजोरा.

When I see that *the most distinguished* and *the most learned Hindu Scholars and devines—the most valuable* and sometimes *the only source of all our knowledge of ancient India are scorned in theory, mutilated in print,* and, as a consequence, set *aside* in the *interpretation* of Vaidik texts;—when I see that the *most ancient readers* of Hindu antiquity are *interpreted to the European public in such a manner as to cease to be that which they are;*— * * * when I see that *the very forms of the language are falsified,*......when I see that they *who*

*emphatically claim the epithet of "veracions" make statements which are the very reverse of truth*; and when I consider that *this method of studying Sanskrit philology is pursued by those whose words apparently derive weight and influence from the professional position they hold;*— * * * On this ground have I raised my voice."
( Goldstucker on Panini. P. P. 267-268 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

विपक्षवृत्तीचें आणखी एक मासलेवाईक उदाहरण.

पण, याहीपेक्षां अप्रतीम आणि अदृष्टपूर्व मासला ह्मटला ह्मणजे **ड्यूगल्ड स्टुअर्ट्**चा होय. ह्या गृहस्थाची गणना नामांकित विद्वानांत होत असून, हा **स्कॉट्लंड्**चा एक तत्ववेत्ता ह्मणून सुप्रसिद्ध आहे. परंतु, इतकेंही असतां, त्याच्या मनाच्या समतेच्या नांवानें निव्वळ आंवळ्या एवढेंच पूज्य! हा गृहस्थ आह्मा हिंदूंस केवळ तुच्छवत[1] मानीत असल्या कारणानें, आमच्या **संस्कृत** भाषेचें अतिप्राचीनत्व, तिचें नितान्त मोहकत्व, तिचें अलौकिक सौन्दर्य, आणि तिची अपूर्व चारुता, इत्यादि त्यानें ऐकिल्यावर, त्याच्या अंगाचा जसा कांहीं तिळपापडच झाला; व त्या संतप्तावस्थेंत त्याला भान न राहिल्यामुळें, हिंदूंची पुराण **संस्कृत** भाषा, व त्यांची यच्चावत् ग्रंथसंपत्ति, हें सर्व, केवळ

---

१ आणि आमच्या ह्या सांप्रतच्या पडत्या दशेंत आह्माला तुच्छवत तें कोण समजत नाहीं! **पंके निमग्ने करिणि भेकोभवति मूर्धगः** । भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पु. १ लें. प्रस्तावना पहा.

"The despised Hindus." ( Introduction to the Science of language. By A. H Sayce. vol. I. P. 45. 1880 ).

ब्राह्मणांचे नूतन बनावट लेखच होत, असें त्यानें निःशंकपणें शिक्के मोरतब ठोकिले[1]. तेव्हां, अशाच प्रकारची पंडितमन्यांची एकसारखी मालिका लागल्यावर, खरा प्रकार तो कसा बाहेर पडणार? अर्थातच नाहीं!

पाश्चात्य लेखांसंबंधानें, सावधगिरीची अवश्यकता.

असो. तात्पर्य म्हणून इतकेंच कीं, **मनीं असे तें स्वप्नीं वसे, आणि जें भासें तें खरें दिसें**; अशी स्थिति कित्येक पाश्चात्य पंडितांची, व त्यांतही कांहीं कांहीं नांवा-

---

१ हें बेहद्द अविचाराचें वर्तन पाहून, कित्येक पाश्चात्यही कष्टी होतात, आणि म्हणतात,

"It was not the first time that philosophy and common sense have found themselves opposed to uuwelcome knowledge."

(Sayce's Introduction to the Science of language. vol. I. P. 46. 1880)

डयूगल्डस्टुअर्टच्या अशा तऱ्हेच्या लेखनपटुत्वाला **मॉक्समूलरनें नामांकित लेख** म्हटलें आहे!

Dugald Stewart, a Scotch philosopher, "*denied the reality of such a language as Sanskrit altogether*, and wrote his *famous essay* to prove that Sanskrit had been *put together after the model* of Greek and Latin, *by those arch-forgers and liars the Brahmans*, and *that the whole of Sanskrit literature was an imposition.*"

(Max Muller's Lectures on the Science of Language. vol. I. P. 189. 1880).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

डयूगल्डस्टुअर्ट, **मिल्ल**, इत्यादि पाश्चात्यांच्या शिलकी व निवडक गालिप्रदानाचा मासला पाहून हसूं येतें, आणि **शेषं कोपेन पूरयेत्**। या **सं**स्कृत म्हणीची आठवण होते.

जलेल्या विद्वानांची देखील झालेली असल्यामुळें, आमच्या कविगणांच्या संबंधानें त्यांचा वलगनाव्यामोह आणि त्यांनीं केलेला कालनिर्णय फारच सावधगिरीनें, आणि विशेष तपासानें स्वीकारला पाहिजे. नाहींपेक्षां, ह्यांच्या निरंकुशलेखांनींच सत्याचा खग्रास होऊन, आमच्या भारतीय वाङ्मयावर विशेष शोचनीय परिणाम घडून आल्यावांचून खचितच राहणार नाहींत. यासाठीं, तत्प्रतिकारार्थ, हें थोडेंसें विषयान्तर करणें केवळ भाग पडलें. सबब, त्याबद्दल वाचकाची क्षमा मागून, पुढील विवेचनाकडे एकदम वळतों.

यवन व म्लेच्छ शब्दांसंबंधीं पाश्चात्यांची भ्रांतिमूलक समजूत.

आतां, यवन व म्लेच्छ शब्दांसंबंधानेंच कित्येक पाश्चात्यांची विशेष भ्रांतिमूलक समजूत झाली आहे, असें दिसतें. सबब, तिचेंच निरसन प्रथमतः झालें पाहिजे. यास्तव, त्याबाबतींत कांहीं दाखला अथवा योग्य आधार मिळाला तर पाहूं, आणि नन्तर तद्विषयक अवश्य तें विवेचन करूं.

सदरहू शब्दांचा अर्थ व उपयोग.

संस्कृत ग्रंथांवरून, यवन किंवा म्लेच्छ शब्द केवळ ग्रीक व मुसलमान लोकांचाच वाचक असल्याचें दिसत नाहीं. तर, त्याचा उपयोग अन्य कारणांसाठीं देखील होत असावा, असें अनेक प्रमाणांवरून दाखवितां येईल. इतकेंच नव्हें तर, भिन्न भिन्न अर्थानेंही त्यांची योजना होत असल्याचें, सदरहू आधारांवरूनच चांगलें व्यक्त होण्यासारखें आहे, यांत बिलकुल शंका नाहीं.

यवन शब्दाचा पौरस्त्य मताप्रमाणें विस्तृत अर्थ.

सरदहू दोन शब्दांपैकीं आपण अगोदर **यवन** शब्द घेऊं, आणि त्यासंबधानें आमचे पौरस्त्य पंडित काय म्हणतात, स्मृतिकारांचा त्याबद्दल कसा अभिप्राय आहे, व त्याच्या व्युत्पत्तीविषयीं वैयाकरण कशा तऱ्हेची मीमांसा करतात, हें काळजीपूर्वक पाहूं.

आमचे **भारतीय** विद्वान, हा **यवन** शब्द बराच व्यापक[1] असल्याचें समजतात, आणि **यवन** म्हणजे **पारदेशिक** किंवा वर्णसंकर होऊन झालेली प्रजा, असेंही ते मानतात. **स्मृति**कारांच्या[2] मतें, **शूद्र** पुरुष व **क्षत्रिय** स्त्री यांच्या जोडप्यापासून झालेली संतती **यवन** समजावयाची. आणि **वैया**[3]करणांच्या अभिप्रायाप्रमाणें, **यवन** शब्द हा, **यु**=मिश्रण या धातूपासून झाला आहे; तेव्हां अर्थात्च, ह्या अभिप्रायानें **स्मृ**तिकारांच्या मतास पुष्कळच पुष्टीकरण मिळतेंसें दिसतें. कारण, यवन म्हणजे **शूद्र** व क्षत्रियांची **मिश्र**-संतति होय, असेंच हे **स्मृ**तिकार प्रतिपादन करितात. शिवाय, यवन व **म्लेच्छ** हे केवळ पर्याय[4] शब्दांप्रमाणेंच **वैया**करण उपयोग करीत असल्याचेंही त्यांच्या ग्रंथावरून व्यक्त होतें.

आतां, आपण क्षणभर **पाश्चात्यांकडे** वळूं, आणि यवन

---

१ उणादि सूत्रवृत्ति पहा. २ **गौ**तम. ४, २१.

३ **सुयुरुवृञो युच्** ॥ ७४ ॥

**षुञ् अभिषवे। युमिश्रणे। रुशब्दे। वृञ्वरणे। एभ्यो युच्।**

(उज्जलदत्तविरचिता उणादिसूत्रवृत्तिः । २. ७४).

४ **यवनो म्लेच्छ विशेषः ।**

शब्दासंबंधीं त्यांचें कशा प्रकारचें मत आहे, याविषयीं यथावकाश विचार करूं.

त्याची पाश्चात्यानीं केलेली मीमांसा.

**मॅक्समुलरचा**[1] असा अभिप्राय आहे कीं, **यवन** शब्द केवळ **ग्रीक** किंवा **आयोनियन्** लोकांचाच वाचक नसून, तो पुष्कळ व्यापक आहे. **लॉसन्**च्या मताप्रमाणें देखील, **यवन** शब्दाचा गर्भितार्थ विशेष विस्तृत आहे; व त्यांत **हीब्र्यू**, **आरब**, इत्यादि लोकांचा समावेश होत असून, ही गोष्ट त्यानें सिद्धच केली आहे, असें मॅक्समुलर लिहितो. **गोल्डस्टकरचें**[2] असें ह्मणणें आहे कीं, **पाणिनीनें** ज्या **यावनानी** शब्दाचा उपयोग केला, तो शब्द इराणी सांकेतिक चिन्हाचाच वाचक होय; आणि त्यावरून, **यवन** व **म्लेच्छ**, अथवा **ग्रीक** आणि **मुसलमान**, यांचा कोणत्याही प्रकारें बोध होत नाहीं, असा त्यांच्या लिहिण्याचा मथितार्थ दिसतो.

म्लेच्छ व यवन हे पर्यायशब्द.

असो. **म्लेच्छ** शब्दसुद्धां **यवन** शब्दाप्रमाणेंच पुष्कळ व्यापक असल्याचें दृग्गोचर होतें. इतकेंच नव्हें तर, हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे वाचक असल्याचें वैयाकरणांच्या लेखावरूनही नजरेस येतें. कारण, **यवन** व **म्लेच्छ** हे केवळ पर्याय शब्दच आहेत, असें व्यक्त करण्यासाठीं, **उज्ज्वलदत्तानें** देखील "**यवनो म्लेच्छ विशेषः ।**" असें आपल्या **उणादि** सूत्रवृत्तींत सांगितलें आहे.

---

[1] Max Muller's Ancient Sanskrit Literature. P. 501.

[2] **गोल्डस्टकरचा पाणिनीवरील** लेख पहा. (पा. १७.)

शिवाय, तिरस्कार अथवा अवहेलना व्यक्त करण्यासाठीं सुद्धां, ह्या शब्दांची योजना केली असल्याचें आढळून येतें. सबब, ही गोष्ट मोठी मुद्याची असल्याकारणानें, विशेष रीतीनें ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. उदाहरणार्थ, मुद्राराक्षसांत, राक्षसानें मलयकेतूला केवळ अवधीरणार्थच म्लेच्छ[1] म्हटलें आहे, असें त्यांतील संदर्भावरून वाचकाच्या सहजीं लक्षांत येईल.

म्लेच्छ शब्दाचा अवहेलनार्थ उपयोग.

आतां, कोणी कदाचित् अशी शंका घेईल कीं, मलयकेतु हा म्लेच्छ किंवा यवन असेल, आणि त्यामुळेंच, त्याला म्लेच्छ हे उपपद लाविलें असावें. परंतु, ही आशंका अगदींच निरर्थक ठरते. कारण, एकतर मलयकेतु हें हिंदुवाचक म्हणजे अर्थात् आर्यवाचक नांव आहे; व दुसरें असें कीं, ह्या नांवानें म्लेच्छत्व व्यक्त होणें शक्यच दिसत नाहीं. तथापि, ह्या प्रतिपादनावरही कोणी कदाचित् अशी कोटी लढवील कीं, मुद्राराक्षस हें संस्कृत नाटक असल्यामुळें, म्लेच्छ नामधेयास संस्कृत रूप देऊन, तें नांव संस्कृत नाटकास शोभे असें बनविलें असावें. पण, ही शंका देखील निराधारच भासते. कारण, केवळ एकटच्या मलयकेतूचेंच नांव आर्यवाचक आहे, असें नाहीं. तर त्याच्या चुलत्याचें नांवही विरोचक, म्हणजे आर्यबीजसंज्ञकच आहे. फार तर काय सांगावें पण, त्याच्या बापाचें नांवसुद्धां त्याच मासल्याचें आहे. ह्याला मुख्यत्वेंकरून पर्वतकच म्हणत. तथापि,

त्याचें प्रमाण.

---

१ अहो विवेकशून्यता म्लेच्छस्य। (मुद्राराक्षस. अंक ६ वा.)

शैलेश्वर किंवा पर्वतेश्वर या नामधेयांनींही त्याला हाक मारण्याचा परिपाठ असे. आणि हीं सर्व नांवें आर्यकुटुंबद्योतकच आहेत, हें विशेष रीतीनें सांगण्याची अवश्यकता नाहीं.

परंतु, ह्या खेरीज आणखीही एक गोष्ट अत्यन्त महत्वाची आहे, व त्यावरून मलयकेतूच्या आर्यत्वासंबंधीं एकंदर शंकेचें तत्काल निरसन होण्यासारखें आहे. कारण, आपला बाप वारल्याला दहा महिने झाले तरी, आपण त्याच्या नांवानें तिळांजळी देखील दिली नाहीं, असें मनांत येऊन, त्यानें ( मलयकेतूनें ) मोठ्या दुःखाचा उच्छ्वास टाकला आहे.

मलयकेतुः । निःश्वस्यात्मगतम् । अद्य दशमोमासस्तातस्योपरतस्य न चास्माभिर्व्यर्थपुरुषाभिमानमुद्वहद्भिस्तमुद्दिश्यतोयांजलिरप्यावर्जितः । ( अंक ४ था पहा. )

ह्यावरून, मलयकेतु हा यवन किंवा म्लेच्छ नसून, तो आर्यवंशजच होता, याबद्दल काडीमात्रही शंका राहत नाहीं. कारण, ही श्राद्धक्रिया, अथवा हा तिलांजलीचा विधि, हिंदूशिवाय अन्य कोणत्याही जातींत नाहीं; आणि म्लेच्छांत तर तो स्वप्नांत देखील आणावयास नको. तेव्हां अर्थात्च मलयकेतूला जें म्लेच्छ म्हटलें, तें निव्वळ अवहेलनार्थच होय, हें आणखी विशेष रीतीनें व्यक्त करावयास नलगे.

तात्पर्यार्थ, व म्लेच्छ शब्दाचे अनेक उपयोग.

तात्पर्य, यवन किंवा म्लेच्छ शब्दाचा उपयोग, आमचे पूर्वज, व प्राक्कालीन पंडित, आणि अन्य कविगण, हे सदर्हू शब्द केवळ ग्रीक अगर मुसलमान लोकांचेच

वाचक असल्याचें समजून करीत नसत. तर, १ तिरस्कार व अवहेलना[1], २ वर्णसंकर अथवा मिश्रजात[2], ३ विदेशी किंवा परकी[3] लोक, आणि ४ ग्राम्य व जंगली, वगैरेचे देखील हे शब्द विशेष रीतीनें द्योतक असल्याचे, ते निःसंशय मानीत.

यवन शब्दानें अर्वाचीनत्वाची नाशाचिती.

सदरहू विवेचनावरून, वाचकाच्या लक्षांत इतकें खचित येईल कीं, अष्टाध्यायींतील यवन शब्दानें अर्वाचीनत्वाचा भास होण्याचें कांहींच कारण नाहीं. शिवाय, यवन शब्दाचा शिकन्दराच्या स्वारीशीं सुद्धां तिळमात्र संबंध नाहीं. तसेंच, यवन शब्दानें ग्रीक लोकांचाच बोध होतो, अशा प्रतिपादनांतही बिलकुल अर्थ नाहीं. आणि हीच वस्तुस्थिति खरी असल्यामुळें, पाणिनींत यवन शब्दाचा उल्लेख आहे येवढीच सबब पुढें करून, त्याला अर्वाचीनत्व आणण्याचेंही काडीमात्र प्रयोजन दिसत नाहीं.

पाश्चात्य लेखांत विपर्यास, व तदुद्भूत साशंकता.

बरें, पाश्चात्यांचाच लेख, अथवा त्यांचें प्रतिपादन, क्षणभर खरें मानावें, तर त्यांच्या लिहिण्यांत, आणि इतिहासप्रसिद्ध गोष्टींत, कांहींच मेळ असल्याचें दिसत नाहीं. कारण, शिकंदराच्या स्वारीमुळें आमचें व ग्रीक लोकांचें ह्मणजे अर्थात् यवनांचें, दळण वळण सुरू झालें; किंबहुना,

१ मुद्राराक्षस. २ गौतमस्मृति. ३ उणादिसूत्रवृत्ति. ४ नामदार तेलंगकृत मुद्राराक्षसावरील टीका. तेलंग म्हणतात,

"It hardly needs saying that Mlechha is equivalent to the Greek *Barbarian*, meaning literally, one *who speaks barbarously*." P. XIII.

तेव्हांच नवीन ओळख होऊन, परस्पर परिचय होत चालला, असेंही ते प्रतिपादन करितात. इतकेंच नव्हें तर, ह्या परिचयामुळेंच यवन शब्दांशीं आमचें संघट्टण होऊन, तदनंतरच पाणिनीनें हा शब्द आपल्या अष्टाध्यायींत वापरला; आणि ह्या यवन शब्दाचा उल्लेख झाल्या कारणानेंच त्याचा काळ इ. स. ३५० वर्षांच्या सुमारास असावा, असें ते ह्मणतात. परंतु, शिकंदराची स्वारी तर इ. स. पूर्वी ३२७ व्या वर्षींच हिंदुस्थानावर झाली होती. तेव्हां ह्या पाव शतकाच्या अंतराचें निवारण कशा प्रकारें व्हावें, हें समजत नाहीं. शिवाय, पाश्चात्य पंडितांतही पाणिनीच्या कालासंबंधानें पुष्कळ मतभेद[1] आहे. त्यामुळें, कशास कांहींच मेळ असल्याचें दिसत नाहीं.

सबब, ही वस्तुस्थिति मनांत आणून, एकंदर गोष्टींचा सर्व बाजूंनीं विचार केला ह्मणजे, पाणिनीचा पाश्चात्यांनीं ठरविलेला काळ स्वीकृत करण्यास मोठी अडचण वाटते.

यास्क व शाकटायनाचा कल.

असो. पाणिनीचा काल इ. स. पूर्वी २४०० वर्षें असल्याविषयीं, पंडित सत्यव्रतसामश्रमीनें[2] निश्चित केलें असून, त्याच्याही पूर्वीचा यास्क आहे, याविषयीं अगदींच संशय नाहीं. इतकेंच नव्हें तर, तो पाणिनीपेक्षां निदान शेंदोनशें वर्षांनीं तरी पुराणतर असावा, असें अंतःप्रमाणा-

---

१ " Scholars are not agreed as to the periods when Yáska and Pánini respectively lived, or even as to which of the two was the more ancient. "
( Muir's Sanskrit Texts. vol. II. P. 153. 1871 ).

२ निरुक्त. उपोद्घात. पु. ६ वें. ७ जि–ज्ञि.

वरून दिसून येतें. ह्या दोघां वैयाकरणांहूनही, **शाकटायन** हा प्राचीनतर होय; आणि त्या दोहोंत जें कालमानाचें अंतर आहे, तेंच **यास्क** व **शाकटायन** यांत देखील असावें, असें अनुमान होतें.

पाणिनी, कात्यायन, व पतंजलि, यांजवरील टीका.

**पाणिनी**वर **कात्यायना**ची **वृत्ति** असून, त्याचा काल इ. स. पूर्वी १२०० वर्षें असल्याविषयीं कांहींचें मत आहे. तथापि, हा ऋषि इ. स. पूर्वी ३९० वर्षांच्या सुमारासच झाला असावा, असेंही कित्येक म्हणतात. **कात्यायनानें** विशेषेंकरून, **पाणिनी**चें मत खोडून टाकून, आपलेंच स्थापित करण्याचा प्रयत्न केल्याचें दिसतें. परंतु, **पतंजली**नें त्यांत अनेक दोष काढून, त्याचें खंडन व **पाणिनी**च्या मताचें मंडन केलें आहे. **कात्यायना**च्या **पाणिनी**वरील टीकेला **कात्यायनवृत्ति** म्हणतात; व **पतंजली**च्या टीकेला **महाभाष्य** अशी संज्ञा आहे. पतंजलीचा काल इ. स. पूर्वी १४० पासून १२० वर्षांपर्यंत असावा, असा **गोल्डस्टकर**चा अभिप्राय आहे. तो भरतखंडाच्या पूर्वेस **गोनर्द** येथें जन्मला असून, तो कांहीं कालपर्यंत **काश्मीर** येथें होता, व त्याच्या आईचें नांव **गोणिका** असल्याचें सांगतात.

दुसरे लहान मोठे वैयाकरण.

**पाणिनि**, **कात्यायन**, आणि **पतंजली** नंतर, सुमारें एकशें पन्नास लहान मोठे वैयाकरण व वृत्तिकार होऊन गेले. ह्यापैकीं, विशेष नामांकित ह्मटले ह्मणजे, **कैयट**, **नागोजीभट्ट**, **वामन**, **भट्टोजी दीक्षित**, **वरदराज**,

इत्यादि होत. कैय्यटाचा[1] पतंजलीवर भाष्यप्रदीप नांवाची टीका असून, ह्या टीकेवरही नागोजीभट्टानें[2] भाष्यप्रदीपोद्द्योत नांवाची व्याख्या केली आहे. परिभाषेन्दुशेखर नांवाचा ह्याचा आणखीही एक ग्रंथ आहे, व ह्याचे डा. कीलहार्ननें भाषान्तर केलें आहे. ह्याचाच शब्देंदुशेखर नांवाचा ग्रंथ सिद्धान्तकौमुदीवरील टीका दाखल होय. लघुशब्देंदुशेखर हा देखील ह्याचाच ग्रंथ आहे.

वामनानें काशिकावृत्ति नांवाची पाणिनीवर व्याख्या केली असून, तो इ. स. च्या आठव्या शतकांत उदयास आला असावा, असें वाटतें. कारण, राजतरंगिणींत तो गयापीडाच्या[3] कारकीर्दींतील असल्याविषयीं वर्णन आहे, आणि इतर पंडितांच्या मौलिकेंत कल्हणानें वामनासही[4] गोंविलें आहे. क्षीर ( धातुतरंगिणीचा कर्ता ) हा सुद्धां

---

१ हा इ. स. च्या सातव्या शतकांतला असावा, अशी वेबरची सूचना आहे. ( H. I. L. P. 223 ).

२ इ. स. चें १८ वें शतक.

३ हा राजा विद्येचा मोठा पोषिंदा असल्याचें राजतरंगिणीवरून दिसतें.

समग्रहीत्तथाराजा सोन्विष्यन्निखिलान्बुधान् ।
विद्वद्दुर्भिक्षमभवद्यथान्यनृपमंडले ॥ ४९३ ॥
( रा० त० चौथा तरंग. )

४ सदामोदर गुप्ताख्यं कुट्टनीमतकारिणम् ।
कविं कविं बलिरिव धुर्यं धीसचिवं व्यधात् ॥४९६॥
मनोरथः शंखदत्तश्चटकः संधिमांस्तथा ।
बभूवुः कवयस्तस्य वामनाद्याश्चमंत्रिणः ॥ ४९७ ॥
( रा. त. चौथा तरंग. )

५ हा जैन किंवा बौद्ध मताचा असावा, असें वाटतें.

ह्याच वेळचा असल्याचें दिसतें. काशिकावृत्तीवर देखील पदमंजरी नांवाची हरदत्तानें टीका केली आहे. गयादित्य हाही वामनाच्याच वेळचा मोठा वैयाकरण होय, व त्याची फारच अचाट बुद्धि असे, अशी लोकांत प्रसिद्धि आहे. वृत्तिसूत्र ही गयादित्याचीच कृति असल्याचें सांगतात.

भट्टोजी दीक्षित हा इ. स. च्या सतराव्या शतकांत उदयास आला होता, व सिद्धान्तकौमुदी ही त्याची जगद्विख्यात कृति होय. ह्यानें पाणिनीचीं सर्व सूत्रें पद्धतशीर लावून, त्यांची अर्वाचीन रीतीस अनुसरून पूर्ण व्यवस्था केली आहे. लघुकौमुदी हा सुद्धां सर्वमान्य ग्रंथ असून, तो वरदराजानें आशुबोधार्थ तयार केला असल्याचें दिसतें. मध्यकौमुदी आणि मध्यमनोरमा ह्या देखील याच्याच कृती होत.

ह्याशिवाय, हरिकृत वाक्यपदीय, उज्ज्वलदत्तकृत उणादिसूत्रवृत्ति[1], वर्धमानकृत गणरत्नमहोदधि, शान्तनवकृत फिट्सूत्रें, इत्यादि ग्रंथही सुप्रसिद्ध आहेत.

पाणिनीच्या व्याकरणपद्धतीहून ज्यांची परिपाटी व विचारसरणी अगदीं भिन्न आहे, असेही कित्येक वैयाकरण येथें होऊन गेले. सबब, त्यांजबद्दलची देखील थोडीशी हकीकत येथें देतों.

वोपदेव हा फारच स्वतंत्र विचाराचा वैयाकरण होऊन गेला. हा इ. स. च्या तेराव्या शतकांतला असून, त्याची मुग्धबोध नांवाची कृति सर्वांस महशूर आहे. अनुभूति-

१ ही उणादिसूत्रें शाकटायनाचीं असल्याविषयीं वेबरचें मत आहे.

( *H. I. L. P* 226 ).

स्वरूपाचार्यकृत **सा**रस्वत, हें १८६१ सालीं प्रसिद्ध झालें. **श**र्ववर्म्याचा **का**तंत्र नांवाचा एक ग्रंथ आहे, आणि त्याजवर दुर्गसिंहाची टीका आहे. ह्यांत व **का**च्छायनकृत **पा**ली-व्याकरणांत विशेष साम्य दृग्गोचर होतें, व त्यामुळेंच त्याचें विशेष महत्व वाटतें. **बु**ल्हरच्या लेखावरून असें दिसतें कीं, **का**श्मीरांत ह्या **का**तंत्र व्याकरणाचाच विशेष उपयोग करितात; आणि त्या योगानें त्याजवर, इ. स. बाराव्या, तेराव्या, चौदाव्या, पंधराव्या, व सोळाव्या शतकांत, बऱ्याच टीका झाल्या आहेत.

ह्या खेरीज, **व्या**डिकृत[1] **प**रिभाषा, **च**न्द्रकृत **व**र्णसूत्र, **प**रिभाषा, आणि **ष**ड्भाषाचन्द्रिका, **क्षी**रकृत **अ**व्यय-**वृ**त्ति व **धा**तुतरंगिणी, **व**ररुचिकृत[2] **प्रा**कृतप्रकाश, **भा**मह-कृत **म**नोरमावृत्ति, **प्रा**कृतकामधेनु, **प्रा**कृत **लं**केश्वर, **हे**म-चन्द्रकृत **मा**गधीव्याकरण, ह्याच हेमचन्द्राचें[3] **श**ब्दानुशा-सन, तसेंच **च**न्द्रव्याकरणसूत्र, **क**लापसूत्र, **स**रस्वतीव्या-करणसूत्र, इत्यादि सर्व पारिशिलन करण्यायोग्य ग्रंथ आहेत.

---

१ **ऋक्** **प्रा**तिशाख्यांत कोणी एका **व्या**डीचें नांव आहे. सबब, तोच हा असण्याचा संभव आहे. ह्याचेंच नांव **दा**क्षायण असून, एक लक्ष ( १००००० ) श्लोकांचा "**सं**ग्रह" नांवाचा ग्रंथ ह्याचाच असेल, असें वाटतें. **पा**णिनीला **दा**क्षिपुत्र अशी ही संज्ञा होती. त्यामुळें, ह्या **व्या**डीचाच **पा**णिनी वंशज असावा, असें **गो**ल्डस्टक-रचें ह्मणणें आहे. २ इ. स. पूर्वी ५६ वर्षें.

३ ह्याचा काल इ. स १०८८ पासून ११७२ पर्यंत असावा, असें डा. **भा**ऊ **दा**जींचें मत आहे. (J. B. R. A S. IX. 224.) हा **जै**नधर्मी असे.

४ **सं**स्कृत व्याकरणांची एकंदर यादी **को**लब्रूकनें दिली आहे. ( Miscellaneous Essays. II. 38. )

याप्रमाणें, फक्त ठळक ठळक वैयाकरणांचेंच सामान्य दिग्दर्शन झालें. तथापि, ह्या अगाध **संस्कृत म**होदधींत, ज्यांनीं ज्यांनीं म्हणून **भा**षाशास्त्रावर थोडेबहुत तरी परिश्रम केले आहेत, अशीं आणखीही अनेक रत्नें आहेत. सबब, वाचकाच्या माहितीसाठीं, त्यांची व त्यांच्या कृतींची केवळ त्रोटकच हकीकत येथें देतों.

**ईश्वरानन्द.** ह्यानें **कै**यटाच्या **म**हाभाष्यप्रदीपावर टीका केली असून, तिचें नांव **भा**ष्यप्रदीप**वि**वरण आहे.

**जिनेन्द्र.** ह्याची **न्यास** नांवाची कृति सुविश्रुत आहे, व हिलाच **का**शिका **वृ**त्तिपंजिका म्हणतात. ही **पा**णिनीवरील वृत्ति आहे.

**रक्षित.** ह्याची **जि**नेंद्राच्या **न्यास** ग्रंथावर टीका आहे.

**नागोजीभट्टकृत वृ**त्तिसंग्रह. ही **पा**णिनीवरील संक्षिप्त टीका आहे.

**पुरुषोत्तमदेव.** ह्याची **भा**षावृत्ति नांवाची **पा**णिनीवरील टीका आहे. मात्र, हींत **वे**दभाषेचे नियम गाळाऊ केले आहेत.

**सृष्टिधर.** ह्याची **पु**रुषोत्तमदेवाच्या वृत्तीवर **भा**षावृत्ति-नांवाची टीका आहे.

**भट्टोजी दीक्षितकृत** शब्दकौस्तुभ. ही **पा**णिनीवरील अपुरी राहिलेली वृत्ति होय. **म**नोरमा अथवा **प्रौ**ढमनोरमा ही सुद्धां ह्याचीच कृति आहे.

**वैद्यनाथ पायगुंड उर्फ बाळंभट्टकृत प्र**भा. ही **श**ब्दकौस्तुभावरील टीका होय. **चि**दस्थिमाला ही लघुशब्देन्दुशेखरावरील यानेंच केलेली टीका आहे.

**रामचन्द्र आचार्यकृत** प्रक्रियाकौमुदी. हें व्याकरण असून, त्यांत **पाणिनीचे** नियम पाळले आहेत. परंतु त्याच्या एकंदर रचनेंत आणि व्यवस्थेंत पुष्कळ फेरबदल केला आहे.

**विठ्ठल आचार्य.** यांची **प्रसाद** नांवाची **प्रक्रियाकौमुदीवर** टीका आहे.

**जयन्तकृत** तत्वचन्द्र. ही देखील **प्रक्रियाकौमुदीवर** टीका असून, ती **कृष्ण** पंडितानें केलेल्या टीकेचें सार आहे.

**ज्ञानेन्द्रसरस्वति.** ह्याची तत्वबोधिनी नांवाची सिद्धान्तकौमुदीवर टीका आहे.

**हरिदीक्षित कृत** शब्दरत्न. ही **भट्टोजी** दीक्षिताच्या मनोरमेवरील टीका आहे. लघुशब्दरत्न हा याचाच सारांश आहे.

**बालंभट्ट ऊर्फ वैद्यनाथपायगुंडकृत** भावप्रकाश. ही हरिदीक्षितांच्या टीकेवर व्याख्या आहे. लघुभूषणकान्तिनामक व्याकरणसारावरील टीका व परिभाषेंदुशेखरकाशिका नांवाची वृत्तिदेखील ह्याचीच आहे.

**शीरदेवकृत** परिभाषावृत्ति. ही **भाष्य** व **वार्तिकें** यांच्या परिभाषेवर टीका आहे.

**भास्करभट्टकृत** लघुपरिभाषावृत्ति, आणि परिभाषार्थसंग्रह.

**स्वयंप्रकाशानन्दकृत** चन्द्रिका. ही लघुपरिभाषावृत्तीवर टीका आहे. त्याचप्रमाणें परिभाषार्थसंग्रह ही देखील तशीच दुसरी टीका आहे.

**कारिका.** हींत महाभाष्य, काशिकावृत्ति, इत्यादींत जे व्याकरणाचे नियम दिले आहेत, त्यांचें विवेचन आहे.

**परिभाषा.** हींत वार्तिकें, भाष्य, पाणिनीचीं सूत्रें, व पुराणवैयाकरण, यांच्यांतील पारिभाषिक शब्दांचो व्याख्या आहे.

**भर्तृहरिकृत वाक्यप्रदीप.** ह्यालाच हरिकारिका असेंही नामधेय असून, त्यांत कारकप्रक्रिया अथवा वाक्यरचनेचा विचार केला आहे.

**कोंडभट्टकृत वैयाकरणभूषण.**

**हरिवल्लभकृत भूषणदर्पण.** ही वैयाकरण भूषणावर टीका आहे, व वैयाकरणभूषणसार हा त्याचा सारांश आहे.

**नागेशभट्टकृत वैयाकरणसिद्धान्तमंजूषा व लघुवैयाकरण-सिद्धान्तमंजुषा.** हे वाक्यप्रदीपासारखेच ग्रंथ आहेत. आणि ल० वै० क० सिद्धान्तावर वैद्यनाथ-पायगुंडाची कला नांवाची टीका आहे.

**गणपाठ.** ही व्याकरणांत आलेल्या नियमांतील शब्दाची यादी होय.

**गणरत्नमहोदधि.** ही सदरहू शब्दावलीवरील व्याख्या आहे.

**भट्टीकाव्य.** ह्यांत क्रियापदाचीं रूपें तपशिलानें सांगितलीं आहेत, व ह्याजवर अनेक टीका झाल्या आहेत.

**यङ्लुगन्तशिरोमणि.** यांत यङ्लुगन्ताचें विवेचन आहे.

**मैत्रेयरक्षितकृत धातुप्रदीप अथवा तंत्रप्रदीप.** ही पाणिनीनें केलेल्या धातुपाठावरील व्याख्या आहे.

**माधवाचार्यकृत माधवीयवृत्ति.** ही धातू व तद्धितप्रत्ययावरील व्याख्या होय, व ती **सायणाचार्यानें** केली आहे. ह्या वृत्तींत **सायणाचार्यानें** जे वैयाकरण व ग्रंथ आधारभूत म्हणून मानले आहेत, त्यांचीं नांवें खालीं लिहिल्याप्रमाणें होत. चन्द्र, आपिशलि, शाकटायन, आत्रेय, धनपाल, कौशिक, पुरुषकार, सुधाकर, मधुसूदन, यादव, भागुरि, श्रीभद्र, शिवदेव, रामदेवमिश्र, देव, नंदि, राम, भीम, भोज, हेलाराज, सुभूतिचन्द्र, पूर्णचन्द्र, यज्ञनारायण, कण्व, स्वामी, केशवस्वामी, शिवस्वामी, धूर्तस्वामी, क्षीरस्वामी, तरंगिणी, आभरण, शाब्दिकाभरण, समन्ता, प्रक्रियारत्न, आणि प्रदीप.

**पाणिनीकृत शिक्षा.** हा उच्चारविषयक ग्रंथ आहे, व त्यांत विशेषतः वेदांत आढळणाऱ्या शब्दोच्चाराचें निरूपण आहे.

**अनुभूतिस्वरूपाचार्यकृत[1] सरस्वति प्रक्रिया.** हा व्याकरण ग्रंथ असून, तो सरस्वतीच्या प्रसादानें तयार झाला असल्याविषयीं ग्रंथकाराचें म्हणणें आहे. सुमारें सातशें सूत्रांवर ह्या ग्रंथाची रचना झाली आहे, असें म्हणतात. उत्तर हिंदुस्थानांत ह्या व्याकरणाचा विशेषेंकरून प्रचार आहे. ह्यावर पुंजराज आणि महीभट्ट यांची वृत्ति असून, ह्याखेरीज सिद्धान्तचंद्रिका व पदचन्द्रिका नांवाच्याही व्याख्या आहेत.

---

१ हे व या मागून सांगितलेले इतर वैयाकरण पाणिनीच्या पद्धतीस अनुसरूनच नसल्यामुळें, त्यांचें निराळेंच विवेचन केलें आहे.

**हेमचन्द्र** अथवा **हेमसूरीकृत** हैमव्याकरण. **शब्दानुशासनावर** **लघुवृत्ति** नांवाची जी टीका आहे, ती ह्याचीच असल्याचें दिसतें. हिचे आठ अध्याय आहेत, व शेवटल्या अध्यायांत **प्राकृत** भाषेंतील अनियमित शब्दांचें निरूपण केलें आहे. **हेमचंद्राच्या** व्याकरणावर एक टीकाही आहे.

**अभिनव शाकटायनकृत** शब्दानुशासन. यांत शब्दविवेचन आहे.

**वररुचिकृत प्राकृतचन्द्रिका.** हींत **संस्कृतापासून प्राकृत** बनलेल्या शब्दांचें निरूपण आहे; व **प्राकृत मनोरमा** नांवाची तिच्यावर टीकाही आहे.

**कातंत्र.** ह्यालाच **कलाप** अशी सुद्धां संज्ञा आहे. ह्या व्याकरणाचा **बंगाल्यांत** फार प्रसार असून, ह्यांतील सूत्रें **कुमार** देवाकडून प्राप्त झाल्याविषयीं आख्यायिका आहे. ह्यावर **त्रिलोचनदासकृत कातंत्रपंजिका**, **रघुनंदनआचार्यशिरोमणिकृत कलापतत्वार्णव**, **कातंत्रचन्द्रिका**, **वररुचिकृत चैत्रकुटी**, **हरिरामचक्रवर्त्तिकृत व्याख्यासार**, **रामदासकृत व्याख्यासार**, इत्यादि व्याख्या, आणि **सुषेण**, **कविराज**, **रमानाथ**, **उमापति**, **कुलचन्द्र**, व **मुरारि**, यांच्या देखील टीका आहेत.

**श्रीपतिदत्ताचें कातन्त्रपरिशिष्ट** नांवाचेंही दुसरें एक परिशिष्टादाखल पुस्तक आहे, व त्याजवर **गोपिनाथकृत परिशिष्टप्रबोध**, आणि **शिवरामचक्रवर्तीकृत परिशिष्टसिद्धांतरत्नाकर**, नांवाची टीका आहे.

कातंत्रगणधातु नांवाच्या ग्रंथांत कातंत्रांतील धातू पद्धतशीर लाविले आहेत, व त्याजवर रमानाथकृत मनोरमा नांवाची टीका आहे. याशिवाय, रहसनन्दीकृत कातंत्रषट्कारक, शिवदासकृत कातंत्रउणादिवृत्ति, कातंत्रचतुष्टयप्रदीप, कातंत्रधातुघोषा, कातंत्रशब्दमाला, इत्यादि अनेक ग्रंथ कातंत्रसंबंधाचेच आहेत.

दुर्गसिंहकृत दुर्गसिंही. ही कातंत्रावर टीका आहे. तथापि, हिचा कर्ता दुर्गसिंह नसून, सर्ववर्मा असल्याचें कळतें. मात्र, दुर्गसिंहाची कातंत्रवृत्तिटीका आहे. वोपदेवकृत कामधेनूवरून असें समजतें कीं, दुर्गगुप्ताची दुर्गटीका आणि वर्धमानमिश्राचा कातंत्रविस्तार नांवाचाही ग्रंथ आहे.

क्रमदीश्वरकृत संक्षिप्तसार नांवाचा व्याकरण ग्रंथ बंगाल्यांत प्रचारांत आहे. मात्र, तो कित्येक ठिकाणीं जुमरनंदीनें शुद्ध करून, त्याला त्यानें जौमर असें नामधेय दिलें आहे. त्याजवर गोपीचंद्राची टीका असून, त्या टीकेवर व्याकारदीपिका नामक न्यायपंचाननाची आणि दुसरी एक वंशवादनाची वृत्ति आहे. ह्याखेरीज, संक्षिप्तसार, दुर्घटघटन, शब्दघोषा, धातुघोषा, दुर्गादासकृत सुबोधिनी, मिश्रकृत छाट, वगैरे टीका, व रामानंद, रामतर्कवागीश, मधुसूदन, देवीदास, रामभद्र, रामप्रसादतर्कवागीश, श्रीवल्लभाचार्य, दयाराम, वाचस्पति, भोलानाथ, कार्तिकसिद्धान्त, रतिकंठतर्कवागीश, गोविंदराम, इत्यादींच्या व्याख्या आहेत.

**काशीश्वर** व **नन्दकिशोरकृत** मुग्धबोध परिशिष्ट.

**बोपदेवकृत** कविकल्पद्रुम. ह्यांत धातूंची नामावळी आहे. प्रसाद नामक टीकेवरून, रामव्याकरण नांवाचा ग्रंथ बोपदेवाचाच असल्याचें कळतें.

**बोपदेवकृत** काव्यकामधेनु. ह्यांत सदरहू धातुनामावळीची व्याख्या आहे, व त्याजवर दुर्गादासाची धातुदीपिका नामक वृत्ति, आणि रामन्यायालंकारकृत कविकल्पद्रुम व्याख्या नांवाची टीका आहे.

**राधाकृष्णकृत** धातुरत्नावलि. हा पद्यात्मक ग्रंथ आहे.

**हलायुधकृत** कविरहस्य. हें पद्यात्मक असून, त्यांत सामान्य क्रियापदांचीं उदाहरणें दिलीं आहेत, व त्याजवर एक टीकाही आहे.

**पद्मनाभदत्तकृत** सुपद्म नांवाचें व्याकरण, सुपद्मपरिशिष्ट, सुपद्मधातुपाठ, परिभाषा, उणादिवृत्ति, हीं बंगाल्यांतील कांहीं परगण्यांत चालतात. ह्यावर विष्णुमिश्राची सुपद्म मकरन्द नांवाची टीका आहे. याशिवाय, कंदर्पसिद्धान्त, काशीश्वर, श्रीधरचक्रवर्ती, रामचन्द्र, इत्यादींच्या व्याख्या आहेत. काशीश्वरीगण, व त्याजवरील रामकांताची टीका, असें ह्या संबंधाचेच ग्रंथ होत.

**पुरुषोत्तमकृत** रत्नमाला. हें व्याकरण असून, त्याचा प्रसार कामरूपांत आहे.

**भरतमल्लकृत** द्रुतबोध. हें व्याकरण आहे, व ह्याच ग्रंथकाराची त्याजवर टीकाही आहे. परंतु तें फारसें उपयोगांत नाहीं.

**रामेश्वरकृत** टीकासमेत सुधांशुबोध. हें व्याकरण विशेष प्रचारांत नाहीं.

**जीवघोषस्वामीकृत** हरिनामामृत. हें व्याख्यासहित व्याकरण आहे.

**चैतन्यामृत** नांवाचें ही टीकासमेत व्याकरण असून, ह्याखेरीज **आशुबोध, लघुबोध,** शिघ्रबोध, **सारामृत, दिव्य,** पद्मावली, **उल्का,** अशीं अनेक व्याकरणें आहेत.

**रामनारायण**कृत **कारिकावली.** हें श्लोकबद्ध व्याकरण आहे.

**विमलसरस्वतीकृत** रूपमाला, व **काशीश्वरकृत** ज्ञानामृत, हीं देखील व्याकरणेंच आहेत.

ह्याशिवाय, **भट्टमल्ल, गोविन्दभट्ट, चतुर्भुज, गडिंसिंह, गोवर्धन,** व **शरणदेव,** यांचीं नांवें सुद्धां धातुदीपिकेंत दृग्गोचर होत असून, **व्याघ्रभूति** आणि **व्याघ्रपाद** यांचीं वार्तिकेंही आधारभूत मानलीं आहेत.

ह्यावरून, या भूतलावरील इतर सर्व राष्ट्रांच्या प्रमाणानें, आमच्या भरतखंडांतील **संस्कृत भाषाशास्त्र** हें किती प्रगल्भतेप्रत पोहोंचलें होतें, याची खरी कल्पना वाचकास सहजीं होण्यासारखी आहे.

---

१ **मॉनियर विल्यम्स** म्हणतो,

" To Patanjali, we owe one of the most wonderful grammatical works, that the genius of any country has ever produced, viz the Mahâ-Bhâshya or 'great commentary'. " (Indian Wisdom. P. 177).

**वेबर** लिहितो,

" And grammatical literature in general attained to a most remarkably rich and extensive development. " ( H I. L. P. 226 ).

असो. येथपर्यंत, भाषाशास्त्राच्या आदिशाखेचें यथावकाश निरूपण करून, निरुक्त, व्याकरण, शब्दव्युत्पत्ति, इत्यादि मुख्य अंगांची अवश्य ती माहिती दिली.

भाषाशास्त्राची दुसरी शाखा, व

सबब, आतां, ह्या शास्त्राची दुसरी शाखा जी कोशरचना, तिजकडे वळूं, आणि तत्संबंधीं आमच्या आर्य प्रयत्नाची एकंदर दिशा दाखवूं.

## कोशरचना.

कोशरचनेचे प्रथमांकुर निघंटूंतच दिसून येतात. ह्या निघंटूंचा मुख्य उद्देश म्हटला ह्मणजे, वेदार्थाचें प्रकाशन होय. कारण, वेदांचा अर्थ वेदकालान्तर दिवसानुदिवस दुर्बोध होत चालला, व सामान्य जनांस तर तो केवळ समजण्याचीच मारामार पडूं लागली. तेव्हां, ही अडचण दूर व्हावी, आणि वेदांचें हृद्गत ध्यानांत येण्यास पंचाईतच पडूं नये, ह्मणून अनेक विद्वान एकत्र होऊन, त्यानीं वेदांतील कठिण शब्द एकत्र केले, व त्यांजबरोबरच नेहेमींच्या प्रचारांतले त्यांचे पर्यायशब्दही दिले. त्यामुळें, पुष्कळ शब्दांचा भरणा एकवटला जाऊन, भासमान होत असलेलें दुर्बोधत्व आपोआपच कमी झालें.

कोशरचनेचे प्रथमांकुर.

तथापि, निघंटूंची योजना फक्त वेदपरिभाषा कळण्यासाठींच असल्यामुळें, त्यांचा सार्वत्रिक उपयोग होत नसे, हें उघड आहे. तेव्हां, विद्वज्जनांच्या ध्यानांत ही अडचण येऊन, उद्भवलेली अवश्यकता पुरी पाडण्या-

सामान्य कोशाची अवश्यकता.

साठीं, त्यांनीं आपलें लक्ष्य तिकडे लागलींच पोहोंचविलें, आणि संस्कृत भाषेंतील सर्व शब्दांचा शास्त्रीय कोश तयार केला.

प्राचीन कोशकार.

ह्या शास्त्रीय कोशांसंबंधीं, आदिप्रयत्न कोणाचे व कोणते होते, हें खात्रीपूर्वक निश्चित करण्यास हल्लीं एकही साधन उपलब्ध नाहीं. तथापि, फार प्राचीन काळीं, असे कोशकार होऊन गेले होते, याविषयीं मात्र तिळभर देखील शंका राहत नाहीं. कारण, त्याबद्दलचा स्पष्ट उल्लेख प्रत्यक्ष अमरसिंहानेंच आपल्या कोशांत केला असून, तदाधारेंच आपण आपला ग्रंथ तयार करीत असल्याचें त्यानें लिहिलें आहे.

समाहृत्यान्यतंत्राणि संक्षिप्तैः प्रतिसंस्कृतैः ।
संपूर्णमुच्यतेवर्गैर्नामलिंगानुशासनम् ॥ २ ॥
(अमरकोश. प्र. कां.)

प्राचीन कोशकारांत, अति प्राचीन असा व्याडीच होय, असें वाटतें. कारण, एका कवीनें सुप्रसिद्ध कोशकारांची जी एकंदर नामावलि दिली आहे, तींत व्याडीचें नांव बरेंच वर आहे.

मेदिन्यमरमालाच त्रिकांडो रत्नमालिका ।
रन्तिदेवो भागुरिश्चव्याडिःशब्दार्णवस्तथा ॥
द्विरूपश्च कालिंगश्च रभसःपुरुषोत्तमः ।
दुर्गोऽभिधानमालाच संसारावर्तशाश्वतौ ॥
विश्वोबोपालितश्चैव वाचस्पतिहलायुधौ ।
हारावलीसाहसांको विक्रमादित्य एवच ॥

हेमचंद्रश्चरुद्रश्चाप्यमरोऽयंसनातनः ।
एतेकोशाःसमाख्याताःसंख्याषड्विंशतिः स्मृता ॥

परंतु, व्याडीचें नामधेय अग्रभागीं आहे, येवढेंच कारण त्याच्या अतिप्राचीनत्वाचें खचितच द्योतक नाहीं, ही गोष्ट आम्हांलासुद्धां कबूल आहे. सबब, त्याचें प्राचीनत्व सिद्ध करण्यासाठीं, अन्य मार्गाचें आपण अवलंबन करूं, आणि सर्वमान्य असें दुसरें प्रमाणच आपल्या वाचकांपुढें ठेवूं.

व्याडीचा संग्रह नांवाचा एक सुप्रसिद्ध ग्रंथ असल्याविषयीं, आह्मीं पूर्वींच सांगितलें आहे. (मागें पान २३७ पहा.) ह्या ग्रंथाचा पतंजलीनें आपल्या महाभाष्यांत वारंवार उल्लेख केला असून, त्यांत त्यानें असें ह्मटलें आहे की, "संग्रहे एतत् प्राधान्येन परीक्षितम्"[1] । शिवाय, हा संग्रह ह्मणजे ग्रंथ विशेष होय, असें कैयट व नागोजीभट्ट यांनीं देखील आपल्या व्याकरणवृत्तींत स्पष्टपणें लिहिलें आहे.

पतंजलि आणि व्याडी यांचें प्राचीनत्व.

आतां, अभिमन्यूनें आपल्या कारकीर्दींत पतंजलीचें महाभाष्य सुरू केलें होतें, ही गोष्ट सर्वांस महशूर आहे; आणि तो इ. स. पूर्वीं १२० वर्षांच्या सुमारास राज्य करीत होता, याबद्दल सुद्धां शंका नाहीं. तेव्हां, अर्थातच पतंजलि हा याहि पूर्वीं उदयास आला असून, त्याच्याही अगोदर व्याडी झाला होता, हें उघड आहे. ह्याखेरीज ऋग्वेदप्रातिशाख्यांत देखील शौनकानें त्याचा

१ महाभाष्य. अ० १. पा० १. आ० १.

उल्लेख करून, " व्याडेः सर्वत्राभिधानलोपः" । असें वचन घातलें आहे. यावरून, प्रातिशाख्यापूर्वीचाही व्याडी असल्यामुळें, त्याचें प्राचीनत्व वाचकाच्या लक्षांत सहजीं येईल.

सर्व कोशांत, अमरसिंहाचा अमरकोश हा अग्रणी असून, फारच प्रसिद्ध आहे. सबब, तत्संबंधीं अवश्य ती माहिती येथें देतों.

अमरसिंहाचा काल.

अमरसिंहाचा काल अजूनही निश्चित नाहीं. कारण, कोणी म्हणतात कीं, तो विक्रम राजाच्या नवरत्नांपैकीं एक होता, व कांहींचें असें मत आहे कीं, तो इ. स. च्या सहाव्या शतकांतला असावा. पहिली गोष्ट खरी असल्यास, तो इ. स. पूर्वी ५६ वर्षांच्या सुमारासच उदयास आला पाहिजे. कारण, तोच अति विख्यात विक्रम राजाचा काल होय. ह्या नामांकित राजाच्या दिव्य सभेंत, ज्ञानतेजानें सदैव चमकणारीं रत्नें खालीं लिहिल्याप्रमाणें असत:—

> धन्वंतरिः क्षपणकोऽमरसिंहशंकू
> वेतालभट्टघटखर्परकालिदासाः ।
> ख्यातो वराहमिहिरो नृपतेः सभायां
> रत्नानिवै वररुचिर्नव विक्रमस्य ॥

अमरकोशांतील विषयानुक्रम.

अमरसिंह हा बौद्धधर्मानुयायी असल्याचें पुष्कळांचें मत आहे. ह्यानें केलेल्या कोशाचीं तीन विस्तृत कांडें आहेत. सबब, त्यांतील विषयानुक्रम खालीं लिहिल्याप्रमाणें देतों.

**प्रथमकांड.** १ परिभाषा. २ स्वर्गवर्ग. ३ व्योमवर्ग. ४ दिग्वर्ग. ५ कालवर्ग. ६ धीवर्ग. ७ शब्दादिवर्ग. ८ नाट्यवर्ग. ९ पातालभोगिवर्ग. १० नरकवर्ग. ११ वारिवर्ग.

**द्वितीयकांड.** १ भूमिवर्ग. २ पुरवर्ग. ३ शैलवर्ग. ४ वनौषधिवर्ग. ५ सिंहादिवर्ग. ६ मनुष्यवर्ग. ७ ब्रह्मवर्ग. ८ क्षत्रियवर्ग. ९ वैश्यवर्ग. १० शूद्रवर्ग.

**तृतीयकांड.** १ विशेष्यनिघ्नवर्ग. २ संकीर्णवर्ग. ३ नानार्थवर्ग. ४ अव्ययवर्ग. ५ लिंगादिसंग्रहवर्ग.

संस्कृत कोशकारांची नामावली.

अस्तु. शेवटीं, संस्कृत कोशकार व त्यांजवरील टीकाकार यांनीं भाषाशास्त्रविषयक बरेच परिश्रम केले असल्यामुळें, त्यांचीं उपलब्ध असलेलीं नांवें देऊन, भाषाशास्त्राची ही दुसरी शाखा पुरी करतों. हीं नांवें खालीं लिहिल्याप्रमाणें होतः—

१ अजय. २ अनेकार्थध्वनिमंजरी. ३ हेमचंद्रकृत अभिधानचिंतामणी. ४ अभिधानमाला. ५ अमरदत्त. ६ अमरसिंहकृत अमरमाला. ७ अरुण. ८ इन्दुकोश. ९ उत्पलिनी. १० उष्मविवेक. ११ जैनपुरुषोत्तमदेवकृत एकाक्षरकोश. १२ कलिंग. १३ कल्पतरु. १४ केशवकृत कल्पद्रु. १५ कात्य. १६ कात्यायन. १७ गंगाधर. १८ गोवर्धनकोश. १९ चन्द्रकोश. २० चरककोश. २१ तारपाल. २२ जैनपुरुषोत्तमदेवकृत त्रिकांडशेष. २३ त्रिविक्रम. २४ दामोदरकोश. २५ दुर्गकोश. २६ देशिकोश. २७ द्विरूपकोश. २८ धनंजय. २९ धनपाल. ३० धन्वंतरी. ३१ धरणीदासकृत धरणीकोश. ३२ धर्मदास. ३३ नानार्थध्वनिमंजरी. ३४ भास्क-

रकृत नानार्थरत्नमाला. ३५ नामनिधान. ३६ नाममाला. ३७ अमरसिंहकृत नामलिंगानुशासन. ३८ पालकोश. ३९ पुद्गलकोश. ४० भरतमाला. ४१ भागुरिकोश. ४२ भुग्न. कोश. ४३ भोगींद्रकोश. ४४ मंखकोश. ४५ माधवकोश. ४६ मुकुट. ४७ श्रीधरकृत मुक्तावली. ४८ मनुकोश. ४९ मेदिनी. ५० यादव. ५१ रत्नकोश. ५२ दंडाधिनाथोप-नामक–इरुगप्पकृतारत्नमाला. ५३ हलायुधकृतारत्नमाला. ५४ रंतिदेव. ५५ रभस. ५६ राजदेव. ५७ राजमुकुट. ५८ रुद्रकोश. ५९ वररुचि. ६० वाचस्पति ६१ विक्रमादित्य. ६२ विश्वकोश. ६३ विश्वप्रकाश. ६४ विश्वरूप. ६५ विश्व-लोचन. ६६ वैजयन्ती. ६७ वो (बो) पालित. ६८ व्याडी. ६९ मयुरेशकृत शब्दरत्नावलि. ७० शब्दार्णव. ७१ शाश्वत. ७२ शुभांक. ७३ संसारावर्त. ७४ सज्जनकोश. ७५ सर्वधर. ७६ साहसांक. ७७ सुभूतिकोश. ७८ सोमनन्दि. ७९ हर-कोश. ८० जैनपुरुषोत्तमदेवकृत हारावली.

## साहित्य.

आतां, भाषाशास्त्राच्या तिसऱ्या शाखेकडे आपण आपली दृष्टि क्षणभर देऊं, आणि तींत आमच्या पूर्वजांनीं कितीसे परिश्रम केले आहेत, याचा विचार करूं.

साहित्यशास्त्रांतील बाबी.

ह्या शाखेंत मुख्यत्वेंकरून तीन गोष्टींचाच अन्तर्भाव होतो. १ छन्द, २ काव्य, आणि ३ अलंकार. छन्दशास्त्राचे बीजांकुर सूत्रांत उपलब्ध होतात. इतकेंच नव्हे तर, तद्विषयक बहुलसामग्री व विपुल उपकरणें हीं सर्व त्यांतच इतस्ततः अवकीर्ण झालेलीं दृष्टीस पडतात; आणि त्यावरून

तत्कालीन ऋषींस छन्दाचें ज्ञान चांगलें असल्याचें व्यक्त होतें. पण हातच्या कांकणाला आरश्याची जरूरच नाहीं, व ज्या गोष्टी स्वयमेव सिद्ध आहेत, त्यांजला अशा बाह्य पुराव्याची देखील अपेक्षा नाहीं. कारण, कित्येक छन्दांचीं नांवें तर प्रत्यक्ष ऋग्वेदांतच आढळून येतात.

छन्दाचें पौराणत्व.

असो. आमच्या पुराणतम ऋग्वेदांतील कित्येक ऋचांचे छन्द त्या प्राक्कालीन ऋषिवर्यांस इतके हृदयवेधक आणि चित्ताकर्षक वाटत असत कीं, त्यांचें अनुपम माधुर्य, व अखिल विश्वाचा सुश्राव्य आणि अप्रतिहत स्वरसंवेद, यांचें केवळ ऐक्यच आहे, अशी त्यांची निःसंशय कल्पना असे.

निदानसूत्रांत छन्दश्शास्त्राचें सम्यक् विवेचन असून, अनुक्रमणींत ऋग्वेदांतल्या सूक्तांचे प्रणेत्ते, ऋचांचे छन्द, व त्यांच्या देवता, यांसंबंधाचा तपशील मंडलांच्या अनुक्रमानेंच दिला आहे.

साहित्य अथवा छन्द, काव्य, आणि अलंकार शास्त्रावर, खालीं लिहिलेले ग्रंथकार व त्यांच्या कृती सुप्रसिद्ध आहेत.

छन्द, काव्य, आणि अलंकारावरील ग्रंथ.

पिंगलानें छन्दशास्त्र रचलें आहें; व पिंगल हाच पतंजलि असल्याचें कित्येकांचें मत आहे. त्याप्रमाणेंच खरें असेल तर, त्याचा काल इ.स. पूर्वीं १४४पासून १२०वर्षांपर्यंत असावा, असें वाटतें. दंडीकृत काव्यदर्श इ. स. च्या सहाव्या शतकांतील असून, धनंजयकृत दशरूप हें इ. स. च्या दहाव्या शतकांतील आहे. भोजदेवकृत सरस्वातिकंठाभरण; इ.स. चें अकरावें शतक. मम्मतकृत काव्यप्रकाश; इ. स. चें बारावें शतक.

ह्याजवरच गोविन्दकृत काव्यप्रदीप नांवाची व्याख्या आहे. वामनकृत काव्यालंकारवृत्ति; इ. स. चें बारावें शतक. विश्वनाथकृत साहित्यदर्पण; इ. स. चें पंधरावें शतक.

तात्पर्य, भाषाशास्त्राच्या या शाखेंतसुद्धां आम्ही बिलकुल मागें नव्हतों, असें कोणाच्याही लक्षांत सहजीं येईल.

भारतेतर पौरस्त्यांचे भाषाशास्त्राच्या कामीं प्रयत्न.

असो. याप्रमाणें, भाषाशास्त्राच्या कामीं, आमच्या भारतीयांच्या परिश्रमाचें सामान्य दिग्दर्शन केलें. सबब, आम्हांखेरीज अन्य पौरस्त्यांनीं एतद्विषयक कशा प्रकारचे प्रयत्न केले, याचा आतां थोडक्यांत विचार करूं.

बौद्धधर्माचा प्रसार व संस्कृत भाषेची अभिवृद्धि.

इ. स. पूर्वी ६०० वर्षांच्या अगोदर, भरतखंडांत एक विलक्षण धर्मक्रान्ति होऊन गेली, हें वाचकास माहीत असेलच. ह्या धर्मक्रान्तीनें बौद्धधर्माचा फैलाव झपाट्यानें झाला, आणि तो पूर्वेकडील चीनसमुद्र व त्याच्याही पलीकडील स्थीरमहासागरापासून तों थेट पश्चिमेकडे व्होलगा नदीपर्यंत जाऊन थडकला. अर्थात्, पूर्वेकडील ब्रह्मदेश, चीन, व जपान, आणि उत्तरेकडील तिबेट, या देशांत ह्या धर्माचा प्रवेश विशेष झाला; व त्यामुळें, त्या त्या देशांतील लोकांना ह्या धर्माचें रहस्य कळण्याची जि-

---

१ ह्यासंबंधानें प्रोफेसर वेबर म्हणतो:—

For the rest, in the field of rhetoric and poetics, the Hindu Mind, so fertile in nice distinctions, has had free scope, and has put forth all its power, not seldom in an extremly subtle and ingenious fashion. ( History of Sanskrit Literature. P. 232. )

झासा होऊन, ती दिवसानुदिवस प्रबल होत चालली. परंतु, ती एकदम सफल होण्याला मार्गच नव्हता. कारण, ह्या धर्माचीं बहुतेक पुस्तकें संस्कृतांतच लिहिलेलीं होतीं, आणि ही भाषा कठिण असल्यामुळें ती समजण्याची अडचण पडे.

चिनीलोकांची संस्कृताविषयींची अभिरुचि.

तथापि, नूतनधर्मविषयककुतूहल जागृत झाल्यानें, संस्कृत शिकण्याची अभिरुचि कालान्तरानें उत्पन्न होऊन, ह्या अमूल्य भाषेचें ज्ञान संपादन करण्यासाठीं, चीन देशांतले कित्येक लोक प्रवृत्त झाले; आणि तिकडून बरेच लोक भरतखंडांत येऊं लागले. त्यायोगानें, संस्कृतभाषेचें ज्ञान फैलावलें, व अनेक धर्मग्रंथांचीं भाषान्तरेंही झालीं.

बौद्ध धर्मामुळें प्राकृत भाषांस उत्तेजन.

शिवाय, ह्या धर्माचीं मूलतत्त्वें लोकांच्या व्यावहारिक भाषेंतच त्यांस समजावून दिलीं पाहिजेत, अशी बुद्धाची आज्ञाच असल्यानें, पाली, मागधी, वगैरे अनेक प्रचलित भाषांतच धर्मसंबंधीं नानाविध ग्रंथ रचण्यांत येत, आणि त्या कारणानें, त्या त्या भाषांतून, तिबेटी, ब्रह्मी, चिनी, व जपानी, या भाषांत त्यांचीं भाषान्तरें होत. त्यामुळें, कांहींअंशीं भाषाशास्त्राला दुहेरी साहाय्य झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, एकतर संस्कृत भाषेची अभिरुचि भिन्नभिन्न प्रांतांत आणि दुरदूरच्या देशांत वाढत

[१] सिंहलद्वीपांतील वाङ्मयांत, धर्मग्रंथाच्या ह्या पवित्र भाषेला जिनवचन अशी संज्ञा आहे. जिनवचन म्हणजे बुद्धाची भाषा होय. महावंशांत पालीभाषेला धर्मग्रंथ अशीच संज्ञा आहे. कचित्, तंति या नांवानें देखील ती सुप्रसिद्ध आहे. आणि मागधीला कोठें कोठें मूलभाषा देखील म्हटलें असल्याचें आढळून येतें.

चालली; दुसरें असें कीं, त्या योगानें देशी भाषांचा फैलाव होण्यास विलक्षण प्रोत्साहन मिळालें; व तिसरें हें कीं, ह्या भाषा संस्कृतापासूनच उद्भवल्या असल्यामुळें, मूळ शब्दांत कसकसें स्थित्यन्तर आणि रूपान्तर होत गेलें, हें समजण्याला चांगलें साधन उपलब्ध झालें.

बौद्ध धर्मोपदेशकांचें चिनांत गमन.

इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत, कित्येक बौद्ध धर्मोपदेशक बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठीं, भरतखंडांतून चिनांत गेले होते. तेथें जाऊन दाखल झाल्यावर, ते केवळ वरवरच धर्माचा उपदेश करून स्वस्थ बसले, असें नाहीं. तर, त्यांनीं ठिकठिकाणीं देवालयें बांधिलीं, व त्यांत बुद्धाच्या मूर्तीसुद्धां बसविल्या. ह्याचें प्रत्यन्तर आपल्याला चिनी ग्रंथांतही आढळून येतें; आणि इ. स. पूर्वी २१७ सालांत तर, ती गोष्ट चिनी बखरींत देखील नमूद केलेली दृष्टीस पडते. शिवाय, इ. स. पूर्वी १२० वर्षांच्या सुमारास, गोबीच्या उत्तरेस व अजूबाजूलाही, बौद्धधर्माचा बराच प्रसार झाला असल्याचें उघड होतें. कारण, गोबी नामक वालुकामय प्रदेशाच्या उत्तरेकडील टापूंत राहणाऱ्या रानटी लोकांचा पराभव एका चिनी सरदारानें केल्यावर, जयाचिन्हाचें सूचक म्हणून बुद्धाची एक सुवर्णमूर्तिच त्यानें तिकडून आणिली होती.

बुद्धाविषयीं चिनी लोकांची पूज्यबुद्धि.

बुद्ध म्हणजे केवळ परब्रह्मच होय, अशी चिनी लोकांची समजूत आहे. आणि म्हणूनच ते त्याला फोहुफो म्हणतात. चिनी भाषेंत ब्रह्माला फान् अशी संज्ञा आहे. तथापि, फान् हा "फान्-लान्-मो" चा अपभ्रंश अस-

त्याचें दिसतें; व त्याचा अर्थ ब्रह्म असा होतो. ह्यालाच क्वचित् ठिकाणीं, फान्‌चू (म्हणजे ब्रह्माक्षर) असेंही म्हटल्याचें आढळून येतें, व त्यावरून बुद्धाच्या ठिकाणीं चिनी लोकांचें प्रेम उत्तम रीतीनें व्यक्त होतें.

बौद्धग्रंथ उपलब्ध होण्यासाठीं चिनीबादशहाचे प्रयत्न, व भरतखंडाशीं दळणवळण.

इ. स. ६९ नन्तर, बौद्धधर्माला चिनांत राजाश्रय मिळाला, आणि त्यामुळें, त्याचीं तत्त्वें व तत्संबंधीं एकंदर ग्रंथसंपत्ति उपलब्ध होण्यासाठीं, मिंगटी नांवाच्या चिनी बादशहानें साई-इन् व दुसरे कामगार हिंदुस्थानांत पाठवून, मातंग आणि चो-फा-लान हे दोन विद्वान बौद्ध, त्या कामीं लाविले. त्यानंतर, बौद्धधर्माची चिनी भाषेंत पुष्कळच भाषान्तरें झालीं, व तेव्हांपासून भरतखंड आणि उत्तरेकडील आशिया यांच्या दरम्यान, हिमालयाच्या खिंडींतून, धर्मविषयक दळणवळण विलक्षण रीतीनें सुरू झालें. ज्याप्रमाणें आम्हां भारतीयांस काशीक्षेत्राचें विशेष महत्व वाटतें, त्याचप्रमाणें चिनी लोक भरतखंडाला पवित्र मानीत. सुमारें तीनशें वर्षांनंतर चिनांतून भरतखंडांत अनेक यात्रेकरी येऊं लागले; व ह्यापैकींच फाहियन् हा एक होय. हा ठिकठिकाणीं फिरला, आणि मोठ्या परिश्रमानें हरतऱ्हेची माहिती त्यानें मिळविली. चीन देशांतूनही अनेक राजदूत इकडे पाठविण्यांत येत, व धार्मिक, सामाजिक, नैतिक, राजकीय, पौराणिक, प्राचीन, अर्वाचीन, इत्यादि नानाप्रकारचा आहवाल ते आपल्या बादशहास जाहीर करीत.

फाहियन् हा इ. स. ३९० च्या आंत बाहेर भरतखं-

फाहियन व इतर चिनी प्रवाशी.

डांत आला असून, त्याच्या प्रवासवर्णनाचें भाषान्तर ए. टीमुसट्नें फ्रेंचमध्यें केलें आहे. फाहियन् नन्तर होयसंग आणि सोंगयून हे इकडे आले. ह्यांना, इ. स. ५१८ सालीं, पाठविण्यांत आलें होतें, व बौद्धधर्मग्रंथ आणि बुद्धाच्या उपलब्ध होणाऱ्या वस्तू, यांचा संग्रह करण्याविषयीं चीनच्या बादशाहिणीचा त्यांजला हुकूम होता. पुढें, कांहीं कालानें, हूणसंग आला, व त्यानें इ. स. ६२९ पासून ६४५ पर्यंत सर्व भरतखंडांत प्रवास केला. ह्याचें प्रवासवर्णन फारच मनोवेधक आहे, आणि त्याचें भाषान्तर एम्. स्टॉनिलास् जूलियन्नें केलें आहे. हूणसंग नन्तर, इ. स. ७३० च्या सुमारास एकदां छप्पन यात्रेकऱ्यांची टोळी, व इ. स. ९६४ सालीं, खीनी आणि दुसरे तीनशें प्रवाशी येथें आले होते, व त्यांची प्रवासवर्णनें देखील प्रसिद्ध झालीं आहेत.

अरबस्थान, इराण, वगैरे ठिकाणीं संस्कृत भाषेचा प्रसार.

याप्रमाणें, पूर्वेकडे अगदीं स्थीरमहासागरापर्यंत ज्यांची वस्ती आहे, अशा विशाल राष्ट्रांत सुद्धां, संस्कृत भाषेचें ज्ञान संपादन करण्याच्या कामीं कसकसे परिश्रम करण्यांत आले होते, याचें सामान्य दिग्दर्शन झालें. सबब, अरबस्थान, इराण, वगैरे ठिकाणीं, ह्या प्रौढ व सर्वोपयोगी भाषेचें ज्ञान उपलब्ध व्हावें म्हणून, कोणत्या दिशेनें यत्न चालले होते, हें यथावकाश पाहूं.

भारतीय ज्योतिष ग्रंथाचें भाषान्तर.

इ. स. ७७३ सालीं, आब्बासिद्धी खालीफ आलमंसूर याजकडे, भरतखंडांतून एक नामांकित ज्योतिःशास्त्रज्ञ आरबस्थानांत गेला होता. ह्यानें नक्षत्रांचे वेध, सूर्य

व चन्द्र ग्रहणाचा काल, इत्यादि संबंधीं बरेच महत्वाचे शोध केले होते. त्यामुळें, त्यांची खरी उपयुक्तता खालीफ मजकूरच्या लक्षांत येऊन, त्यानें त्या ग्रंथांचें भाषांतर करण्याविषयीं हुकूम केला. तदनन्तर, महमद बिन इभ्राइम अलफझारीनें हें जोखमीचें काम आपल्या शिरावर घेतलें, आणि ह्या ज्योतिष ग्रथाचें भाषान्तर झाल्यावर, त्यानें त्याला सिन्द-हिन्द असें नामधेय दिलें. ह्यालाच हिन्द-सिन्द अशी देखील संज्ञा आहे, व हा शब्द सिद्धान्त शब्दाचा अपभ्रंश असल्याचें दिसतें. कोलब्रूकचें असें मत आहे कीं, ब्रह्मगुप्तानें ब्रह्मसिद्धान्त नांवाचा जो ग्रंथ केला आहे, त्याचेंच सिद्ध-हिन्द हें अपभ्रष्ट रूप होय. तथापि, बेनआल आदमीचा अभिप्राय याहून भिन्न असून, तो असें म्हणतो कीं, सिन्द-हिन्दचा अर्थ परिवर्तियुग असा होतो. हें भाषान्तर इ. स. ७७१ सालीं तयार झालें असल्याविषयीं आलबिरूणीचें मत आहे.

सुश्रुतादि वैद्यकीय ग्रंथांचें इराणींत भाषांतर.

ह्याच सुमारास याकुब बिन थारेक यानेंही विद्यावृद्धि आणि ज्ञानप्रसाराच्या कामीं, इराणांत थोडीबहुत चळवळ आरंभिली होती, असें दिसतें. कारण सिन्दे-हिन्दवरून त्यानें एक ज्योतिषग्रंथ तयार केला असून, संस्कृतांतील अन्य ग्रंथांतून भाषांतर करण्याचें कामही झपाट्यानें सुरू होतें. हारूण आल राशीद हा तर एकंदर खालिफांत फारच विद्वान, मर्मज्ञ, व शोधक असे. इतकेंच नव्हे तर, त्याला विद्येची विशेष गोडी आणि विलक्षण अभिरुचि होती. त्यामुळें, त्याच्या पदरीं अनेक पंडित व शास्त्रज्ञ असत. इ. स.

[1] Reinaud l. c. P. 314.

७८६ ते ८०९ पर्यंतच्या मुदतींत, त्याच्याकडे मंका आणि साले नांवाचे भरतखंडांतले दोन सुप्रसिद्ध वैद्य होते. ह्यापैकीं, मंकानें सुश्रुताचें संस्कृतांतून इराणींत भाषान्तर केलें. ह्याशिवाय, अनेक विषयांवर जो एक संस्कृत ग्रंथ[1] लिहिलेला होता, त्याचाही त्यानें इराणींत तरजुमा केला. कोणी एक कंक[2] नांवाचा ज्योतिषी सुद्धां हरूण आलराशीदच्या पदरीं होता, असें आलबीरूणीचें ह्मणणें आहे; आणि हाच भिषक् असल्याचेंही कित्येक सांगतात. तसेंच, मंकबा नांवाचा दुसरा वैद्य देखील त्याच्याच दरबारीं होता, अशा विषयीं रीनॉडचा लेख आहे.

बीजगणिताचें भाषान्तर.

तदनन्तर, खालीफ अल मामम्च्या कारकीर्दीत, बीजगणिताचें भाषान्तर झालें, व तें महमद बिन मूसानें संस्कृतांतून आरबींत केलें. हें एफ् रोझेन्नें संशोधन करून इ. स. १८३१ सालीं छापलें होतें. इ. स. ९८७ सालीं, चरकाचें भाषांतर संस्कृतांतून इराणींत आणि इराणींतून आरबींत झालें असल्याविषयीं फेरिस्तांत सांगितलें आहे.

आलबिरूणीचा भरतखंडांतील प्रवास, त्याचें संस्कृत ज्ञान, व लेख.

पुढें, इ. स. १००० च्या सुमारास, अबू रिहन आलबिरूणी हा भरतखंडांत आला, आणि त्यानें ह्या देशांत चाळीस वर्षें घालविलीं. ह्याचें जन्म इ. स. ९७० सालीं झालें, व तो इ. स. १०३८

---

१ ह्या ग्रंथाचा प्रणेता चाणक्य असल्याचें सांगतात; व ह्याचेंच हीब्र्यूंत देखील भाषान्तर झालेलें आहे. चाणक्याचा हीब्र्यूंत आणि इतर पाश्चात्य भाषांत झनिक असा अपभ्रंश झाल्याचें दिसतें.

२ रीनॉड. ( Reinaud. Memoire. Sur. l Inde. P. 315 Paris. 1849.

ध्या वर्षी मरण पावला. हा भरतखंडांत होता त्या मुदतींत बराच फिरला, आणि विशेष शोध करून, हिंदूंची विद्या, त्यांचीं शास्त्रें, त्यांच्या कला, व त्यांची अगाध ग्रंथसंपत्ति, इत्यादिसंबंधीं त्यानें तपशिलवार आणि साद्यन्त माहिती मिळविली, व तरीखुल-हिन्द नांवाचा एक नांवाजण्यालायक ग्रंथही लिहिला. ह्यांत हिंदूंच्या वाङ्मयाची इत्थंभूत हकीकत आहे. आलबिरूणी हा संस्कृतांत फारच निष्णात असल्याचें दिसतें. कारण, त्यानें सांख्य आणि योगदर्शनाचें संस्कृतांतून आरबींत भाषान्तर केलें आहे. इतकेंच नव्हे तर, दुसऱ्या दोन आरबी ग्रंथांचा, त्यानें आरबींतूनही संस्कृतांत तरजुमा केला. त्यानंतर, इ. स. ११५० च्या सुमारास, अबुसालेनें राजनीतीचें संस्कृतांतून आरबींत भाषांतर केलें; व पुढें दोनशें वर्षांनीं नगरकोट हें फेरोजशहाच्या हस्तगत झाल्यावर, दुसऱ्याही अनेक संस्कृत ग्रंथांचीं भाषान्तरें करण्यांत आलीं; आणि मौलान इज़द्दीन खलितखानी यानें तें काम मोठ्या झपाट्यानें चालविलें. इ. स. १८३१ सालीं, शालिहोत्राचा अश्वचिकित्सेवर जो ग्रंथ होता, त्याचें भाषान्तर झालें, व त्याची एक नक्कल लखनो येथील राजग्रंथालयांत ठेविली. शालिहोत्र हा सुश्रुताचा शिक्षक असून, तो नामांकित अश्वचिकित्सक होता. आणि म्हणूनच, त्याच्या नांवाचा उल्लेख विष्णुशर्म्यानें पंचतंत्रांत व गर्गानें अश्वायुर्वेदांत केल्याचें दिसतें. अश्वचिकित्सेवर चाणक्याचाही एकादा ग्रंथ आहेसें वाटतें. कारण, त्याचा उल्लेख हाजीचाल्फानें केला आहे.

राजनीतीचीं व दुसरीं भाषांतरें.

[1] Elliot's Historians of India. P. 96.

अकबरच्या कारकीर्दींत संस्कृतास प्रोत्साहन.

अकबरच्या कारकीर्दींत तर, संस्कृत भाषेचा याहीपेक्षां विशेष रीतीनेंच फैलाव झाला. ह्यानें इ. स. १५५६ पासून १६०५ पर्यंत राज्य केलें, आणि जरी तो जन्मतः मुसलमान होता, तरी तो धर्मवेडा नसल्यामुळें, सर्व धर्मांतलीं मुख्य तत्त्वें जाणण्याची त्याला मोठी हौस असे; व त्यांतही खरें काय आहे, याचा तो निरंतर शोध करी. त्यायोगानें, हिन्दु, मुसलमान, पारसी, यहुदी, आणि ख्रिस्ती, वगैरे नानाविध धर्मांचें तो मोठ्या अगत्यानें परिशीलन करी,[1] व त्याच कारणानें, सर्व धर्मांतील लोकांस त्याचें दरबार खुलें असे.

रामायण, महाभारत, इत्यादींचें भाषान्तर.

अकबराला स्वतः लिहितां वाचतां येत नव्हतें. तथापि, तो मोठा रसिक होता. त्यामुळें, रामायण,[2] महाभारत, अमरकोश, आणि दुसरे उत्कृष्ट संस्कृत ग्रंथ, यांचें इराणींत भाषान्तर करण्याविषयीं, त्यानें हुकूम केला. हजी इब्राहीम शिरहिन्दीनें अथर्ववेदाचेंही[3] भाषान्तर केलें. परंतु, सामवेद, यजुर्वेद, व सर्वांत पुराणतम आणि श्रेष्ठतम जो ऋग्वेद, त्याचें भाषान्तर मुळींच होईना. कारण, त्याची पवित्रता, व त्याचें अपौरुषत्व, हीं ब्राह्मणांच्या, किंबहुना अखिल हिंदुराष्ट्राच्याच हृत्पटिकेवर विलक्षण रीतीनें बाणलीं असल्यामुळें, ते त्याचा अर्थ प्रकट करण्यास हर-

1 Mullbauer. Catholic Mission. s. 134.

2 Elliots Historians of India. P. P. 248. 259-260.

3 Max Mullers History of Ancient Sanskrit Literature. P. 327.

कत करूं लागले; आणि ब्राह्मणांखेरीज तर, त्याचा अर्थ होणें अगदीं शक्यच नव्हतें.

वेदाच्या भाषान्तरास हरकत, व ती दूर करण्यासाठीं अकबराचे प्रयत्न.

अशा प्रकारें, वेदांचें भाषान्तर होण्याला खरी अडचण असल्यानें, त्याचीं तत्वें व त्यांतील मथितार्थ कळण्याला मार्गच राहिला नव्हता. परंतु, त्यांचा तरजुमा होण्याला जितका जितका अडथळा येऊं लागला, तितकें तितकें त्यांचा अर्थ समजण्याविषयींचें अकबरचें कुतूहल अधिकाधिकच वाढत चाललें. त्यानें ब्राह्मणांची प्रार्थना केली; त्यांजला अमुल्य देणगी देण्याचें अभिवचन दिलें; त्यांजला इनाम व जहागिरी देण्यासही तो तयार झाला; आणि शेवटीं, आपल्या पातशाहीच्या जोरावर त्यांस शासन करण्याची देखील त्यानें भीति घातली. परंतु, ह्या साम, दाम, दंड, व भेदाचा कांहींएक उपयोग झाला नाहीं; आणि वेदाचा अर्थ सांगण्याचें किंवा त्यांचें भाषान्तर करण्याचें ब्राह्मणांनीं साफ नाकारलें.

साम, दाम, दंड, व भेदाची निष्फलता, आणि कपटाची योजना.

याप्रमाणें, अकबरचा हेतु कोणत्याही उपायांनीं सिद्धीस न गेल्यामुळें, त्याची मति अगदीं कुंठित झाली. तथापि, धीरसे गंभीर, या ह्मणीप्रमाणें त्यानें आपली हिंमत सोडली नाहीं. त्यानें आणखी एक युक्ति काढून कपट रचलें, व फीझी नांवाचा मुलगा, पोरका पोर परंतु ब्राह्मण कुळांतला आहे, असें जाहीर करून, त्याला श्रीक्षेत्र काशी येथें ब्राह्मणांपाशीं सोडून देण्याविषयीं, हुकूम फर्माविला. आईबापाविरहित हें पोरकें पोर पाहून, काशींतील ब्राह्मणांस त्याची दया

आली, आणि त्याचीं शुश्रूषा, विद्याभ्यास, व संगोपन होण्यासाठीं, त्याला एका विद्वान ब्राह्मणाच्या घरीं ठेवण्याचें ठरलें. ह्या ब्राह्मणानें त्याचें योग्य पालन पोषण केलें, व दहा वर्षं त्याजकडून वेदाध्ययन करविलें. इतकेंच नव्हें तर, त्यानें त्याला प्रत्यक्ष पोराप्रमाणें आपल्या मुलीबरोबरच कांहीं एक किंतु मनांत न बाळगितां वाढविलें. कालान्तरानें, तीं दोन्हीं मुलें मोठीं झालीं, आणि एकमेकांवर प्रेम करूं लागलीं. त्यामुळें, त्या वृद्ध ब्राह्मणास त्यांचें कौतुक वाटून, त्या मुलीचें पाणिग्रहण त्या मुलाशीं करण्याचा त्यानें घाट घातला. हें निष्कपट व प्रेमाचें वर्तन पाहून, फीझीला खरोखरच गहिंवर आला, आणि जरी त्याचें अकृत्रिम प्रेम त्या ब्राह्मणाच्या मुलीवर जडलें होतें, तरी गुरूच्या ठायीं असलेल्या कृतज्ञतेमुळें, खरी वस्तुस्थिति गुरूच्या पुढें साद्यन्त मांडण्याचा त्यानें निश्चय केला. तदनंतर, घडून आलेली इत्थंभूत हकीकत त्याजपाशीं निवेदन करून, कृतापराधाची क्षमा होण्यासाठीं, त्यानें त्याला शिरसाष्टांग नमस्कार घातला. ही सर्व हकीकत क्रोधायमान न होतां, त्या ब्राह्मणानें अगदीं शान्तपणें ऐकून घेतली. परंतु, अद्विजावर आणि अतएव अपात्रस्थलीं वेदाध्यापनाचे संस्कार झाले असें मनांत येऊन, त्याला अतिशय पश्चात्ताप झाला, व त्यासरशीच असलेली सुरी त्यानें आपल्या पोटांत खुपसली. परंतु फाझीनें ती त्याच्या हातांतून तत्काळ हिसकावून घेतली; नाहीं तर त्याचा तत्क्षणींच मोक्ष झाला असता.

तिचें निरर्थकत्व.

असो. हा दुर्धर आणि घोर प्रसंग टळल्यावर, फीझीनें त्या वृद्ध गुरूचें सान्त्वन केलें, व कृतापराधाबद्दल हवें तें प्रायश्चित्त भोग-

ण्यास तो तयार झाला. त्यावेळीं, हा ब्राह्मण डोळयांत अश्रू आणून बोलला कीं, " वेदांचें अथवा अन्य पवित्र आर्य-धर्मपुस्तकांचें भाषान्तर न करण्याविषयीं, किंवा ब्राह्मण धर्मोचें इंगित व रहस्य कोणासही न कळविण्याबद्दल, जर तूं शपथ घेशील, तरच तूं केलेला हा महान अपराध मी क्षमा करीन." हें एकून फीझीनें ती गोष्ट ताबडतोब कबूल केली, आाणि वेदांचा तरजुमा करण्याच्या कामीं अकबर बाद-शहानें केलेले सर्व प्रयत्न जेथल्या तेथें तसेच थिजून गेले[1].

अन्य धर्मांतील पवित्र ग्रंथांचें भाषांतर.

पुढें, वेदांचें भाषान्तर करण्याचा नाद अकबरनें सो-डून दिला. तथापि, त्यावेळीं, संस्कृत विद्येची अभिरुचि त्यास विशेष लागली असल्यामुळें, संस्कृत भाषेचा फैलाव ज्यारीनें होत चालला होता. अन्य धर्माकडे देखील त्याचें लक्ष्य होतेंच. त्या कारणानें, त्या धर्मांतील पवित्र म्हणून मानलेल्या अनेक पुस्तकांचे तरजुमे होऊन, त्याबरोबरच खिस्ती धर्माच्या नव्या करारांचेंही भाषान्तर झालें[2]. त्या-नन्तर, सुमारें शंभर वर्षांनीं, शहाजहानचा वडील मुलगा जो दारा, त्याला सुद्धां संस्कृतची विशेष गोडी लागली, आाणि त्यानें देखील उपनिषदें व दुसरे वेदान्तविषयक ग्रंथ, यांचें संस्कृतांतून इराणींत भाषांतर केलें. हें इ. स. १६५७–५८ सालीं तयार[3] झालें, व तदनन्तर एक

---

१ पौरस्त्य व पाश्चात्य हिंदिवेटांतील यूरोपस्थांच्या वसाहतींचा इतिहास. डब्लिन. इ. स. १७७६. पु. १. पा. ३४. (जे. जस्टमॉण्डकृत.)

२ Elliot's Historians of India. P. 248.

३ Proceedings, Asiatic Society, Bengal. 1870. P. 252.

वर्षानेंच औरंगजेबनें दाराला केवळ राज्यलोभाला गुंतून ठार मारिलें. ह्या इराणी भाषान्तराचा तरजुमा इ. स. १७९६ सालीं फ्रेंच भाषेंत झाला, आणि तो ऑन्केटिल डच्यूपरॉन्नें केला. ह्या वेळीं, वेदान्तग्रंथांचें अन्य भाषान्तर उपलब्ध नसे. त्या कारणानें, त्याजवरच पाश्चात्यांची कांहीं कालपर्यंत भिस्त होती, हें उघड आहे.

संस्कृत हें भाषाशास्त्राचा पाया असल्याविषयीं पाश्चात्यांची खात्री.

यापमाणें, भारतीय ग्रंथोदधींतील प्रज्वलित रत्नांनीं, खालिफ, खान, आरब, इराणी, मुसलमान, मोगल, तिबेटी, ब्रह्मी, चिनी, जपानी, इत्यादि अनेक राष्ट्रांचें चित्त वेधलें जाऊन, त्यांनीं संस्कृत भाषेचें मनःपूर्वक परिशीलन केलें. त्यामुळें, ह्या भाषेची सहजींच अभिवृद्धि झाली. तिला सर्व ठिकाणाहून बऱ्याच अंशानें प्रोत्साहन मिळालें. नानाविध भाषांत संस्कृत वाङ्मयाचीं भाषांतरें होत गेलीं. सर्व जगभर तिची अभिरुचि दिवसानुदिवस वाढतच चालली. संस्कृत ग्रंथोदधीचें या भूतलावरील यच्चावत् राष्ट्रास महदाश्चर्य वाटूं लागलें. ग्रीकसारखे पुरातन व मी मी ह्मणविणारे देशही संस्कृत ज्ञानभांडाराचे शतशः

१ Hervas believed "that the Greeks derived *their philosophy* and *mythology from India*, ( and ) he supposed that they had likewise *borrowed from the Hindus some of their words, and even the art of distinguishing the gender of words.*"

( M. M. Sc. L. Lectures. vol. I. P. 157 )

ऋणी आहेत, असें मोठमोठ्या पाश्चात्य[1] पंडितांच्या देखील अनुभवास आलें. आणि भाषाशास्त्राचें खरें मूळ व त्याचा शुद्ध पाया केवळ संस्कृत[2] भाषाच आहे, अशी सुद्धां त्यांची बालंबाल खात्री आपोआपच झाली.

---

[1] Hervas. Catalogue of languages. (II. 134,-135.)

[2] " But stripping off all exaggerations, and making all due allowances, the Sanskrit *is still the mainstay* of Indo-European *philology; it gave the science a rapid development which nothing else could have given; it imparted to its conclusions a fulness and certainty which would have been otherwise unattainable.*"

( Whitney's Study of Language. P. 229. 1867 )

वरील अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

# भाग सहावा.

## वर्णविचार.

वर्णविचार.

मागील भागांत, भाषाशास्त्रासंबंधानें आमच्या प्राक्कालीन आर्यपूर्वजांनीं व इतर पौरस्त्य राष्ट्रांनीं जे परिश्रम केले, त्याविषयींचें यथावकाश विवेचन झालें असून, प्रस्तुत भागांत पाश्चात्य लोकांनीं भाषाविषयक प्रयत्न करून हें शास्त्र उदयास आणण्याची जी खटपट चालविली, त्याबद्दलची हकीकत देण्याचा आमचा विचार होता. परंतु, वर्ण आणि लिपी, यांचा पौरस्त्य, किंबहुना आर्य परिश्रमाशीं इतका कांहीं निकट संबंध आहे कीं, मागील भागाला लागूनच भाषेंतील वर्ण आणि लिपि यांचेंही अवश्य तें दिग्दर्शन झालें पाहिजे; व तें होणें देखील विशेष प्रशस्त आणि इष्ट होय. सबब, त्यांचेंच इतिवृत्त प्रथमतः येथें देतों.

भाषापरीक्षण.

ह्या भूतलावरील एकंदर भाषांचें आपण काळजीपूर्वक अवलोकन केलें, आणि गुणदोष विवेचनार्थ त्यांजकडे शास्त्रीय दृष्टीनें पाहिलें, तर आपल्याला असें निःसंशय दिसून येईल कीं, ह्यापैकीं कांहीं भाषा अगदीं उच्च पदवीप्रत पोहोंचलेल्या असून, कित्येक मध्यमावस्थेंत आहेत. आणि राहिल्या साहित्यांची तर केवळ निकृष्टदशाच आहे, असेंही म्हणावें लागतें

संस्कृताचें सर्वमान्य श्रेष्ठत्व.

ह्या सर्व भाषांत संस्कृत ही अत्युत्तम असून, ती निःसंशय पूर्णतेच्या अगदीं उच्च कोटीप्रत पोहोंचलेली आहे, याविषयीं बिलकुल मतभेदच नाहीं. आणि

---

१ तिच्या संबंधानें पिक्टेट म्हणतो, "A language *admirable* by its *richness,* ...... ( and ) *perfected* to a very *high degree.*"

( A Pictet. Origines Indo-Europennes. P. P. I-2 ).

तो आणखी असेंही लिहितो, "*The most beautiful perhaps of all languages.*"

**मॉक्समुलर** लिहितो, "The *most wonderful language, the Sanskrit.*"

( India. What can it teach us ? P. 15. )

"So *perfect a language as Sanskrit.*"

( Science of Language. II. P. 181. )

**बर्नाफ्** आणि **लॉसन्** म्हणतात, "That *rich* and *fertile language,* the *Sanskrit.*"

( Essai Sur. le. Pali P. 138 ).

डा. **हंटर** लिहितो, "But *Sanskrit* was only *the most famous* of several Aryan dialects in the North."

( Indian Empire. P. 334 ).

सर. **विल्यम् जोन्स** म्हणतो, "It ( Sanskrit ) is of *a wonderful structure, more perfect than* the Greek; *more copious than* the Latin; and *more exquisitely refined than either.*"

( Asiatic Researches. vol. I. P. 422 ).

ह्या **संस्कृत** भाषेच्या संबंधानें विवेचन करीत असतां, **लॉर्ड मॉनबोडोनें** एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

( पुढें चालू. )

पालि, प्राकृत, महाराष्ट्र, हिन्दी, गुजराथी, तेलगू, चिनी, इत्यादि पौरस्त्य भाषा, व झन्द, फारसी, आरबी, ग्रीक, ल्याटिन्, जर्मन्, फ्रेंच, वगैरे पाश्चात्य भाषा, यांची गणना जरी सुधारलेल्या भाषांतच होते, तरी संस्कृत भाषेवर त्यांची कडी नाहीं, ही गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे. इतकेंच नव्हें तर, ह्या सर्व भाषा संस्कृताच्या शाखा अस-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" There is a language still existing, and preserved among the Brahmans of India, *which is a richer and in every respect a finer language than even the Greek of Homer.* " ( 1792. )

( Lord Monboddo's *Origin and Progress of Language.* vol. VI. P. 97. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

१ पाली भाषेच्या संबंधानें मि. जेम्स डी. आल्विस् म्हणतोः– " The *high* state of *refinement* to which the Pali had in very early times attained as a language, its *copiousness*, *elegence*, and *harmony*, " ... ... ...

( Introduction to Kachhâyana's grammar. Colombo. 1863. P. CXXXII ).

ह्यांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

२ **महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः ।**
**सागरः सर्व सूक्तीनां सेतुबंधादि यन्मयम् ॥**

( काव्यादर्श. ).

३ संस्कृत ही **मायभाषा** असून, तिच्या सदरहू इतर भाषा दुहिता किंवा शाखा असल्याविषयीं, आम्हीं मागें पान १०१ ते १६९ वर, व भारतीय साम्राज्याच्या नवव्या पुस्तकांत साद्यन्त ऊहापोह केला आहे. ( ग्रंथकर्ता. )

त्यामुळें, त्यांनीं ह्या मायभाषेला मातृपदाचा उचित मान देऊन, तिच्या दिव्य आणि अनुपम ज्ञानभांडाराचा यथाशक्ति लाभ करून घेण्यास्तव, तच्चरणकमलयुगलीं सदैव तत्पर असणें देखील अत्यवश्य आहे.

त्याचें कारण.

असो. अशा प्रकारें संस्कृत भाषेला सर्व तऱ्हेनें पूर्णत्व येण्यास, आमचे पूर्वजच कारणीभूत असून, त्यांनीं तिला उन्नतावस्थेच्या अगदीं उच्च कोटीप्रत पोहोंचविण्यासाठीं, प्रथमपासूनच भगीरथ प्रयत्न केले असल्याचें उघड दिसतें. म्हणजे अर्थात्च, श्रीगणेशायनमः पासून तों तहत काव्यदोहन आणि शास्त्रान्वेषणापर्यंत, त्यांनीं केवळ अश्रान्त परिश्रमच चालविले होते, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

तात्पर्य, आमचे मूलवर्ण, अथवा आम्हां आर्यांच्या शैशवावस्थेंतील धूलाक्षरें, हींच तिच्या उत्कृष्टावस्थेचे आधारस्तंभ होत असें समजून, तीं आमच्या पूर्वजानीं सर्व प्रकारें पूर्णत्वास आणिलीं; त्यांची यथोचित आणि स्थानात्मक व्यवस्थासुद्धां त्यांनींच लाविली; आणि तद्विषयक सशास्त्र व पद्धतशीर मीमांसा देखील आमच्या ह्या पुराण ऋषिवर्यांनींच केली. सबब, तत्संबंधीं यथार्थ दिग्दर्शन होण्यासाठीं, आमच्या मूलवर्णांचा अल्पवृत्तान्त प्रथमतः देतों; आणि नन्तर इतर भाषांच्या तुलनेनें काय निष्पन्न होतें, हें समजण्याकरितां, त्याजबद्दलची सुद्धां थोडीशी हकीकत वाचकापुढें ठवितों.

आतां, पद्धतशीर विवेचन होण्यासाठीं, प्रथमतः पौरस्त्य भाषा घेऊन, नंतर पाश्चात्य भाषांकडे वळूं.

आमच्या भारतीय भाषांपैकीं आदि भाषा जी संस्कृत, तींत एकंदर वर्ण चौसष्ट आहेत. परंतु, कित्येक ऋषी आणि वैयाकरणी, ते त्रेसष्ट असल्याचेंच मानतात.

आमच्यांतील वर्णसंख्या.

त्रिषष्टिश्चतुःषष्टिर्वा वर्णाः शंभुमते मता ।
प्राकृते संस्कृते चापि स्वयं प्रोक्ताः स्वयंभुवा ॥ ३ ॥
स्वराविंशतिरेकश्च स्पर्शानां पंचविंशतिः ।
यादयश्च स्मृताह्यष्टौचत्वारश्च यमाः स्मृताः ॥ ४ ॥
अनुस्वारो विसर्गश्च ᳲ क ᳲ पौचापि पराश्रितौ ।
दुःस्पृष्टश्चेति विज्ञेयो ऌकाराः प्लुतएवच ॥५॥ (शिक्षा).

हे वर्ण कसे उत्पन्न होतात, त्यांचे किती प्रकार आहेत, त्यांचीं स्थानें कोणतीं, इत्यादि विषयींचें सविस्तर विवेचन शिक्षेंत आहे; व तत्संबंधीं शास्त्रीय ऊहापोह आह्मी दुसऱ्या भागांत केला आहे. (मागें पान ९६ ते ९९ पहा.)

आत्मा बुद्ध्या समेत्यार्थान्मनोयुङ्क्ते विवक्षया ।
मनः कायाग्निमाहन्ति सप्रेरयति मारुतम् ॥ ६ ॥
मारुतस्तूरसिचरन्मन्द्रं जनयति स्वरम् ।
प्रातः सवन योगंतं छन्दो गायत्रमाश्रितम् ॥ ७ ॥
कंठे माध्यन्दिनयुगं मध्यमंत्रैष्टुभानुगम् ।
तारं तार्तीय सवनं शीर्षण्यं जागतानुगम् ॥ ८ ॥
सोदीर्णो मूर्ध्न्यभिहतोवक्त्रमापद्यमारुतः ।
वर्णाञ्जनयते तेषां विभागः पंचधास्मृतः ॥ ९ ॥
स्वरतः कालतः स्थाना त्प्रयत्नानुप्रदानतः ॥ *** १० ॥
उदात्तश्चानुदात्तश्च स्वरितश्च स्वरास्त्रयः ।
ऱ्हस्वो दीर्घःप्लुत इति कालतो नियमा अचि ॥ ११ ॥

उदात्ते निषाधगान्धारावनुदात्त ऋषभधैवतौ ।
स्वरितप्रभवाह्येते षड्ज मध्यमपंचमाः ॥ १२ ॥
अष्टौस्थानानिवर्णानामुरः कंठः शिरस्तथा ।
जिव्हा मूलं चदन्ताश्च नासिकोष्ठौचतालुच ॥ १३ ॥
ओभावश्च विवृत्तिश्च शषसारेफ एवच ।
जिव्हामूलमुपध्माच गतिरष्ट विधोष्मणः ॥ १४ ॥
यद्यो भावप्रसंधान मुकारादि परं पदम् ।
स्वरान्तं तादृशं विद्याद्यदन्यद्व्यक्तमूष्मणः ॥ १५ ॥
हकारं पंचमैर्युक्तमन्तस्थाभिश्च संयुतम् ।
औरस्यं तं विजानीयात्कंठ्यमाहुरसंयुतम् ॥ १६ ॥
कंठ्यावहा विचुयशास्तालव्या ओष्ठजावुपू ।
स्युर्मूर्धन्याऋटुरषा दन्त्या लृतुलसाः स्मृताः ॥१७॥
जिव्हामूलेतुकुः प्रोक्तो दन्त्योष्ठ्योवः स्मृतो बुधैः ।
एपेतु कंठतालव्या ओऔ कंठोष्ठजौ स्मृतौ ॥ १८ ॥
अर्धमात्रातुकंठ्या स्यादेकारैकारयोर्भवेत् ।
ओकारौकारयोर्मात्रा तयोर्विवृतसंवृतम् ॥ १९ ॥
संवृतं मात्रिकंज्ञेयं विवृतं तुद्विमात्रिकम् ।
घोषावासंवृताः सर्वे अघोषाविवृताः स्मृताः ॥ २० ॥
स्वराणामूष्मणांचैव विवृतं करणं स्मृतम् ।
तेभ्योऽपि विवृतावेङौ ताभ्यामैचौ तथैवच ॥ २१ ॥
अनुस्वरयमानांच नासिकास्थानमुच्यते ।
अयोगवाहाविज्ञेया आश्रयस्थान भागिनः ॥ २२ ॥
अलाबुवीणा निर्घोषो दन्त्यमूल्यस्वराननु ।
अनुस्वारस्तुकर्तव्यो नित्यंन्होः शषसेषुच ॥ २३ ॥

अनुस्वारे विवृत्यां तु विरामे चाक्षरद्वये ।
द्विरोष्ठ्यौ तु विगृण्हीयाद्यत्रौकारवकारयोः ॥ २४ ॥
(शिक्षा[1].).

अशाप्रकारें, अखिलवर्णोद्गमाचें आदिस्थान जें कंठ, त्यांत उत्पन्न होणारे यच्चावत् वर्ण आमच्या वैयाकरणांनीं प्रथमतः घेतले; आणि नन्तर, तालु, मूर्धन्, दन्त, व ओष्ठ, या स्थानांतील वर्णांची व्यवस्था अनुक्रमानें लाविली. पण, तसें करण्यांत देखील त्यांनीं आपलें नेहेमींचें अपूर्व चातुर्य दाखवून, आणखी एक सूक्ष्म विवेचन केलें. तें असें कीं, त्यांनीं प्रथमतः शुद्ध स्वर घेऊन, नंतर संयुक्त स्वरांची योजना केली. इतकेंच नव्हे तर, ह्या शुद्ध स्वरांत सुद्धां, उच्चारण्यास स्वल्प असे जे ऱ्हस्व स्वर त्यांची प्रथम योजना करून, नन्तर त्यांनीं त्या त्या जातीचे दीर्घ स्वर घेतले, व तदनन्तर संयुक्तस्वरांची, आणि अनुस्वारविसर्गांची योजना केली. पुढें, ज्या त्या स्थानांतलीं त्यांनीं व्यंजनें घेतलीं, आणि त्यांतही प्रथम मृदु, तदनन्तर कठोर, व शेवटीं अनुनासिक, याप्रमाणें त्यांनीं स्थानानुक्रमानें व्यवस्था लाविली.

आमच्या प्राकृत भाषा संस्कृतोद्भवच असल्या कारणानें, त्यांतील स्वर आणि व्यंजनसंख्या बहुतेक संस्कृताप्रमाणेंच आहे. मात्र, भेद म्हणून इतकाच कीं, प्लुत ऌकार, व ≍क आणि ≍प असे विसर्गद्वय, हे प्राकृतांत नसून, क्ष

---

१ ह्या शिक्षेचा प्रवर्तक पाणिनि होय, व हा ऋषि फार प्राक्कालीन असल्याचें दिसतें. कारण, त्याचा काल डाक्तर भांडारकरांच्या मतें इ० स० पूर्वी सातशें वर्षें असून, पंडित सत्यव्रत सामश्रमींच्या अभिप्रायाप्रमाणें, तो ई० स० पूर्वीं २४०० वर्षें होऊन गेला असावा, असें वाटतें.

आणि ज्ञ या संयुक्त व्यंजनांची विशेष योजना, ह्यांत झाल्याचें दिसतें. मिळून, वर्ज्यावर्ज्य विचाराअन्तीं, **प्राकृत** भाषांत ऋ, ॠ, ऌ, ॡ, ऐ, व औ, हे स्वर, आणि तालव्य व मास्तिकोष्म व्यंजनें, यांचा उपयोग करण्यांत येत नाहीं. (पुढील भाग १० वा पहा.).

अन्य भाषांतील वर्णसंख्या.

**चिनी** अथवा **मो**गली भाषेंत १७ किंवा १८ व्यंजनें आहेत.

**सामुद्रिक** भाषेंत, ज्यास्तींत ज्यास्ती १० व्यंजनें असून, कित्येक पोटशाखांत तीं याहीपेक्षां कमी आढळून येतात.

**मल्याळी** किंवा **मा**ले भाषेंत सुमारें १४।१५ व्यंजनें आहेत. तथापि, **डौरू** म्हणून जी तिची शाखा आहे, तींत फक्त १२ च व्यंजनें असल्याचें दिसतें.

**ऑस्ट्रेलियां**तील भाषांत तर केवळ ८ च व्यंजनें आहेत. मात्र, त्यांत तीन प्रकारचे भेद असल्यामुळें, त्यांजला वैचित्र्य प्राप्त होतें.

याप्रमाणें, **पौ**रस्त्य भाषांतील वर्णासंबंधीं केवळ चांचणीदाखल विवेचन झालें. सबब, आतां **पा**श्चात्य भाषांकडे वळतों.

**फा**रशी भाषेंत फक्त २२ च व्यंजनें आहेत. तथापि, तींत **आर**बी भाषेचें मिश्रण झाल्याकारणानें, ह्यांतील आणखी ९ व्यंजनांचा तींत समावेश झाला आहे.

**आर**बी भाषेंत २८ व्यंजनें आहेत.

**तुर**की भाषेंत २९ व्यंजनें असून, शिवाय **आर**बी व **फा**रशी भाषांतील दुसरीं ७ व्यंजनें तींत सामिल झालीं आहेत.

हीब्र्यू भाषेंत २२ व्यंजनें आहेत.

फीनिश भाषेंत फक्त ११ च आहेत.

ग्रीक भाषेंत १४ व्यंजनें आहेत. मात्र, ह्यांच्या भरतीला आणखी ३ संयुक्त व्यंजनें घेतलीं असल्याचें दिसतें.

ल्याटिन् भाषेंत, १ संयुक्त व दुसरीं १६ मिळून १७ व्यंजनें आहेत.

झुलू किंवा काफीर भाषेंत २६ व्यंजनें असून, शिवाय अनुनासिकेंही आहेत.

इंग्रजी भाषेंत २० व्यंजनें आहेत.

कित्येक भाषांत कंठ्यवर्ण नसून, कांहींत ओष्ठ्य ही नाहींत. कांहीं कांहींत ल, फ, झ, र, स, ह्या वर्णांचा अगदीं लोप असतो; आणि कित्येकांत, क व ग, या वर्णद्वयांतील भेद मानण्यांत येत नाहीं.

सोसायटी आयलंडस् नामक बेटांत जी भाषा चालते, तिच्यांत कंठ्य वर्ण नाहींत; व मोहाक, सिनीक, ओनंदगो, ओनीड, कयुग, आणि तुष्करोर, या भाषांत ओष्ठ्य वर्णांचा लोपच असल्याचें आढळून येतें. त्याचप्रमाणें, ओटीहरीरो भाषेंत झ, फ, र, ल, स, हे वर्णच नाहींत.

ग्रीक भाषेंत य, व, फ, आणि मृदु व ऊष्म वर्ण नाहींत. ल्याटिनमध्येंही त्याच प्रमाणें मृदु ऊष्मवर्ण, व च, या वर्णांचा अभाव आहे. उच्च जर्मन् भाषेंत व, य, घ, च, आणि ज, हे वर्ण नाहींत. आरबी भाषेंत पी नाहीं; आणि फिनिश, लिथूनियन्, अस्सल स्लेव्हॉनिक, तार्तरी, मोगली, व ब्रह्मी, या भाषांत फ नाहीं. चिनी

१ मॉक्समुलरचीं भाषाशास्त्रविषयक व्याख्यानें. भाग २ रा पहा.

भाषेंत **र** नाहीं. तसेंच **सामुद्रिक** भाषांत, व **ओथोमी**, **काफीर**, कित्येक **अमेरिकन**, **हूरोण**, आणि **मेक्सिकन** लोकांच्या भाषांतही तो वर्ण नाहीं; व **झन्द**, **सांकेतिक**[1]-**लिपि**, आणि **जपानी**, **अमेरिकन्**, व **आफ्रिकन्** भाषांच्या कांहीं पोटभेदांत, **ल** आढळून येत नाहीं.

अशाप्रकारें, अवश्य त्या वर्णांचा लोप असल्यामुळें, कसें वर्णान्तर होतें, व किती घोटाळा माजतो, तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कांहीं दिवसापूर्वी, **क्यापट्न् कुक** नांवाचा एक इंग्रजकामगार **सोसायटी आयलंड्ज्** नामक बेटांत गेला होता. तेथें गेल्यावर, त्या लोकांनीं त्याला त्याचें नांव विचारल्यावरून, त्यांनीं तें त्यांस कळविलें. परंतु, हें नामधेय कंठ्यवर्णात्मक होतें, तेव्हां उघडच तें त्यांजला उच्चारतां येईना. कारण, त्यांच्या भाषेंत कंठ्यवर्णाचा अगदींच अभाव आहे. त्यामुळें, कुकच्या ऐवजीं ते त्याला **टुट्**, **टुट्**, असें हाक मारीत, आणि कोणी **टुट्** कामगार आला आहे, असें ते लोकांस समजावून देत. पण, **टुट्** शब्दानें कांहींच बोध होईना, व उद्भवलेला घोटाळाही कांहीं केल्या राहीना, अशी स्थिति झाली.

असो. सदरहू विवेचनावरून, **संस्कृता**इतकीं मूलाक्षरें अन्य कोणत्याही भाषेंत नसून, त्यांची अशाप्रकारची आणि इतकी पद्धतशीर, परिपक्वतेची, व संपूर्णतेची व्यवस्था, आम्हां **भारतीयां**खेरीज अन्य कोणत्याही राष्ट्रानें आपापल्या भाषेंत लाविलेली नाहीं, असें कोणाच्याही लक्षांत सहजीं येईल.

---

1 See Rawlinson's Behistun. P. 146. Spiegel's Parsi Grammatik. P. 34.

ह्याखेरीज, **संस्कृत** आणि **पाश्चात्यभाषा**, यांची तुलना करतांना, दुसरी एक विशेष महत्वाची गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, **संस्कृतां**तल्या प्रत्येक वर्णाचा उच्चार केवळ एकच ठरलेला असून, तद्व्यतिरिक्त तो अन्य प्रकारें केव्हांही करतां येत नाहीं. म्हणजे, **अ इ उ ण्** इत्यादि स्वर, आणि **क प य्, श ष स र ह ल**, वगैरे व्यंजनें, यांचें प्रत्येकाचें मूल्य व मात्रा, हीं अगदीं बांधलेलीं, रेखलेलीं, आणि कायम आहेत; व त्याच कारणानें, त्यांत केव्हांही बदल अगर फेरफार होत नाहीं; आणि तो होणें देखील बिलकुल शक्यच नाहीं.

संस्कृत आणि पाश्चात्यभाषांची तुलना, व त्यावरून वर्णोच्चारासंबंधीं दिसत असलेला फेरफार.

आतां, ह्याच्याच मुकाबिल्यास आपण अन्य भाषांचें परीक्षण करूं; अथवा क्षणभर इंग्रजी भाषेकडेच वळूं; आणि तींत भिन्न भिन्न वर्णांच्या उच्चारांत कशा प्रकारचें व किती वैषम्य आहे, हें पाहूं.

इंग्रजींतील उच्चार-वैषम्य, व अनियमितपणा.

इंग्रजींत एकंदर वर्ण सव्वीस असून, त्यांपैकीं सहा[1] **स्वर** आणि वीस **व्यंजनें** आहेत. **ए, ई, आय्, ओ, यू, वाय**, हे स्वरांत मोडतात, व बाकीच्या वर्णांची गणना व्यंजनांत होते. सबब, हे अनुक्रमानेंच घेऊन, त्यांचें यथावकाश विवेचन करूं.

**ए**
A } ए ह्या स्वराचे पांच प्रकारचे उच्चार भिन्न भिन्न शब्दांत होतात, असें खालील उदाहरणांवरून वाचकांच्या लक्षांत येईल.

[1] *a, e, i, o, u, y.*

भाषेंत **र** नाहीं. तसेंच **सामुद्रिक** भाषांत, व **ओथोमी, काफीर**, कित्येक **अमेरिकन, हूरोण**, आणि **मेक्सिकन्** लोकांच्या भाषांतही तो वर्ण नाहीं; व **झन्द, सांकेतिक**[1] **लिपि**, आणि **जपानी, अमेरिकन्**, व **आफ्रिकन्** भाषांच्या कांहीं पोटभेदांत, **ल** आढळून येत नाहीं.

अशाप्रकारें, अवश्य त्या वर्णांचा लोप असल्यामुळें, कसें वर्णान्तर होतें, व किती घोटाळा माजतो, तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कांहीं दिवसापूर्वीं, **क्यापट्न् कुक** नांवाचा एक इंग्रजकामगार **सोसायटी आयलंड्ज्** नामक बेटांत गेला होता. तेथें गेल्यावर, त्या लोकांनीं त्याला त्याचें नांव विचारल्यावरून, त्यांनीं तें त्यांस कळविलें. परंतु, हें नामधेय कंठ्यवर्णात्मक होतें, तेव्हां उघडच तें त्यांजला उच्चारतां येईना. कारण, त्यांच्या भाषेंत कंठ्यवर्णाचा अगदींच अभाव आहे. त्यामुळें, कुकच्या ऐवजीं ते त्याला **टुट्, टुट्**, असें हाक मारीत, आणि कोणी **टुट्** कामगार आला आहे, असें ते लोकांस समजावून देत. पण, **टुट्** शब्दानें कांहींच बोध होईना, व उद्भवलेला घोटाळाही कांहीं केल्या राहींना, अशी स्थिति झाली.

असो. सदरहू विवेचनावरून, **संस्कृता**इतकीं मूलाक्षरें अन्य कोणत्याही भाषेंत नसून, त्यांची अशाप्रकारची आणि इतकी पद्धतशीर, परिपक्कतेची, व संपूर्णतेची व्यवस्था, आम्हां **भारतीयां**खेरीज अन्य कोणत्याही राष्ट्रानें आपापल्या भाषेंत लाविलेली नाहीं, असें कोणाच्याही लक्षांत सहजीं येईल.

---

1 See Rawlinson's Behistun. P. 146. Spiegel's Parsi Grammatik. P. 34.

ह्याखेरीज, **संस्कृत** आणि **पाश्चात्यभाषा**, यांची तुलना करतांना, दुसरी एक विशेष महत्वाची गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, **संस्कृ**तांतल्या प्रत्येक वर्णाचा उच्चार केवळ एकच ठरलेला असून, तद्व्यतिरिक्त तो अन्य प्रकारें केव्हांही करता येत नाहीं. म्हणजे, **अ इ उ ण्** इत्यादि स्वर, आणि **क प य्, श ष स र ह ल**, वगैरे व्यंजनें, यांचें प्रत्येकाचें मूल्य व मात्रा, हीं अगदीं बांधलेलीं, रेखलेलीं, आणि कायम आहेत; व त्याच कारणानें, त्यांत केव्हांही बदल अगर फेरफार होत नाहीं; आणि तो होणें देखील बिलकुल शक्यच नाहीं.

संस्कृत आणि पाश्चात्यभाषांची तुलना, व त्यावरून वर्णोच्चारासंबंधीं दिसत असलेला फेरफार.

आतां, ह्याच्याच मुकाबिल्यास आपण अन्य भाषांचें परीक्षण करूं; अथवा क्षणभर इंग्रजी भाषेकडेच वळूं; आणि तींत भिन्न भिन्न वर्णांच्या उच्चारांत कशा प्रकारचें व किती वैषम्य आहे, हें पाहूं.

इंग्रजींतील उच्चारवैषम्य, व अनियमितपणा.

इंग्रजींत एकंदर वर्ण सव्वीस असून, त्यांपैकीं सहा **स्वर** आणि वीस **व्यं**जनें आहेत. **ए, ई, आय्, ओ, यू, वाय**, हे स्वरांत[1] मोडतात, व बाकींच्या वर्णांची गणना व्यंजनांत होते. सबब, हे अनुक्रमानेंच घेऊन, त्यांचें यथावकाश विवेचन करूं.

**ए**
A } ए ह्या स्वराचे पांच प्रकारचे उच्चार भिन्न भिन्न शब्दांत होतात, असें खालील उदाहरणांवरून वाचकांच्या लक्षांत येईल.

[1] *a, e, i, o, u, y.*

ए = अ. Abandon. Above. Abate.
ए = आ. Far. Bar. Car.
ए = ॲ. Can. Scan.
ए = ऑं. All.
ए = ए. Able.

ई } ईचे देखील पांच तऱ्हेचे उच्चार निरनिराळ्या शब्दांत
E } होतात.

ई = अ. Earth. Earn. Concern.
ई = आ. Eye. Clerk.
ई = इ. Eccentric. Eject. Eclipse.
ई = ई. Even. Evil.
ई = ए. Ebb. Settle. Electricity.

आय् } आयचे सुद्धां पांच उच्चार भिन्न भिन्न शब्दांत
I } दिसून येतात.

आय् = अ. Sir
आय् = आ + इ. Sight. Might. Right.
आय = आय्. Idea. Idle.
आय् = इ. Ignite.
आय् = ई. Iliad. Idiot.

ओ } ओच्या सहा पृथक् उच्चाराचीं खालीं दिलेलीं उदा-
O } हरणें होत.

ओ = अ. Onion.
ओ = ऑं. Object.
ओ = ओ. Odour. Obedient.
ओ = ओअ. Pour.
ओ = औ. Out.
ओ = व. One.

यू }
U } यूचे फक्त तीनच उच्चार होत असल्याचें दिसतें.

यू = अ. But. Ugly.

यू = उ. Put.
यू = यू. Union. Universe.

वाय् } Y } वा यूचे देखील दोन उच्चार होतात.

वाय् = इ. Sympathy. Syntax.
वाय् = आय. Synod.

शिवाय, इंग्रजींत शुद्ध स्वर आणि संयुक्त स्वर, असा काहींच भेद नाहीं. एवढेंच नव्हें तर, I (आय्), U (यू), व Y (वाय्), यांची स्वरांत कां योजना केली, हेही समजत नाहीं. कारण, स्वर म्हणजे ध्वनिविमोचन, अथवा ध्वनीचा उद्गार असून, ज्या अक्षराचा उच्चार ह्या स्वराच्या साहाय्यावांचून होत नाहीं, त्यास व्यंजन म्हणावयाचें. अर्थात्, जें अक्षर परप्रकाशित आहे, किंवा जें केवळ अन्याच्या साह्यानेंच व्यक्त होणारें आहे, तें व्यंजन समजून, तद्व्यतिरिक्त बाकीचे सर्व स्वर होत, हें उघड आहे.

इंग्रजींतील व्यंजनात्मक स्वर.

आतां, इंग्रजींतल्या आय् स्वरांत, य् हें उत्तरपद व्यंजनात्मकच आहे. तसेंच, यू स्वराचा व्यवच्छेद केला तर, त्यांत य् + ऊ अशीं दोन पदें उपलब्ध होऊन, त्यापैकीं य् हें व्यंजनच असल्याचें दृष्टीस पडतें. आणि वाय् स्वरांत, ( व् + आ + य् अशीं ) स्वरयुक्त दोन व्यंजनेंच दृग्गोचर होतात. तात्पर्य, हे तिन्ही वर्ण शास्त्रदृष्ट्या स्वर नसून, स्वरयुक्त व्यंजनेंच आहेत, असें ह्मणणें प्राप्त येतें.

पण, ह्याखेरीज, आणखी एक गोष्ट विशेष रीतीनें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, सदरहू स्वरांशिवाय, बाकी जे ए (A), ई (E), ओ (O), हे स्वर राहिले आहेत,

ते देखील शास्त्रदृष्ट्या शुद्ध स्वर नसून, केवळ संयुक्त स्वरच आहेत, असें म्हटल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. कारण, अ + इ मिळून ए होतो. इ + इच्या संधीनें ई होते. आणि अ + उच्या संयोगानें ओ बनतो.

असो. सदरीं नमुद केलेलें वर्णोच्चारांचें भिन्नत्व केवळ स्वरांतच आहे, असें नाहीं. तर, तें व्यंजनांत सुद्धां दिसून येतें.

सी C { सी = क. Can. Concave.
सी = स. Cement. Cent.

सीएच् CH { सी एच= च. Church.
सी एच= क. Cinchona. Echo.
सी एच= श. Champagne. Chivolry.

डी D { डी = ड. Demand. Diamond.
डी = ज. Duration. Education.

जी G { जी = ग. Go. Government.
जी = ज. Germ. General.

क्यू Q { क्यू = क्व. Quinine. Quasi: ( Judicial ).
क्यू = क. Quote.

एस् S { एस् = ज. Division. Vision. Visible.
एस् = झ. Baptism. Sarcasm. Resemble.
एस् = श. Sure.
एस् = स. Seen.

टी T { टी = ट. Ten.
टी = च. Legislature. Departure. Nature.

टीएच् TH { टी एच = थ. Thermometre. Author.
टी एच = द. That. Than.
टी एच = ध. The.
टी एच = ट. Thomas. Thames.

एक्स X: एक्स = क्स. Ox. Oxus.<br>एक्स = झ. Xerses. Xenophen.<br>एक्स = ग्झ. Exist.

कित्येक शब्द तर असे आहेत कीं, त्यांतील कांहीं कांहीं अक्षरांचा बिलकुल उच्चारच होत नसल्यामुळें, तीं केवळ निरर्थकच असल्याचें उघड दिततें. उदाहरणार्थ, Recei*p*t; Island; Bustle; Tom*b*; Indict; *H*our; Si*g*n; Ca*l*m; *K*nite; *K*nowledge; Codem*n*; *W*rong; Wou*l*d; Cou*l*d: Shou*l*d; इत्यादि शब्दांत, इतालिक-वर्णांचा उच्चारच होत नाहीं.

ह्याखेरीज, वर्णाचें अंगभूत मूल्य, आणि त्याचें भाषेंत दृग्गोचर होत असलेलें अर्थनिरूपण, अथवा नामधेय, यांत सुद्धां महदन्तर दिसून येतें. इतकेंच नव्हें तर, कित्येक ठिकाणीं तर त्यांत कांहींच मेळ नसल्याचेंही भासतें. उदाहरणार्थ, एफ् ( F ) ह्या वर्णाचें अंगभूत मूल्य "फ"च आहे; जसें Fort, France, Firm, इत्यादि. तथापि, त्याचें अर्थनिरूपण एफ् असून, तें याहूनही फारच भिन्न जाहे. आतां, ह्या वर्णाचा उच्चार जर एफ् आहे, तर ज्या शब्दांत एफ् उच्चाराची अपेक्षा आहे, तेथें तरी ह्या एका वर्णानें कार्यभाग व्हावा, असें कोणासही सहजीं वाटेल. परंतु, तसें बिलकुल नसून, ज्या ज्या ठिकाणीं अशा उच्चाराची अवश्यकता असते, त्या त्या ठिकाणीं सुद्धां, एफ् ह्या वर्णानें आद्यस्वरोच्चाराचा कार्यभाग होत नसल्यामुळें, आणखी ई ( E ) या वर्णाची योजना करावी लागते. उदाहरणार्थ, Effervescence, Effrontery, इत्यादि शब्द

इतर भाषांतील वर्णांचें मूल्य व अर्थनिरूपण, यांतील महदंतर.

होत. अशाच प्रकारचें मूल्यान्तर व उच्चारभेद, अन्य वर्णांतही दिसून येतो.

शिवाय, G वर्णाचें मूल्य जी आहे. तथापि, कित्येक ठिकाणीं त्याचा उच्चार भलताच असल्याचें दृष्टीस पडतें. ह्मणजे जीहून अगदीं भिन्न असा जो ग उच्चार तोच कांहीं कांहीं शब्दांत करण्यांत येतो. जसें, Go, Garment, Girl, इत्यादि. W, X, आणि Z, हे वर्ण तर अगदीं मासलेवाईकच आहेत. ह्यापैकीं पहिल्याचें अर्धनिरूपण अथवा नामधेय डब्ल्यू असून, दुसऱ्याचें एक्स्, व तिसऱ्याचें झेड्ड् आहे. तसेंच, पहिल्यांत सहा ( ड्[१] + अ[२] + ब्[३] + ल्[४] + य्[५] + ऊ[६], ह्या ) वर्णांचा शास्त्रीयदृष्ट्या अन्तर्भाव होत असून, त्याचें खरें मूल्य म्हटलें म्हणजे फक्त वच आहे. जसें Worthy, Worth, इत्यादि. दुसऱ्यांत तीन अक्षरांचा समावेश होतो. परंतु त्याचें मूल्य क्वचित् क्स्, क्वचित् झ, व क्वचित् ग्झ असून, तें वर्णोच्चाराहून अगदीं भिन्न आहे. उदाहरणार्थ, Fox, Xenophen, Exist, Alexander, वगैरे. झेड्ड ( Z ) वर्णांत देखील तीनच अक्षरांचा अन्तर्भाव होतो. तथापि, त्याचें मूल्य फक्त झकारात्मक असून, उच्चारांत ड् द्वयांचा केवळ लोपच झाल्याचें दृष्टीस पडतें. जसें *Zone*, *Zoology*, *Zinc*, *Zephyr*, इत्यादि.

पाश्चात्य भाषांतील दोषांचें सामान्य वर्गीकरण.

असो. एकंदर सारासार विचार करून, पाश्चात्य[१] भाषांतील अनेक दोषांचें थोडक्यांत व सामान्य वर्गीकरण केलें, तर आपणांस असें खचित दिसून येईल कीं,

---

[१] हे दोष झन्द भाषेला सर्वांशीच लागू नाहींत.

त्यांत खालीं नमुद केलेली उणीव केवळ प्रमुखत्वानेंच आहे; आणि ती संस्कृतांत बिलकुल नाहीं.

१ पुनरुक्ति, किंवा वर्णातिरेक.
२ अपूर्णता, अथवा वर्णाभाव.
३ असंगति, अगर विरोधता.
४ भ्रान्तिमूलकता, किंवा वर्णमूल्याभाव.
५ अनुच्चारता, अथवा निरर्थकत्व.
६ वर्णोच्चाराचें वर्णमूल्याहून भिन्नत्वं.
७ वर्णमूल्याचा अगर वर्णोच्चाराचा दुरुपयोग.

पुनरुक्ति किंवा वर्णातिरेक.

आतां, वाचकाच्या सोईसाठीं, व त्याची सुलभ रीतीनें समजूत पडावी म्हणून, सदरहू दोषांचीं आपण अनुक्रमानें उदाहरणें देऊं, आणि तत्संबंधानें अवश्य तितकें यथावकाश विवेचन करूं.

१ पुनरुक्ति अथवा वर्णातिरेकाचा दोष म्हटला म्हणजे, एकाच वर्णानें किंवा अक्षरानें इच्छित उच्चाराचा कार्यभाग होत असतांही, ज्यांत अनेक वर्णांचा उपयोग करण्यांत येतो, तो होय. अर्थात्, ह्यांत अमुक एक अक्षराचा उच्चार अमुकच व्हावयाचा, असें ठरलेलें नसतें; अगर, वर्णाचें मूल्य देखील स्थापित झालेलें नसतें; अथवा, तद्विषयक नियमन सुद्धां केलेलें नसतें. उदाहरणार्थ, Letter या शब्दांत एका ' टी ' चीच अवश्यकता असतां, त्यांत दोन ' टी ' ची योजना निरर्थक झाली आहे. शिवाय, एस्

१ फारसी भाषेंतील आलेफ्, बे, से, आाणि ग्रीक भाषेंतील आल्फा, बीटा, ग्यामा, इत्यादि वर्ण, ह्या दोषास पात्र आहेत.

(S) चें मूल्य सकारार्थी ठरलें असतांही, त्या वर्णाकडून हा कार्यभाग जरूर त्या प्रत्येक ठिकाणीं करून न घेतां, त्याच्या ऐवजीं सी (C) चाच उपयोग वारंवार केलेला दृष्टीस पडतो. Cement, Civil, इत्यादि ह्याचीच उदाहरणें होत. आतां, सी (C) चें मूल्य एस् (S) सारखेंच समजावें तर, तसें देखील दिसून येत नाहीं. कारण, सी (C) चा उच्चार 'क' प्रमाणें ही होतो. इतकेंच नव्हे तर, एकाच शब्दांत, सी (C) चा उच्चार क आणि स या प्रमाणें झाल्याचें आढळून येतें. म्हणजे अर्थातच, त्याचें मूल्य भिन्न भिन्न स्थळीं निरनिराळें होत असल्याचें उघड होतें. उदाहरणार्थ, Cancave, Concur; Conceive, Conceal; इत्यादि.

शिवाय, कच्या मूल्याचा केवळ सी (C) शब्दच आहे, असें नाहीं. तर, के (K), व क्यू (Q), ह्यांचें सुद्धां तेंच मूल्य आहे. ह्यावरून, एकाच मूल्याचे म्हणजे उच्चाराचे अनेक वर्ण ह्या भाषेंत असल्याचें सिद्ध होतें. आणि ज्यापेक्षां ते सर्व निरर्थक व निरुपयोगी आहेत, त्यापेक्षां वर्णातिरेकाचा दोष केवळ घरीं चालून आल्यासारखेंच आपणांला मानावें लागतें.

अपूर्णता अगर वर्णाभाव.

२ अपूर्णता अथवा वर्णाभावाचा दोष तर, ह्या पाश्चात्य भाषेंत पदोपदीं व्यक्त होतो. कारण, भरपूर वर्ण नसल्यामुळें, इच्छित उच्चार संपादण्यासाठीं, अन्य वर्णाची अपेक्षा करावी लागते, व त्याचें साहाय्य घेणेंही जरूर पडतें. उदाहरणार्थ, 'च' कार मूल्याचा आणि

थ, द, ध, फ, व श, या उच्चारांचा एकच वर्ण नसल्यामुळें, C, T, P, B, व S, यांजला H चें साहाय्य घेऊन, इच्छित उच्चार साधावा लागतो. जसें church, thermometer, that, the, philosophy, आणि Shine.

असंगति अगर विरोध.

३ असंगाति अगर विरोधतेचा दोष देखील पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो. ह्या दोषांत ज्या वर्णाचें जें मूल्य ठरलेलें असतें, तें त्याला उपलब्ध न होतां, अन्य वर्णांनींच त्याचा उच्चार करण्यांत येतो. उदाहरणार्थ, एक्स (x) चा उच्चार '**क्स**' असा, (*Fox*) या शब्दांत लिहिल्याप्रमाणेंच व्हावयास पाहिजे. परंतु, तो तसा होत नसून, हा नियम सर्वत्र लागूही पडत नाहीं; व त्याला अनेक ठिकाणीं बाध येतो. एवढेंच नाहीं तर, याच **एक्स** (x) अक्षराचें मूल्य भलतेंच होतें; व त्यामुळें त्याचा उच्चार 'क्स् असा न होता, त्यांत ह्या दोन्ही वर्णांहून अगदीं भिन्न अशा तिसऱ्याच वर्णांचा मिलाफ घडतो. तेव्हां अर्थातच, **क्स** ह्मणजे **क् + स्** हें वर्णद्वय नष्ट होऊन, त्या ऐवजीं झ, आणि ग्झ ( ग् + झ् ), या वर्णांचा आदेश होतो. जसें Xerxes, Example, इत्यादि.

भ्रांतिमूलकता अथवा वर्णमूल्याभाव.

४ भ्रांतिमूलकता किंवा वर्णमूल्याभावाचा दोष ह्या भाषेंत इतका मर्यादातीत आहे कीं, तो सांगतां पुरवत नाहीं. ह्यांत प्रत्येक वर्णाचें मूल्य किंवा त्याचा उच्चार ठरलेला नसल्या कारणानें, एकैकाक्षराचे दोन पासून पांच पर्यंत उच्चार होतात; आणि त्यामुळेंच त्याचा नियमित

रीतीनें अथवा ठरीव पद्धतीनें उच्चार करण्याला एकही साधन उपलब्ध होत नाहीं. तव्हां अर्थात्च, अमुक वर्णाचा असा उच्चार करावा, किंवा तसा करावा, याविषयीं सहजींच भ्रांति उत्पन्न होऊन, वर्णमूल्याबद्दल आपोआपच संदिग्धता राहते. उदाहरणार्थ, *E*arth, Cl*e*rk, *E*ar, *E*ven, *E*bb, असे ईचे पांच उचार होतात. अशा प्रकारचीं पुष्कळच उदाहरणें आह्मीं पूर्वीं दिलीं आहेत; सबब, तद्विषयक आतां ज्यास्त ऊहापोह करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. ( मागें पान २७८ ते २८१ पहा. )

अनुच्चारता किंवा निरर्थकता.

५ अनुच्चारता अथवा निरर्थकत्वाचा दोष ह्मटला ह्मणजे, पदांत किंवा शब्दांत अमुक एक वर्णाचें सान्निध्य असतांही तो वर्ण उच्चारण्यात येत नाहीं, व केवळ अलिप्तच राहतो. जसें Ca*l*m, recei*p*t, Si*g*n, Ei*gh*t. इत्यादि. ह्यांत **एल्** ( L ), **पी** ( P ), **जी** ( G ), आणि **जी एच्** ( G H ), हे वर्ण अगदीं सन्निध व शब्दांतल्या शब्दांत असून देखील, त्यांचा उच्चार होत नाहीं; आणि ह्मणूनच त्यांचें निरर्थकत्व सहजीं दिसून येतें.

वर्णोच्चाराचें वर्णमूल्याहून भिन्नत्व.

६ सहावा दोष म्हटला म्हणजे, वर्णोच्चाराचें वर्णमूल्याहून भिन्नत्व असून, तो अनेक वर्णांत व्यक्त होतो. उदाहरणार्थ F, H, I, L, M, N, R, S, X, Y, Z, या वर्णांचा उच्चार अनुक्रमें, एफ्, एच्, आय्, एल्, एम्, एन्, आर्, एस्, एक्स्, वाय्, आणि झड्, असा असून, त्याचें मूल्य मात्र **फ**, ह, झ, ( अ, आ + इ, आय्, इ, ई, ), **ल**,

म, न, र, ( ज, झ, श, स, ), ( क्स्, झ, अगर ग्झ् ), व झ् , असें अनुक्रमें आहे. अर्थात्, तें वर्णोच्चाराहून कांहीं अंशीं, किंबहुना बरेंच भिन्न आहे, हें विशेष रीतीनें सांगावयास नको. मासल्याकरिता, वाचकांनीं *F*ruit, *H*ero, ( Sir, Sight, Idea, Ignite, Iliad ), *L*uxury, *M*an, *N*urse, *R*iver, ( Vision, Baptism, *S*ure, *S*ea ), ( Fox, Xerxes, Exist ), *Y*es, *Z*one, इत्यादि शब्द पहावे; म्हणजे त्यावरून, आमच्या प्रतिपादनाची सत्यता त्यांजला भासमान होईल.

तथापि, वाचकाची ज्यास्त खात्री होण्यासाठीं, आह्मीं याहूनही भिन्न असें दुसरेंच उदाहरण घेऊन, तें त्यांच्यापुढें ठेवितों. म्हणजे, त्यावरून देखील, आमच्या म्हणण्याचें इंगित त्यांच्या लक्षांत सहजीं येईल.

व्ही, आय, आणि झेड्, ( Viz ), हे एका शब्दांतलेच तीन वर्ण होत. तथापि, त्यांचा उच्चार वर्णमूल्याप्रमाणें न होतां, तो नेम्ली ( Namely ) असा भलताच करण्यांत येतो.

वर्णोच्चाराचा दुरुपयोग.

७ सातवा दोष ह्मटला ह्मणजे, वर्णोच्चाराचा दुरुपयोग होय. ह्यांत, वर्णोच्चार आणि वर्णमूल्य, यांत कांहींच साम्य नसून, त्यांत केवळ जमीन अस्मानाचें अंतर आहे, असेंही म्हटलें असतां चालेल. उदाहरणार्थ W चें मूल्य फक्त वच असून, त्याचा वर्णोच्चार डब्ल्यू आहे. जसें Worry, Wont, इत्यादि. अर्थात, ह्यामुळें, वर्णमूल्याचा अगर वर्णोच्चाराचा दुरुपयोग झाला, असें म्हणण्यास काडीमात्रही हरकत नाहीं.

असो. शब्दोच्चारांत अशाच प्रकारची विसंगता अन्य भाषांत सुद्धां आढळून येतें. परंतु, संस्कृतांत तिचा गंधही नाहीं. यामुळें, आमच्या आर्यपूर्वजांचें शास्त्रनैपुण्य व त्यांची विशालबुद्धि, विदग्धता व चतुरस्रता, त्यांचा गूढविचार आणि त्यांचें सखोलान्वेषण, इत्यादि गुण उत्तम प्रकारें व्यक्त होतात.

संस्कृत वर्णोच्चाराचा ठरीव नियम.

संस्कृत भाषेंतील अक्षरांची अशा प्रकारची विलक्षण अवयवसंगति, त्यांचें निश्चित मूल्य, आणि त्यांतील परिमित मात्रा पाहून, व इंग्रजी भाषेंतील वर्णोच्चाराच्या संबंधानें अनिवार विसंगता आणि अनियमितपणा मनांत आणून, एक चतुरस्र पंडित एका पाश्चात्य विद्वानाजवळ असें विनोदानें बोलला कीं,

**संस्कृते एकैकमक्षरमेकैकोच्चारणं दधातीति नियमः। परंतु, इंग्लंदीये दुर्दैववशादेकैकमक्षरमनेकोच्चारणं दधाति।**

पुढें, त्या पाश्चात्य गृहस्थास संस्कृताचें व मराठीचें विशेष ज्ञान नसल्याकारणानें, त्यानें ह्या पौरस्त्य पंडितांस त्याचा अर्थ विचारल्यावरून, त्यानें त्यास इंग्रजींत असें समजावून सांगितलें कीं,

"Each letter in Sanskrit has but one Uniform Sound. But, this is, unfortunately, not the Case with the English letters."

इंग्रजी वर्णोच्चारांतील अव्यवस्था व नियमशून्यता.

सदरहुवरून, इंग्रजी, किंबहुना भारतेतर सर्व भाषांतील स्वरांत किंवा व्यंजनांत, वर्णोच्चाराच्या संबंधानें बिलकूल धरबंध नसून, त्यांत कोणत्याही प्रकारचें नियमन देखील नाहीं, असें वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

असो. आंग्ल भाषेचें हें न्यूनत्व[1], व डच, जर्मन्, स्पॅनिश, इत्यादि अन्य पाश्चात्य भाषांची गौणता, फार दिवस प्रच्छन्नावस्थेंत न राहतां, विद्वान आणि पंडित, वैयाकरण व शब्दव्युत्पत्तिकोविद, बहुश्रुत आणि भाषाशास्त्रज्ञ, इत्यादींचें मन तिकडे लवकरच वेधलें जाऊन, त्यांतील अवगुण काढण्याबद्दलचे प्रयत्न अगदीं ज्यारीनें, परंतु शनैः शनैः, सुरू झाले, ही गोष्ट निःसंशय विशेष अभिनन्दन करण्यासारखी आहे. इ. स. १७९० सालीं, डच लोकांनीं आपल्या वर्णविन्यासांत सुधारणा केली[2]; आणि जर्मनींत देखील हें काम मोठ्या नेटानें चालू आहे[3]. अशा प्रकारचे महत्वाचे परिश्रम तेथील विद्यापरिषदेकडे सोंप-

आंग्ल वगैरे पाश्चात्य भाषांतल्या वर्णांत सुधारणा.

१ ह्या न्यूनत्वासंबंधीं एक आंग्ल भाषाशास्त्रज्ञ म्हणतोः—

"*English spelling,* under the guidance of the printers, *has become a mere system of marks and symbols, arranged upon no principle, selected with no rational purpose,* each of which by a separate effort of the memory is associated with some sound or word ... ... The sounds of the English language have been analyzed, and the great work of Mr. A. J. Ellis on the *History of English pronunciation* has shown how *our absurd* and *anomalous spelling* grew up."

( Introduction to the Science of Language. By Sayce. vol. I. P. P. 328-329 ).

२ "A reform of the Dutch spelling was successfully carried out." ( Do Do. P. 332 ).

३ "And even German ... ... is in process of reformation." ( Do. Do. P. 332 ).

लेले असून, ही मंडळी दर महिन्यास एक मासिक पत्रक[1] काढते. ह्यांत वर्णविषयक दोषखंडन असतें, व ह्या दृष्टीनें पाहिलें ह्मणजे तें खरोखरच फार महत्वाचें आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. स्पेनमध्यें सुद्धां ह्या संबंधाची चळवळ चालू आहे., आणि स्पॉनिश लोकांनीं आपल्या वर्णांत बराच फेरफार केला असल्याचें कळून येतें.

वर्णांत बदल व त्यांच्या संख्येंत फेरफार.

याप्रमाणें, एकंदर वर्णरचना शास्त्रीय पद्धतीवरच बनविण्याविषयीं सर्वत्र चर्चा सुरू झाल्यामुळें, प्रत्येक विद्वान आपापल्या अभिप्रायानुरूप कांहींना कांहीं नवीन कल्पना काढीत गेला. मेलव्हिलबेलनें आपल्या पुस्तकांत[2] रेखापद्धतीनें वर्णसंज्ञा ठरविण्याचा विचार केला आहे. मॅक्समुल्लर, सर. विल्यम जोन्स, लेपशियस्, व धर्मोपदेशकें[3] ( पाद्री ), यांनीं देखील वर्णविन्यासाची एक नवीनच तऱ्हा ठरविली आहे. स्वीट्नें १२९ वर्णोच्चार काढले असून, राजपुत्र बोनापार्टनें तर एकंदर ३८९ वर्णांची योजना केली असल्याचें दिसतें.

आंग्ल वर्णविन्यास, व त्याचा इतिहास.

इंग्रजी भाषेंतील वर्णविन्यासांत सुधारणा करण्याविषयाच्या प्रयत्नाला, सोळाव्या शतकांत प्रारंभ झाला, असें एका हस्तलिखितावरून कळून येतें. हें हस्त-

---

१ हें मासिक ब्रेमेनूनध्यें छापलें जातें, व त्याला " Reform Zeitstrift. " अशी संज्ञा आहे.

२ " अपरोक्ष भाषा, " अथवा " Visible Speech, ' हें ह्या पुस्तकाचें नामधेय आहे.

³ Missionary.

लिखित[1] एलिसला उपलब्ध झालें, व तें इ. स. १५५१ सालीं, चेस्टरचा राहणार कोणी एक जॉन हार्ट यानें लिहिलें होतें, असें कळतें. तदनन्तर, आपण बोलतों तसें लिहावें या हेतूनें, आणि इंग्रजींत एका प्रकारचे वर्ण लिहिले जात असून त्यांचा अन्य तऱ्हेनें उच्चार करण्यांत येतो, व त्या योगानें वर्णांचा दुरुपयोग होतो तो होऊं नये म्हणून, इ. स. १५६९ सालीं, मजकूर हार्टनें, "वर्णविचार" नांवाचें पुस्तक लिहिलें. परंतु, याच्याही पूर्वीं सुमारें एक वर्ष अगोदर ह्मणजे इ. स. १५६८ सालीं, "आंग्ल भाषेंतील लेखनशुद्धि" या नांवाचें पुस्तक सर टॉमस् स्मिथनें छापिलें, आणि त्यांत अपूर्ण वर्णांऐवजीं नूतन संज्ञा तयार करून, एकंदर चौतीस वर्ण इंग्रजी भाषेंत असावेत, असें त्यानें सुचविलें. पुढें, इ. स. १५८० त, विल्यम बलोकरनें दुसरें एक पुस्तक छापिलें, व त्यांत त्यानें सदतीस वर्णांचें प्रतिपादन केलें. इ. स. १६१९ मध्यें, डाक्तर गिल्लनें "आंग्लभाषा" नांवाचें पुस्तक तयार करून, ह्या भाषेचे चाळीस वर्ण ठरविले. ह्याच्या मागून इ. स. १६३३ सालीं बटलरनें 'इंग्रजी व्याकरण" छापलें, व त्याच्या पुढल्या वर्षीं, "मधुमक्षिका[2]" नांवाचें पुस्तक प्रसिद्धीस आणिलें.

---

१ "इंग्रजी भाषेंतील अयथार्थ आणि भ्रांतिमूलक वर्णविन्यासाचें विवेचन" हें ह्या लेखाचें नामधेय होय.

"The opening of the unreasonable writing of our English tongue, wherein is shewed what necessarily is to be left, and what followed for the perfect writing thereof."

२ "The Feminine Monarchy or History of the Bees." (Oxford. 1634.)

इ. स. १६६८ सालीं बिशप विल्किन्सनें "भाषेचें खरें तत्व आणि स्वरूप," या नांवाचा ग्रंथ छापला. परंतु, त्याचा म्हणण्यासारखा कांहीं एक उपयोग न होतां, ही भाषेची चळवळ सुमारें अर्ध शतकपर्यंत, केवळ थिजलेल्या अवस्थेंतच राहिली. तदनन्तर, इ. स. १७११ च्या वर्षी, भाषेची विशेष सुधारणा व्हावी म्हणून, डीन स्विफ्टनें ज्यास्त हालचाल करून, इंग्लंडच्या मुख्य प्रधानाजवळ देखील दाद मागितली. परंतु, त्याचा लेशमात्रही उपयोग झाला नाहीं; आणि अशाच प्रकारच्या वांटाण्याच्या अक्षदा, इ. स. १७६८ सालीं बेन्जामिन् फ्रांकालिन्नें केलेल्या प्रयत्नासही लागल्या.[1]

वर्णविन्यासाची प्रगति होण्यास मानीव अडचण.

आतां, अशा प्रकरची प्रगति होण्यास कोणती आडकाठी येते, याबद्दलचा तपास करतां असें कळून येतें कीं, "अशा रीतीनें भाषेंतल्या वर्णविन्यासांत फेरफार केल्यास मूळधातु नाहींसे होतील. सबब, तींत नवीन फेरफार करण्याचें कारण नाहीं[2]." आणि ह्याच सबबीवर भाषेच्या वर्णरचनेंत सुधारणा करण्याचें काम इंग्लंडसारख्या सुधारलेल्या देशांतही अटकून राहिलें, व मागासल्यासारखें झालें.

---

[1] Swift's " Works. " IX. P. P. 137-139.
( Edited by Sir. W. Scott. ).

[2] ह्या बाबतींत, सेस् हा एके ठिकाणीं असें म्हणतो कीं,
" It is curious to find the wholly mistaken objection already put forward that "all our etymologies would be lost." by a reform of spelling. "
( Introduction to the Science of Language.
vol. P. 332 ).

असो. अशा प्रकारें मी मी ह्मणविणाऱ्या इंग्लंडसारख्या स्वतंत्र, श्रीमान्, आणि विद्याचारसंपन्न राष्ट्रांत, व जेथें अज्ञानतिमिर, दुराग्रह, पौराणिकप्रीति, इत्यादींस निदान त्यांच्या मतें तरी थाराही नाहीं अशा ठिकाणीं, केवळ शास्त्रीय विषयाची प्रगति होण्याच्या संबंधानें, जर इतकें शैथिल्य दृग्गोचर होतें, तर आमच्या बिचाऱ्या भरतखंडासारख्या परतंत्र, दरिद्री, आणि सर्व तऱ्हेनें ओहटी लागलेल्या दुर्दैवी देशाची स्थिति कशी असावी, याची कल्पना करण्याचें काम मी आपल्या प्रिय वाचकांकडेसच सोंपतों.

---

# भाग सातवा.

## लिपिनिरूपण.

लिपिनिरूपण.

भाषाशास्त्र विवेचनांत, वर्ण आणि लिपि यांचा शास्त्रीय दृष्ट्या परस्पर विशेष समन्वय, किंबहुना प्रत्यक्षच संबंध असल्यामुळें, मागील भागांत वर्णविचाराचें यथावकाश दिग्दर्शन केलें. तेव्हां, वर्णविचारानंतर, लिपिविषयक दोन शब्द तरी लिहिल्याशिवाय गत्यन्तरच नाहीं, असें समजून, प्रस्तुत भागांत लिपिनिरूपण करण्याचें योजिलें आहे.

लेखनकलेचें महत्व.

लेखनकला ही एक इतकी अपूर्व चीज आहे कीं, ती जर कोणाला माहीत नसती, तर जगाची केवढी हानि झाली असती, याची कल्पना सुद्धां होण्यासारखी नाहीं. अर्थात्, ह्या दृष्टिगोचर होत असलेल्या अगाध ग्रंथसंपत्तीचा मागमूसही राहिला नसता. सर्व शोधांस हरताळ लागली असती. शास्त्र व कला यांचा विध्वंस झाला असता. लिपि हें भाषेचें मूळ अंग असल्यामुळें, तदभावात् सर्वत्र अंधकारच मातला असता. भाषाशास्त्राचें तर नांवच राहिलें नसतें. शब्दव्युत्पत्तीनें आपला गाशा गुंडाळला असता. व्याकरण व न्याय, पूर्वमीमांसा अथवा कर्मकांड, उत्तरमीमांसा अथवा ज्ञानकांड, गणित व भूमिति, भूगोल

व खगोल, इतिहास व पुराणें, चरित्रें व कथानकें, वैद्यक व शिल्प, इत्यादि बाबतींत अत्यन्त महत्वाच्या शोधांचें पाऊल खचितच पुढें पडलें नसतें. आणि दुसरीं असंख्य शास्त्रें व कला, हीं देखील निःसंशय नायनाटच झालीं असतीं.

तेव्हां, अशा प्रकारची जी अप्रतीम वस्तु, ती मानवीप्राण्यास कशी व कोठें मिळाली, तिचा उद्भव कसा झाला, आणि कोणत्या कल्पक राष्ट्रानें तिला निर्माण केली, याबद्दलचा उपलब्ध असलेला सविस्तर वृत्तान्त येथेंच देणें अत्यवश्य आहे.

लिपिज्ञानाचें पौराणत्व.

अखिल भूतलावर, ऋग्वेद हा सर्वांत पुराणतम ग्रंथ होय, ही गोष्ट पाश्चात्य पंडितांसं[1] देखील कबूल असून, आमच्या त्या आदिकवींनाही कवित्वाची स्फूर्ति झाल्यावेळीं, अगर त्यानंतर लवकरच, ह्या लेखनकलेचा उद्गम झाला असावा, असें मानण्यास बलवत्तर प्रमाण मिळतें. कारण, एकतर, शक्य असेल तेव्हां, आपले विचार लेखनद्वारें प्रदर्शित करण्यास रानटी व अडाणी लोकसुद्धां प्रयत्न करितात. मग आमची वेदकालीन स्थिति तर

---

१ Max Muller's Ancient Sanskrit Literature.
What can India Teach us ?

दुसऱ्या एके ठिकाणीं एका शोधक विद्वानानें म्हटलें आहे कीं,

" Thus the Rigveda, *the most ancient work* that exists in any language known at present, must have been composed between 6000 B. C., and 4000 B. C.,

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

फारच सुधारलेली[1] आणि पुष्कळ सरसावलेली असल्याच्या योगानें, आम्हांला त्यावेळीं लिपिज्ञान असणें अगदीं साहजीक होतें. आणि दुसरें असें कीं, प्रातिशाख्यासारख्या शास्त्रीय विषयाचें विवेचन लिपिज्ञानाशिवाय शक्यच नाहीं; व म्हणूनच त्यांत लेखनकलेचा अन्तर्भाव होतो, असें म्हणणें प्राप्त येतें.

तत्संबंधीं प्रमाण.

परंतु, इतक्यानेंच वाचकाचें समाधान होण्यासारखें नसून, एखादी मुद्देसूद गोष्ट, किंवा अप्रत्यक्षप्रमाण, अथवा प्रत्यक्ष पुरावा रुजूं केल्याशिवाय, ते कोणतीही गोष्ट गृहित धरणार नाहींत, हें खचित आहे. सबब, आतां आपण त्याच तजविजीस लागूं, आणि लेखनकलेचे आह्मींच प्रवर्तक आहोंत असें वाचकास दाखवून, पौरस्त्य व पाश्चात्य पंडितांच्या अभिप्रायांसमवेत तें आह्मी आपल्या अल्प समजुतीप्रमाणें सिद्ध करूनही देऊं.

इ. स. पूर्वी चवथ्या शतकांतील.

सांप्रतकाळीं, मद्रास इलाख्यांतील कृष्णा परगण्यांत, पुष्कळ शोधाअन्तीं जे कित्येक नूतन शिलालेख उपलब्ध होत आहेत, त्यावरून पाश्चात्य विद्वानांनीं आपलें

---

१ आमच्या वेदकालीन आर्यांची चांगली उन्नतावस्था होती, असें वेदावलोकनानें उत्तम प्रकारें व्यक्त होतें. कारण, शेतिभाति, घरेंदारें, किल्ले व नगरें, धनधान्य, वस्त्रप्रावरण, सोनें, रुपें, तांबें आणि लोखंड, शस्त्र व अस्त्र, रथ आणि नौका, गाई व घोडे, वनस्पति आणि औषधें, इत्यादि सर्व कांहीं त्यांस माहित असून, ते त्यांचा यथेष्ट उपभोगही घेत असत. इतकेंच नव्हे तर, ऐहिकज्ञानाप्रमाणेंच पारमार्थिक ज्ञानांतसुद्धां ते चांगले निष्णात होते, यांत बिलकूल शंका नाहीं. ( भारतीय साम्राज्य. पु. ४ थें पहा. )

असें ठाम मत दिलें आहे कीं, चन्द्रगुप्त राजा पाटलीपुत्र येथील गादीवर बसण्यापूर्वी, आणि त्याच्याही अगोदर अनेक शतकें, लिपिज्ञान हें भरतखंडांत चांगल्या रीतीनें प्रचारांत होतें. आतां, चन्द्रगुप्त हा इ. स. पूर्वी ३९० वर्षांच्या सुमारास राज्य करीत होता; तेव्हां इ. स. पूर्वी चवथ्या[1] शतकाच्याही अगोदर पासून ही लेखनकला आह्मांला अवगत होती, यांत संशय नाहीं. आणि ह्मणूनच, इ. स. च्या तिसऱ्या शतकापूर्वी, भरतखंडांत लिपिज्ञान कोणास देखील माहीत नव्हतें, असें जें मॉक्समुलरनें[2] प्रतिपादन केलें आहे, त्याला निःसंशय हरताळच लागते.

इ. स. पूर्वी सहाव्या शतकांतील.

परंतु, इ. स. पूर्वी सहाव्या शतकाच्याही अगोदर, आम्हां आर्यहिंदूंस ही लेखनकला माहित होती, असें ललित विस्तारावरून उघड दिसतें. कारण, साक्य-

---

१ ह्या गोष्टीला ग्रीक इतिहासकारांचेंही प्रत्यन्तर मिळतें. "Strabo, quotes Nearshus to prove that the Indians wrote letters on cotton, that had been well beaten together and that they had milestones with Inscriptions upon them indicating resting places and distances. Quintus Curtius mentions that they wrote on the soft rind of trees, a custom which is confirmed by an allusion in the play of the Sàkuntală."

( Cust. Royal. A. Sceiety. Art. XVI. P. 327 )

२ Here then, we have the first fact, viz, *that writing even for monumental purposes, was unknown* in India, *before the third* century B. C."

( What can India teach us ? )

मुनीस ( बुद्धास ) लिहावयास शिकविलें असल्याविषयीं त्यांत उल्लेख असून, ती गोष्ट पाश्चात्यांस[१] सुद्धां कबूल आहे.

इ. स. पूर्वीं सातव्या शतकांतील, अथवा २४०० वर्षांच्या अगोदरील.

आतां, बुद्धाच्या पूर्वींच पाणिनि[२] होऊन गेला; व त्याच्या वेळीं देखील लिपिज्ञान भरतखंडांत चांगलें अवगत होतें, असें अनेक प्रमाणांवरून सिद्धवत् ठरतें. तसेंच, ह्या बाबतींत, आणि आम्हीच लेखनकलेचे प्रवर्तक आहोंत या संबंधानें, पौरस्त्य[३] व पाश्चात्य[४] पंडितांचें देखील अनुकूलच मत आहे, असेंही म्हणावें लागतें. मात्र, एकेठिकाणीं मॉक्सम्युलरनें असें ( अगदीं आधार नसतांही ) म्हटलें आहे कीं, पाणिनीच्या अगोदर आणि बौद्धधर्माचा प्रसार होण्यापूर्वीं, लेखनकला अशी भरतखंडांत म्हणून बिलकुल माहीतच नव्हती. परंतु, गोल्डस्टकरनें मॉक्सम्युलरचें[५] माप त्याच्याच पदरांत घातल्यामुळें, पाणिनीला सुद्धां हें लिपिज्ञान होतें, असें

तत्संबंधीं मॉक्सम्युलरचीं भलतींच प्रमेयें, व त्यामुळें झालेल्या चुकीची कबुली.

---

१ Journal Royal Asiatic Society. Article. XVI. एका हीब्र्यूग्रंथकाराच्या लेखावरून देखील ही गोष्ट सिद्ध होते.

२ पाणिनीचा काल पंडित सत्यव्रत सामश्रमीच्या मतें इ. स. पूर्वीं २४०० वर्षें, व डा० भांडारकर यांच्या मतें इ. स. पू. ७०० वर्षें होय.

३ बाबू राजेन्द्रलाल मित्र, शामजी कृष्णवर्मा, इत्यादि.

( ग्रंथकर्ता. )

४ Goldstucker on Panini. Journal Royal Asiatic Society. Article XVI. Origin of Indian Alphabet.

५ बुद्धापूर्वीं, व पाणिनीच्या अगोदर, हिंदूंस लेखनकला माहीत

( पुढें चालू. )

मॉक्समुलरला निष्प्रांजलपणें कबूल करणें भाग पडलें. इतकेंच नव्हे तर, आपलें प्रथमचें सर्व बोलणें माघारें घेऊन, त्याजला आणखी असेंही जाहीर करावें लागलें कीं, ब्राह्मणें, व सूत्रें, ह्यांत ब्राह्मणांच्या लेखनकलेचे द्योतक असे जे कित्येक शब्द आहेत, त्यांजवर नजरचुकीनें दृष्टी न गेल्यामुळें, हा प्रमाद आपल्याकडून घडला असून, ब्राह्मणांचें प्राक्कालीन लिपिज्ञान उघडकीस न आणण्याच्या हेतूनें कोणताही प्रकार झाला नव्हता. तात्पर्य, ब्राह्मण व सूत्रकालांत, लेखनकला ब्राह्मणांस अवगत होती, असें सप्रमाण

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

नव्हती. ("But there are *stronger arguments* than these *to prove* that *before* the time of Panini, and *before the first* spreading of Buddhism in India, *writing* for literary purposes was *absolutely* unknown,") असें जें मॉक्समुलरनें प्रथमतः प्रतिपादन केलें होतें, त्याला ("This last word *lipikára* is an *important word*, for it is the *only* word in the Sutras of Panini which can be legitimately *adduced to prove* that Panini was *acquainted with the art of writing*. He teaches the formation of this word III. 2. 21," ) इत्यादि लेखानें विरजण लागल्या कारणानें, त्याचा प्रथमचा लेख त्याला परत घ्यावा लागला. फार तर काय सांगावें पण, त्याला आणखी असें देखील कबूल करणें भाग पडलें कीं,

"It is possible, I may have *overlooked some words* in Brahmanas and Sutras, which *would prove the existence of written books previous to* Panini. If so, it is not from any wish to suppress them."

( Max Muller ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

सिद्ध झाल्याकारणानें, त्या गोष्टीला मॉक्समुलरलासुद्धां मानच डोलवावी लागली.

असो. सर्वांत, पुराणतम दाखला ह्मटला ह्मणजे ऋग्वेदांतील हाय. ह्यांत, पदांतील अक्षरें, या अर्थानेंच "अक्षर" या शब्दाचा उपयोग केला असून, क्षर न होणारें तें अक्षर, असा त्याचा अर्थ समजावयाचा. अर्थात्, त्यावरून लेखनक्रियेचा उद्बोध[1] होत असल्याचें व्यक्त होतें.

ऋग्वेदांतील प्रमाण.

अन्य प्रमाणांवरून देखील, हें आमचें लिपिज्ञान किती प्राचीन आहे, हें वाचकाच्या लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे. हें प्रमाण ह्मटलें ह्मणजे, आमचे शिलालेख होत. उपलब्ध असलल्या सर्व शिलालेखांत, विराट नगरीच्या टेंकडीवर बर्ट साहेबास सांपडलेला अतिप्राचीन होय. हा लेख प्रथमतः, इ. स. १०२२ सालीं, महमदानें जुन्या विराट शहरावर स्वारी करून नारायणपुर नामक गांवांतील नारायणदेवाचा ज्यावेळीं विध्वंस केला, त्यावेळीं सांपडला. ह्या लेखावरून, तें नारायणाचें देवालय, व तो शिलालेख, अशीं सुमारें चाळीस हजार वर्षांपूर्वींचीं असल्याचें सिद्ध होतें, असें कित्येक पाश्चात्य[2] शोधकांचें मत आहे.

शिलालेखाचें प्रमाण.

आतां, ही लेखनकला कशी उत्पन्न झाली; तत्संबंधीं सामग्री कोणत्याप्रकारें हाताम लागली; सांकेतिक चिन्हें

[1] History of Indian Literature. By Weber.

[2] General Cunningham's Ancient Geography of India.

कोणत्या तऱ्हेनें उदयास आलीं; आणि तीं उदयास आणण्यास कोण कारणीभूत झालें; याविषयीं विचार करूं.

हरएक शास्त्रांत आणि नानाविध कलांत, आमच्या आर्यपूर्वजांचेच सर्वप्रकारचे शोध असल्याकारणानें, त्यांच्याकडे ज्याप्रमाणें त्यांचें उत्पादकत्व[1] सहजींच येतें, त्याचप्रमाणें आपले असंख्य व अमूल्य विचार प्रदर्शित करण्यासाठीं, म्हणजे अर्थात् ते लेखनद्वारां चिरकाळ राहावे म्हणून, त्यांनीं आपली अद्वितीय कल्पना लढविली, व ते अग्रेसर झाले, याविषयीं तिलमात्रही शंका नाहीं.

असो. ही लेखनकला प्रथमतः आर्यांनींच शोधून काढिली असें प्रतिपादन करण्यास काय आधार आहे, किंवा तें खरें मानण्यास कोणतें प्रमाण आहे, असें कोणी विचारील तर, त्याला श्रुतिस्मृत्यादि[1] ग्रंथसमूहाकडेच बोट दाखविलें, ह्मणजे त्याची सर्व जिज्ञासा परिपूर्ण होण्यासारखी आहे. मात्र, तो शोधक आणि परीक्षक असून, दुराग्रही नसला पाहिजे. याखेरीज, आमच्या मताला पुष्टी देणारे कित्येक पौरस्त्य व पाश्चात्य पंडितांचें देखील सप्रमाण लेख आहेत. सबब, त्याबद्दलही योग्य विचार झाला पाहिजे.

आनुमानिक प्रमाण.

शिवाय, ज्या आर्य लोकांनीं हरएक शास्त्रकलांत शोध केला, त्यांनीं सर्वोपयोगी लेखनकला शोधून काढण्याच्या

---

[1] The Bible in India.

[1] Early *excellence* of the Brahman's *in all these branches of learning*.

( Elphinstone's India. P. P. 92-95 ).

कामीं कांहींच कल्पना चालविली नसेल, अथवा हें लिपिज्ञान त्यांच्या कुशाग्र बुद्धीच्या अन्वेषणखलांतून अजिबात निसटून गेलें असेल, असें सकृद्दर्शनीं तरी खचितच बिलकुल अनुमानं होत नाहीं. कारण, ही लेखनविद्या नसली ह्मणजे ठिकठिकाणीं अडचण येऊं पाहते; आणि विद्याभिनिवेशाचा प्रवाह अगदींच बंद पडतो. तेव्हां अर्थात्च, जर आमचा हा प्रचंड बुद्धिवैभवनिर्झर एकसारखा सुरूच आहे, तर त्याचा चाललेला सतत प्रवाह धारण करण्यास, कांहीं तरी प्रचंड सांठवण करणें विशेष अवश्यकतेचें होतें; अगर त्याचें योग्य प्रस्रवण होण्यास, विहित मार्ग तरी खुला करून दिला पाहिजे होता. कारण, तो नितान्त बलवान असल्यामुळें, निरुद्ध किंवा कुंठित होणें अगदींच संभवनीय नव्हतें.

लिपिज्ञानाची अवश्यकता.

सबब, हें उद्‌भवलेलें संकट व आलेली अडचण दूर करण्यासाठीं, आमचे आर्यपूर्वज लिपिज्ञानार्थ शनैः शनैः प्रवृत्त झाले; आणि कांहीं ठरीव अशा सांकेतिक चिन्हांनीं आपला अडून राहिलेला कार्यभाग त्यांनीं उरकून घेतला. पुढें, ज्या द्रव्यांच्या योगानें ह्या सांकेतिक चिन्हांचा उपयोग करून घेतां येईल असें त्यांस वाटलें, त्यांचा त्यांनीं सर्रास्त उपयोग केला, व त्याचाच पुढें कालान्तरानें, सर्वत्र फैलावं झाला. मात्र, आर्यांच्या त्यां प्राथमिक अवस्थेंत, हीं द्रव्यें अगदीं साधीं होतीं; व त्यामुळें, भूर्जपत्रें, तालपत्रें,

---

[1] गोल्डस्टकरचें पाणिनि पहा. ( पान १५–१६ ).

[2] Journal Royal Asiatic Society. Article. XVI.

शिला, इत्यादिकांचा यथेष्ट उपयोग करून घेण्यांत येत असे, यांत फारसें आश्चर्य नाहीं.

वर्णांची योजना, व क्रिया आणि वस्तुद्योतक चिन्हें.

आमच्या आर्यपूर्वजांनीं जीं अक्षरें किंवा सांकेतिक चिन्हें प्रथमारंभीं शोधून काढिलीं, तीं वस्तुद्योतक आणि क्रियाद्योतक होतीं, यांत लेशमात्नही शंका नाहीं. उदाहरणार्थ, **ख**ची आकृति कुदळी सारखी असून, त्या अक्षरानें खनन क्रिया प्रदर्शित केली असावी. त्याचप्रमाणें, यवाकृतीचा **य**, रज्वाकृतीचा **र**, श्रवणाकृतीचा **श**, हस्ताकृतीचा **ह**, दंताकृतीचा **द**, धनुष्याकृतीचा **ध**, मुखाकृतीचा **म**, वीणाकृतीचा **व**, इत्यादि अक्षरें, तेंते वर्ण ध्वनित करण्यासाठीं, किंवा त्या त्या क्रिया व्यक्त करण्याच्या हेतूनेंच योजिलेलीं असल्याचें दिसतें. (कनिंगह्यामकृत प्राचीन भरतभूगोल पहा.)

लेखनकलेंत आर्यांचें उत्पादकत्व.

अशा प्रकारें, ह्या आर्यावर्तांत आह्मी भारतीयांनीं कोणाचेंही साहाय्य न घेतां, केवळ आपल्याच कल्पकतेनें सदरीं निर्दिष्ट केलेली वर्णयोजना केली. तथापि, ती इतकी सुरेख, अपूर्व, आणि आश्चर्यकारक आहे कीं, त्याबद्दल पाश्चात्यांस[१] सुद्धां विलक्षण कौतुक व नवल वाटतें.

---

१ The Indian alphabet is a *marvellous* and *magnificent phenomenon quite unrivalled in the world.*" It " represents a *symmetrical* combination of *symbols,* designed by skilled giammarians to indicate various *shades* of sounds, and is grouped in *scientific order.* The *hand of a Brahman Scholar,* dealing with *a highly polished langaage is detected*

( पुढें चालू. )

इतकेंच नव्हें तर, वर्णसौष्ठवाचा असा अपूर्व देखावा सर्व जगांत अन्यत्र कोठेंही दृष्टीस पडत नाहीं, असा स्पष्टपणें ते आपला अभिप्राय व्यक्त करितात; व ह्यासंबंधानें आह्मी कोणाचे देखील ऋणी नाहीं असें सुद्धां ते निर्भिडपणें लिहितात[१]. फार तर काय सांगावें, पण, थोड्याबहुत फेरफारांनीं ह्याच लिपीचें बहुतेक सर्वांनींच अनुकरण केलें असल्याचें दिसतें. आणि एडवर्ड टॉमस्[२] तर असेंही प्रतिपादन करतो कीं, भारतीय लोकांनीं आपल्या स्वतः-च्या बुद्धिप्रभावानें जी लेखनकला शोधून काढिली, तिचा

भारतीयांनीं शोधून काढलेल्या लेखनकलेचा प्रसार.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )
*here.*" "This alphabet *became the mother of a magnificent family* spread over India, Nearer, and Farther, Ceylon, the Indian Archipelago, and the Central Asiatic Plateau as far as Mongolia. In these two particulars, the Indian Alphabet, *has no parallel.*" ( Origin of Indian Alphabet,by Mr. R. N. Cust, Honorary Secretary. Journal Royal Asi-. atic Society. )

१ ह्या बाबतींत जनरल कानिंगहॉम् म्हणतो,

"My own conclusion is that the *Indian alphabet is of purely Indian origin.*"

( General Cunningham's Corpus Inscriptionum Indicarum. vol. I. 1877. P. P. 52-53. 60-61. )

२ हा गृहस्थ नामांकित मुद्राशास्त्रवेत्ता व सांकेतिकलिपिकोविद होता, असें कस्टनें याचें वर्णन केलें असल्यामुळें, त्याचा लेख प्रमाणादाखल नमुद केला आहे.

( Distinguished Numismatist and Palæographer. )

लिपिज्ञानांत, पाश्चात्य राष्ट्रांनीं भारतीयांचें स्वीकारलेलें शिष्यत्व.

प्रसार प्रथमतः तीन चार राष्ट्रांत झाल्यावर, चवथ्या पाळीला हें लिपिज्ञान शमी लोकांच्या वाट्याला येऊन, त्यांस प्राप्त झालें. मात्र, तें उपलब्ध झाल्यावर, भारतीयांचे परिपूर्णतेस आलेले वर्ण छिन्नभिन्न करून, त्यांत बराच फेरबदल केल्यावर, ते त्यांनीं उपयोगांत आणिले, असा त्याचा अभिप्राय आहे. शिवाय, ह्या लेखनकलेच्या संबंधानें, भारतीय हे फिनिशियन लोकांचे बिलकुल ऋणी नसून, ह्यांची ती निराकृति लिपि, अथवा त्यांचे ते अस्पष्ट, अस्ताव्यस्त, व संदिग्धवर्ण, यांचें भारतीयांनीं प्रथम अनुकरण करून, नंतर ते त्यांनीं हल्लीं दिसत असलेल्या पूर्ण दशेस आणले, अशी कल्पना करणें सुद्धां लेशमात्र संभवत नाहीं, असें एड्वर्ड टॉमस्नें आपलें ठाम मत विशेष रीतीनें प्रदर्शित केलें आहे.

तत्संबंधीं पौरस्त्य व पाश्चात्य पंडितांचा अभिप्राय.

असो. लिपीज्ञानाचें उत्पादकत्व भारतीयांकडे असल्याविषयीं, राजेन्द्रलालमित्र, शामजी कृष्णवर्मा, इत्यादि पौरस्त्य पंडित, आणि गोल्डस्टकर, लॉसन्, कानिंग्हॅम्, डॉसन्, जेम्स प्रिन्सेप, बुल्हर, वेली, वगैरे पाश्चात्य

---

१ James Prinsep's Essays, edited by Edward Thomas, vol. II. P. P. 48-144.

Numismatic Chronicle. 1863. No. III.

डॉसन् म्हणतो, "At any rate, the Indians have beyond doubt, scientifically developed their alphabet, to an extent *quite unparalleled elsewhere.*"

विद्वान, यांचा अभिप्राय आहे. ह्यापैकीं, प्रिन्सेप्नें तर आणखी असेंही आपलें स्वतःचें मत प्रदर्शित केलें आहे कीं, पुराणतम ग्रीक भाषेंतील अक्षरें म्हटलीं, म्हणजे संस्कृत वर्णांचा केवळ विपर्यासच होय. अर्थात्, संस्कृत वर्णांचेंच ग्रीक लोकांनीं अनुकरण केलें. परंतु, तें त्यांजला बरोबर न साधल्या कारणानें, त्यांनीं ते कसे तरी उलट सुलट गिरविले; आणि त्यांजला जसें वळण लागलें, त्याप्रमाणेंच त्यांचीं कायमचीं अक्षरें बनलीं, इतकाच त्याचा मथितार्थ समजावयाचा.

---

१ प्रिन्सेप म्हणतो, " The oldest Greek *was nothing more than Sanskrit turned topsy-turvy.* "

( Journal Bengal Asiatic Society. vol. VI. P. 219. 1839 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

# भाग आठवा.

## भाषाविषयक पाश्चात्य प्रयत्न.

भाषाविषयक पाश्चात्य प्रयत्न.

भाषेच्या संबंधानें, आमच्या आर्यपूर्वजांनीं ज्याप्रमाणें अतिप्राचीन काळीं विशेष परिश्रम करून हें शास्त्र प्रथमतःच उदयास आणिलें, त्याप्रमाणें, पाश्चात्यांपैकीं एकानें देखील, फारतर काय सांगावें पण सुधारलेलें म्हणून म्हणविणाऱ्या एका राष्ट्रानें सुद्धां, अशा प्रकारचा प्रयत्न तितक्या पुरातन काळीं केल्याचें बिलकुल दिसत नाहीं.

त्यासंबंधानें भारतीयांनीं मारलेली आघाडी.

ह्यासंबंधीं शोध आम्ही आर्य हिंदूनीं[1] आपल्या स्वतःच्या बुद्धीनें व कल्पकतेनेंच लाविले असून, फार प्राचीनकाळीं देखील विशेष अवश्यकता दिसली तेव्हां, कठिण शब्दाची व्याख्याही आम्हींच दिली. इतकेंच नव्हें तर, प्रत्येक शब्द कसा उत्पन्न झाला हें कळण्यासाठीं, त्याचा व्यवच्छेद, त्याची मीमांसा, आणि त्याचें व्याकरण देखील आम्हींच केलें.

---

१ " The Hindus are the *only nation that cultivated the science of grammar without having received any impulse directly or indirectly* from the Greeks. "

( Max Muller's Science of Language. vol. I. P. 126. 1880. ).

आह्मी, अति प्राचीन काळापासूनच, भाषेचें अगदीं निःसीम भक्त असल्यामुळें, तिचें नितान्त महत्व व खरें स्वरूप आम्हांला पूर्णपणें लवकरच समजलें होतें. आणि म्हणूनच, आमच्या आर्यपूर्वजांनीं तिच्या प्रीत्यर्थ विलक्षण उद्योग व भगीरथ प्रयत्न प्रथमपासूनच एकसारखे चालविले असल्याचें दिसतें. सबब, त्याबद्दल आम्हींचसे काय, पण ह्या भूमंडलावरील सर्व राष्ट्रांनीं[2] त्यांचे कृतज्ञतापूर्वक उपकारच मानले पाहिजेत.

भाषाविषयक त्यांचें झालेलें ऋण.

भाषेचें ऐश्वर्य व तिचा प्रभाव, हीं ऋग्वेदांतील खालीं लिहिलेल्या ऋचेवरून चांगलीं व्यक्त होतात.

**तदद्यवाचःप्रथमं मसीय येनासुराँऽअभिदेवाऽअसाम् ।**
**ऊर्जादऽउतयज्ञियासः पंचजनाममहोत्रंजुषध्वम्॥१३॥**
(ऋ. अ. ८. अ. १.)

पाश्चात्यापैकीं, ग्रीस देश हा सुधारलेल्या राष्ट्रांत निःसंशय प्रमुखत्वानें[3] मोडतो. परंतु, भरतखंडाशीं तुलना केली

१ ऋग्वेद्. मं १०. ह्यांत वाचेला अनुलक्षून एक ऋचा आहे, व तिजवरूनच तिचा पराक्रम व्यक्त केल्याचें दिसून येतें.

२ ह्यासंबंधानें मॉक्समुलर म्हणतो, " We ought not to forget the names of the discoverers of the elements of language—the founders of one of the most useful and most successful branches of philosophy—the first grammarians, " ( the Indians. ).

( Max Muller's Science of Language. vol. I. P. P. 95-96. 1880. )

३ 'India and Greece, the only two countries where we can watch its ( i. e. of the science of language ) origin and history. '

( Max Mnller's Science of Language. vol. I. P. 92. 188. )

भरतखंड व ग्रीस देशाची तुलना.

तर, तो देखील पुष्कळच मागासलेला होता, असें निभ्रांत म्हणावें लागतें; आणि विशेषतः भाषाशास्त्राच्या संबंधानें तर, ग्रीस देशाची ही न्यूनता कोणालाही तेव्हांच कबूल[१] करणें भाग पडतें.

परंतु, असें आहे तरी, ह्या व अन्य पाश्चात्य राष्ट्रांनीं भाषाविषयक जे कांहीं थोडे बहुत परिश्रम केले आहेत, त्यांचा इतिवृत्तान्त देणें अवश्य असल्याकारणानें, तो येथें थोडक्यांत देतों.

पाश्चात्यांची जंगली शब्दाची व्याख्या, व तिचें निरर्थकत्व.

ज्याप्रमाणें आमचे आर्यपूर्वज आर्येतर लोकांस धर्मभ्रष्ट व क्रियाहीन समजून, त्यांस दस्यू, अनार्य, आणि म्लेच्छ, इत्यादि उपपदें देत, त्याचप्रमाणें ग्रीक लोक देखील परकीयांस जंगली ह्मणत, व त्यांस अज्ञान, मूढ, आणि रानटी समजत. त्यामुळें, ग्रीकेतरांचा पेहेराव, त्यांची रीतभात, व त्यांची भाषा, यांचा ते कंटाळा करीत. इतकेंच नव्हें तर, त्यांचें अनुकरण करण्यांत ते एक प्रकारचा कमीपणाच मानीत. ह्यावरून, ग्रीक

---

१ "The Prátisákhyas ( of the Hindus ), the *oldest production of the grammatical school, show a surprising acquaintance* with the phisiological facts of phonetic utterance, and *far surpass the most advanced labours* of the Greeks in *the same direction,*"

( A. H. Sayce's Introduction to the Science of Language. vol. I. P. 41, )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

लोकांच्या मनाचा कोतेपणा विशेष रीतीनें व्यक्त होतो. कारण, कोणतेंही ज्ञान व्यक्तिविशेषावर अवलंबून नसल्यामुळें, तें जेथें जेथें उपलब्ध होईल, तेथें तेथें संपादन करण्याची इच्छा धरणें ज्यास्त श्रेयस्कर होय, हें कोणासही कबूल करावें लागेल. सूर्याचें तेज ग्रीस देशांत एक तऱ्हेचें असून अन्य प्रांतांत भिन्न प्रकारचें आहे, असें बिलकुल नाहीं. आणि हीच गोष्ट ज्ञानाला सुद्धां, तितक्याच अंशानें लागू आहे, यांत संशय नाहीं. कारण,

**गुणाः पूजास्थानं गुणिषु नचलिंगं नच वयः ।**

पाश्चात्य गर्वोक्ति, व भारतीयांचें उदारमन.

आमचे आर्यपूर्वज खचितच अशा प्रकारचे नव्हते. ते विशेष उदारमनाचे, पोक्तविचाराचे, आणि विशालबुद्धीचे असत. त्यामुळें, त्यांच्या पासंगाला लागणारा क्वचित्च कोणी दृष्टीस पडे. मात्र, ते स्वतः फारच धर्मशील होते; व ह्याच कारणानें ते धर्मभ्रष्टांस प्रसंगविशेषीं दस्यू, अनार्य, आणि म्लेच्छ ह्मणत. तथापि, आर्येतर लोक ज्ञानशील असल्याबद्दल जेव्हां जेव्हां त्यांची खात्री होई, तेव्हां तेव्हां ते त्यांस योग्य मान देत. एवढेंच नव्हें तर, ते शास्त्रज्ञ असल्यास त्यांस यवनाचार्यही ह्मणत; व केवळ आर्यांप्रमाणेंच त्यांची ते प्रतिष्ठा राखीत.

गुण हेंच पूजास्थान असें समजून, भारतीयांनीं ग्रीक विद्वानांस दिलेला मान.

वराहमिहिर नांवाचा आमच्यांत एक मोठा नामांकित ज्योतिषी होऊन गेला. त्यानें देखील ज्योतिःशास्त्रांत यवनांची प्रगति पाहून, त्यांस मोठा मान दिला आहे; आणि ते ऋषीप्रमाणेंच पूजनीय

आहेत, असा सुद्धां त्यांच्यासंबंधानें त्यानें आपला अभिप्राय प्रदर्शित केला आहे.

म्लेच्छाहि यवनास्तेषु सम्यक्शास्त्रमिदं स्थितम् ।
ऋषिवत्तेऽपिपूज्यन्ते किंपुनर्दैवविद्द्विजः ॥

बृहज्जातक नांवाचा वराहमिहिराचा एक ग्रंथ असून, त्याजवर भट्टोत्पलाची टीका आहे. हींत, त्यानें देखील यवनशास्त्रज्ञांस यवनाचार्य[1] म्हटलें आहे.

भारतीयाशीं ग्रीक लोकांचा सहवास, व त्यामुळें त्यांच्या दर्पाचा अस्त.

असो. ग्रीक लोकांचा अशा प्रकारचा हा वृथा दर्प कायम न राहतां, तो कालान्तरानें अनेक कारणांनीं मावळत चालला; आणि इराणी लोकाशीं जें त्यांचें तुमुल युद्ध सुरू झालें, त्यामुळें, परकी भाषांचें ज्ञान नसल्यानें किती अडचणी उद्भवतात, याचा त्यांस आपोआपच अनुभव आला. पुढें, शिकन्दर बादशहाच्या स्वारीचा धुडकूस मातला, व त्या योगानें अनेक राष्ट्रांशीं त्यांचा ज्यास्त संबंधही जोडला गेला. त्या कारणानें, दुसऱ्या बऱ्याच भाषांविषयीं त्यांजला थोडेंबहुत ज्ञान होऊन, त्यांची दृष्टि फांकत चालली, आणि त्यांची बुद्धि पण विकासाप्रत पावली. तदनन्तर, भरतखंडावर स्वारी आली, व शेवटीं तीच, ग्रीक लोकांच्या आणि आमच्या निकट समागमास कारणीभूत झाली.

आमचा ज्ञानोदधि, व त्याची ग्रीक लोकांस आलेली प्रतीति.

ह्या भेटीनें ग्रीक लोकांचा दर्प अजिबात गळून गेला, व सर्व भूमंडलावर ज्ञानार्जनांत आपणच काय ते श्रेष्ठ आहोंत, असा जो त्यांना भ्रम होता, तो अगदीं

---

१ यवनाचार्यैः कथितम । (vide also As. Res. vol. IX P.376)

नाहींसा झाला. कारण, प्रथमतःच अश्रुतपूर्व असें आमचें ज्ञानभांडार त्यांजला समजलें. तेणेंकरून, आम्हां आर्यांच्या ज्ञानाविषयीं त्यांजला महदाश्चर्य[1] वाटूं लागलें; तत्वज्ञानांत[2] आमची पारंगता पाहून, त्यांचें कुतूहल वाढत चालें; अनेक शास्त्रांतील[3] आमच्या शोधांनीं त्यांस विस्मय झाला; नानाविध कलांतील आमचें नैपुण्य अवलोकन करून, त्यांजला मोठें समाधान वाटलें; आणि आमचा अगाध संस्कृतोदधि पाहून तर, त्याचें मन अगदीं चकितच होऊन गेलें.

तिचा परिणाम,

अशा प्रकारची वस्तुस्थिति असल्यामुळें, ग्रीक शिवाय दुसऱ्या देखील अनेक भाषा, परिशीलन करण्यालायक आहेत; आणि त्यांतही विशेषेंकरून, आर्यांची संस्कृत भाषा तर निव्वळ ज्ञानाची खाणच होय, असें ग्रीक लोकांस सहजींच वाटूं लागलें. आणि ह्याचा प्रत्यक्ष व तात्कालिक परिणाम असा झाला कीं, आमच्या तत्वज्ञानाविषयीं त्यांची जिज्ञासा जागृत होऊन, हें नूतनज्ञान संपादण्याच्या कामीं त्यांनीं अहर्निशीं प्रयत्न चालविला.

---

1 " Brahmans, who were *even then* considered by Greeks as the *guardians of a most ancient and mysterious wisdom.* "

( Max Muller's Science of Language.
vol. I. P. 99. )

२ एल्फिन्स्टन्कृत हिंदुस्थानचा इतिहास.

३ डा. हंटरकृत हिंदुस्थानचा इतिहास. रोमेशचन्द्रदत्तकृत प्राचीन भारतेतिहास. नियार्कस्, आरियन्, डा. वाइज्, डा. रायल्, इत्यादि पहा.

व ह्यानें झालेलें मतांतर.

दुसरा परिणाम असा घडून आला कीं, आमच्या परिचयानें ग्रीक लोकांचा अज्ञानतम नाहींसा झाला; व त्यामुळें, ग्रीकेतर सर्व जनसमूह केवळ जंगलीच[1] आहे, असा जो त्यांचा दृढ ग्रह होऊन गेला होता, त्यालासुद्धां फांटा मिळाला, आणि विरजण लागलें. अर्थात्, त्यायोगानें, परकी भाषांचें हीनत्व जाऊन, त्या शिकण्याविषयींची इच्छा त्यांच्यांत उत्पन्न झाली. पण, ही इच्छा कोणत्या उपायांनीं पार पडावी, एवढाच कायतो मोठा व बिकट प्रश्न राहिला. कारण, दुभाषांखेरीज ह्या भाषांचें ज्ञान होणें शक्य नव्हतें; आणि दुभाषांची तर पोठी पंचाईत पडूं लागली. तेव्हां, ही अडचण दूर होण्यासाठीं, बहुतकरून प्रथमतः मुलांचीच

---

१ ह्या जंगली शब्दाची किंमत पाश्चात्यदेशांत फारशी, किंबहुना कांहींच असल्याचें दिसत नाहीं. कारण, ग्रीक लोक हे सुशिक्षित, अशिक्षित, इत्यादि झाडून सर्वांस, जंगली ( Barbarians ), अथवा हीनवादी ( Agglossoi ) म्हणत. पोललोक जर्मन्-लोकांस मुके ( Niemiec ) च समजतात. जर्मन् लोकांनीं सेल्टस् लोकांस म्लिष्ट ( *Walh* in Old High German, *Vealh* in Anglo-Saxon ) असें नामधेय दिलें होतें. ह्याचेंच *Welsh* हें सांप्रतचें रूप असून, त्याचा अर्थ अस्पष्ट किंवा अव्यक्त होतो इंग्रज लोक तर भारतीयासारख्या प्राक्कालीन सुधारणेच्या अगदीं उच्च कोटीप्रत पोहोंचलेल्या लोकांस, ( म्हणजे अर्थात् आम्हां हिंदूंस देखील, ) केवळ आमच्याकडे आतां प्रभुत्वाचें नातें राहिलें नाहीं येवढ्याच कारणानें, जंगली, क्षुद्र ( *Niggard* ), इत्यादि उपपदें सर्रास व निर्भिडपणें देतात. आतां, ह्या सोंलीव आणि निवडक विशेषणांस आम्ही किती अंशानें पात्र आहोंत, हें इतिहासज्ञांस तेव्हांच समजण्यासारखें आहे. सबब, तद्विषयक विवेचन येथें करण्याचें प्रयोजन नाहीं.

योजना झाली असावी, असें वाटतें. कारण, बाल्या-वस्थेंत मुलांचा व्यवहार ज्या ज्या भाषांत चालतो, त्या त्या भाषा त्यांस अनायासेंच अवगत होतात.

भाषाज्ञानाचा उपाय, हल्लींचा

आमच्या महाराष्ट्र साम्राज्यांत, आमचीं ठाणीं व आमच्या वसाहती भरतखंडांत चोहोंकडे चमकत होत्या. तसेंच, हिमाचलापासून तों तहत रामेश्वरापर्यंत, आणि अटकेपासून तों थेट ब्रह्मपुत्रानदीपावेतों, आमचा भगवा झेंडा अव्याहत फडकत असल्यामुळें, आम्हांला वारंवार सर्वत्र जावें लागे; व सामान्यतः आमचा लवाजमा, नोकर-चाकर, इत्यादि तेथेंच राहत. क्वचित् प्रसंगीं, आमचे सगे-सोयरे सुद्धां त्याच ठिकाणीं वस्ती करीत, आणि त्या त्या मुलखांचा कारभारही संभाळीत. त्याकारणानें, त्यांजला व त्यांच्या मुलांबाळांस, मराठी, गुजराथी, हिंदुस्थानी, फार्सी, कानडी, मल्याळी, इत्यादि अनेक भाषा येत. अशाच प्रकारें, इंग्रजांचेंही दिसून येतें. यांचीं मुलें, ह्या देशांतील आया व दाया, यांजबरोबर असतात. त्यामुळें, त्यांजला त्यांची भाषा सहजींच येते. आतां, ही भाषा बहुतकरून हिंदुस्थानी असते. तथापि, क्वचित् प्रसंगीं ह्या दाया मल्याळी, कानडी, किंवा गुजराथी, वगैरे भिन्न भिन्न जातीच्या असल्यास, त्या भाषा देखील त्या मुलांस विशेष प्रयास न पडतां अवगत होतात.

पूर्व काळचा.

अशाच प्रकारची स्थिति प्राचीन काळीं सुद्धां असल्याचें दिसतें. कारण, मीडियाचा राजा शियाक्षरस यानें देखील अशाच तऱ्हेची योजना केली असून, त्याच्या हद्दींत शक लोक आल्यावर,

त्यांच्या भाषेचें व तिरंदाजीचें[1] ज्ञान स्वराज्यांतील सर्व लोकांस व्हावें एतदर्थ, त्यानें कित्येक मुलें त्यांच्या गोटांतच पाठविलीं होतीं.

ह्यावरून, एकमेकांत दळणवळण, आपापसांत व्यवहार, आणि परदेशाशीं व्यापार, इत्यादींची सुरवात झाली, म्हणजेच अन्य भाषांचें ज्ञान होऊं लागतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पूर्वीच्या काळचे ग्रीक व्यापारी व दुभाषे.

हिरॉडटस् हा आपल्या ग्रंथांत असें लिहितो[2] कीं, प्राचीन काळीं, ग्रीक व्यापाऱ्यांचे ताफेच्या तांडे व्होल्गा नदीपासून यूरल-पर्वतापर्यंत पसरलेले असत. परंतु, त्यांस त्या प्रदेशाची भाषा त्यांजला येत नसल्यामुळें, त्यांजबरोबर सात दुभाषे निरनिराळ्या भाषा[3] जाणणारे होते. पुढें, कालान्तरानें, इराण देशाशीं ग्रीसचें युद्ध जुंपल्यावर, त्या भाषेचें ज्ञान ह्यांजला करून घ्यावें लागलें. थेमिस्टोक्लीज्‌ला इराणी भाषा चांगली येत असे, आणि तींत तो अगदीं अस्खलित बोले. ह्याशिवाय, अनेक ग्रीक तत्ववेत्तेसुद्धां भरतखंडांत जाऊन, तेथून आमच्या ब्राह्मणांपासून तत्वज्ञान शिकून आले होते. तसेंच, पायथॉगोरस् व

---

१ हिरॉडटस् १.७३.( Herodotus. lib I. cap. 73.)

२ ( ४. २४ ).

३ ह्या भाषा स्लॉहॉनिक, तुराणी, फिनिक, व त्यांचे पोटभेद असावेत, असें मॉक्समुलरचें मत आहे. ( भाषाशास्त्र. १. ९८.)

४ Lassen. Indische Alterthumskunde. ( b. III. s. 379. )

डिमॉक्रिटस् सुद्धां इकडे आले होते, असें अनेक ग्रीक ग्रंथकारांच्या लेखांवरून कळून येतें.

ब्राह्मणांच्या ग्रंथसंपत्तीचा ग्रीक लोकांवर परिणाम, व ह्यांचा दुसऱ्यांवर.

आतां, ब्राह्मणांच्या ग्रंथसंपत्तीनें ज्याप्रमाणें ग्रीक लोकांवर आपला पगडा बसविला, त्याचप्रमाणें शिकंदराच्या स्वारीनें, ग्रीक लोकांच्या सहवासाचा परिणाम मिसर ( ईजिप्त ), टायर, बाबिलन्, इत्यादि देशांवर झाला, यांत तिळमात्रही शंका नाहीं. कारण, आपापल्या देशाच्या मूलसाधनांवरून, बिरोसस्‌नें बॉबिलन्‌चा इतिहास लिहिला. मिनॉण्डरनें टायरचा इतिहास तयार केला. आणि मॉनिथोनें मिसर देशाचा इतिहास रचला. परंतु, मोठ्या दुःखाची गोष्ट ही कीं, एवढ्या परिश्रमानें जे हे इतिहास तयार झाले, त्यांचा ग्रीक लोकांनीं कांहींच उपयोग केला नाहीं. त्यामुळें, अर्थात्च त्यांची वाताहात झाली, हें विशेष रीतीनें सांगावयास नको. शिवाय, बिरोसस्‌ची स्वभाषा बॉबिलन्, मॉनिथोची मिश्री, व मिनॉण्डरची फिनिश होती. त्याकारणानें, एकीची शराकृतिलिपि, आणि दुसरीचीं कापी अक्षरें, हीं त्या त्या इतिहासकारास चांगल्या रीतीनें अवगत असत. सबब, जर त्यांचें इतिहास ग्रीक अथवा मॉसिडोनियन् विजेत्यांनीं राखिले असते, अथवा ते जपून ठेविले असते, तर त्यांच्याच आधारें त्या त्या देशाचे विशेष विस्तृत व व्यापक इतिहास लिहून ठेवण्यास उत्कृष्ट संधि मिळती, हें निर्विवाद आहे.

शिवाय, सदरहू इतिहासांचें संरक्षण झाल्यानें, आणखी

एक विशेष फायदा झाला असता. तो हा कीं, **बा**बिलन्‌ची **बा**णाकृति लिपि, आणि **मिश्र** देशांतील **का**मीवर्णसंज्ञा उकलण्याच्या संबंधानें हल्लीं जें अकाण्डतांडव चाललें आहे, व त्या बाबतींत जी उरस्फोड पडली आहे, आणि प्रस्तुत-काळीं देखील तत्संबंधानें जी जिकीर सोसावी लागत आहे, तिचें कारणच पडलें नसतें.

ग्रीक लोकांची इतिकर्तव्यपरांङ्मुखता, व परकीयांचा उत्साह.

असो. याप्रमाणें, **भा**षाशास्त्राच्या कामीं अशा प्रकारची उत्तम व अनकूळ संधी मिळाली असूनही, **ग्री**क लोकांनीं बराच काळपर्यंत, किंबहुना आमचा सहवास होईपर्यंत, ह्या अमूल्य संधीचा, अथवा आपल्या ज्ञानाचा, सुधारणेचा, आणि बुद्धिवैभवाचा, कांहीं एक उपयोग करून घेतला नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. परंतु, त्यांतही विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, ज्या परकीयांस **ग्री**क लोक केवळ विजयोन्मादांत व आपल्या शहाणपणाच्या घमेंडींत **जं**गली म्हणत, त्यांनींच इराणी, आणि विशेषतः **सं**स्कृत भाषेचा अभ्यास करून, आपल्या ज्ञानांत भर पाडली. फारतर काय सांगावें पण, ह्या ज्ञानार्जनानेंच पाश्चात्य देशांत विद्येचा थोडाबहुत फैलाव होऊन, लोकांत जास्त चळवळ सुरू झाली. कारण, कालान्तरानें, **शि**कन्दराबाद् (आलेग्‌झांड्रिया) हें व्यापाराचें मथक होऊन, तें **वि**द्यापीठ बनलें. इतकेंच नव्हें तर, तेथें अनेक प्रकारच्या विषयांवर ऊहापोह होऊं लागला. आपापल्या देशाचे कायदे व कानू, रीत आणि रिवाज, धर्म व नीति, याबद्दलची आपापसांत चर्चा सुरू झाली; आणि **भा**रतीय कवि व ऐतिहासिक, शास्त्रज्ञ व पंडित, आत्मवादी व लोकाय-

तिक, तत्वज्ञ आणि मीमांसक, इत्यादींच्या सुकीर्तीचा मोहक परिमल सर्वत्र पसरलेला असल्यामुळें, त्यांच्या ज्ञानोदधींत पोहोण्याची ज्याला ज्याला म्हणून संधी मिळाली, त्यानें त्यानें अहर्निशीं सतत प्रयत्न केला.

भाषान्तराची चळवळ.

पुढें, अशाच प्रकारची चळवळ सुरू असल्यानें, टॉलेमीच्या कारकीर्दींत सेप्चु आजिंट् नांवाचें जुन्या कराराचें भाषान्तर झालें. कोणीं असेंही सांगतात कीं, इ. स. पूर्वीं २८७–२४६ च्या सुमारास, डिमिट्रियस् फॅलेरियस् हा शिकंदराबादेस मुख्य ग्रंथाधिपति असून, त्याच्या शिफारशीवरूनच टॉलेमियस् फिलाडेल्फस्नें आरिस्टियस् नांवाच ज्यू, बायबलाचें हस्तलिखित प्राप्त व्हावें, आणि त्याचें भाषान्तर करण्यासाठीं सत्तर दुभाषे मिळावे या हेतूनें, जरूसलम् येथें पाठविला होता. तथापि, कित्येकांचा अभिप्राय याहून अगदीं भिन्न आहे. ते असें म्हणतात कीं, कांहीं ग्रीक ज्यू शिकंदराबादेस राहत असत. परंतु, ते आपली स्वभाषा बिलकुल विसरून गेले होते. त्यामुळें, त्यांनीच आपल्यासाठीं, हें भाषान्तर करविलें. पण, तें कसेंही असलें तरी, इ. स. पूर्वीं २८९ वर्षांच्या सुमारास, हीब्र्यू बायबलांतील बऱ्याच भागांचें भाषांतर, निरनिराळ्या विद्वानांनीं ग्रीक भाषेंत केलें होतें, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

ह्याच सुमारास झन्दअविष्टेचें भाषान्तर देखील ग्रीकमध्यें झालें असून, तें हर्मिप्पस्नें[1] केलें असल्याविषयीं प्लिनीचें[2] म्हणणें आहे.

---

१ हा हर्मिप्पस् अरिस्टॉटल्च्या दीक्षेंतील होता. ह्याच्या गुरूचें नांव क्यालिमेकस् असे, व शिकन्दराबादेंत ह्याची गणना नामांकित विद्वानांत होई. २ (३०. २).

भाषाशास्त्रविषयक शोधाचा अभाव.

अशा रीतीनें विद्याभिवृद्धीची हालचाल ह्या काळांत बरीच दिसून येते. परंतु, ती सर्व भाषान्तर रूपानें होती, असें म्हणण्यास कांहींएक हरकत नाहीं. कारण, पाश्चात्यदेशांत, भाषेच्यासंबंधानें शास्त्रीय शोधाची अजून देखील बिलकुल सुरवात नव्हती. **प्लेटो** (इ. स. पू. ३८९) व **ऑरिस्टॉटल्** (इ. स. पू. ३३५) हे मोठे शोधक, विद्वान, आणि नामांकित तत्ववेत्ते असल्याविषयीं ख्याति आहे. तथापि, त्यांनीं सुद्धां भाषाशास्त्रसंबंधीं कांहींच परिश्रम केले नव्हते; व **ग्रीस**सारख्या सुधारलेल्या देशांत सुद्धां, इ. स. पूर्वीं ३९ वर्षांपर्यंत त्याचा गंध देखील नव्हता, असें म्हणावें लागतें. **डायोनिशियस् थ्राक्स** हा तिकडील पहिला व्याकरणकार होय, असें **मॉक्समुलर**चें म्हणणें आहे;[1] आणि ह्याचा काळ इ. स. पू. ४०।३९ वर्षें असल्याचें समजतें. ह्यावरून, भाषाशास्त्राचा **ओ**नामा पाश्चात्य देशांत अजूनहीं सुरू नव्हता, यांत शंका[2] नाहीं.

---

१ " Dionysius ... ... the author of the first practical grammar. " ... ...
( Science of Language. vol. I. P. I07. 1880 ).

२ ज्ञानाच्या कांहीं शाखांत **आ**रिस्टॉटल्‌ची प्रवीणता असतांही भाषाशास्त्रांत त्यानें कोणता देखील शोध केला नाहीं, याबद्दल फारच वाईट वाटतें. इतकेंच नव्हे तर, हा पाश्चात्य दीप मावळल्या नंतर सुमारें दोन हजार वर्षेंपर्यंत, ह्या महत्वाच्या विषयांत म्हणण्यासारखा प्रयत्न कोणींच केला नाहीं, हें आश्चर्यकारक होय. आणि ही गोष्ट **पा**श्चात्यांस सुद्धां कबूल करावी लागतें. ह्यासंबंधानें एके ठिकाणीं **मॉ**क्समुलर म्हणतो :—

( पुढें चालू. )

हें भाषाशास्त्र रोमन लोकांच्या गांवीं, किंबहुना स्वप्नीं सुद्धां नव्हतें, हें विशेष रीतीनें सांगावयास नको. तथापि, रोम शहरांत ग्रीक भाषेचा अभ्यास ज्यारीनें चालला होता त्यामुळें, विद्याभिवृद्धीचें पाऊल पुढें पडून रोमन नागरिकांची व्यावहारिक भाषा देखील विशेषेंकरून ग्रीकच झाली, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. आणि क्विन्टिलियन्च्या लेखांतच ह्याला बलवत्तर प्रमाण मिळतें. कारण, त्यानें एके ठिकाणीं ( १. १. १२ ) असें सुचविलें आहे कीं, प्रत्येक मुलास प्रथम ग्रीक शिकवून, नंतर ल्याटिन शिकवावें. ह्यावरून, ग्रीक भाषेचें पाश्चात्य देशांतील तत्कालीन प्राबल्य वाचकाच्या ध्यानांत येईल.

रोमचें शिष्यत्व.

पण, ह्याचेंही नवल वाटावयास नको. कारण, रोमन् लोकांस ग्रीक लोकांपासूनच धूलाक्षरें उपलब्ध झालीं; व ह्यांनींच त्यांस लिहिण्यावाचण्यासही शिकविलें. तेव्हां अर्थात्‌च, इतालियनचें सर्वस्त्र ग्रीकच असल्या-

व रोमनें ग्रीसचें केलेलें अनुकरण.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" It is strange that even so Comprehensive a mind as that of Aristotle should have failed to perceive in languages, some of that law and order, which he tried to discover in other realms of nature. As Aristotle, however, did not attempt this, we need not wonder that it was not attempted by any one else, for the next two thousand years."

( Lectures on the Science of Language. vol. I P. 139 ).

मुळें, त्यांजला ह्या भाषेची महत्वी जास्त वाटावी, ह्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. इ. स. पूर्वी ४९९ सालीं, रोमन लोकांस कायदेकानू करण्याची इच्छा झाली. परंतु, त्यांचीं तत्वें कोणत्या धर्तीवर असावींत, हें त्यांस कळेना. ह्मणून त्यांनीं कित्येक गृहस्थ **ग्रीस** देशांत पाठवून, त्यांजकडून **सोलन्**नें केलेल्या **आथेन्स** येथील, व अन्य ठिकाणची, व्यवहारशास्त्रविषयक माहिती मिळविली. याप्रमाणें, एकंदर सर्व ग्रीकमय होतां होतां, त्याची मजल येथपर्यंत येऊन ठेपली कीं, रीतरिवाज, पेहेराव पोषाक, बोलणें चालणें, लिहिणें वाचणें, इत्यादि संबंधानें, **ग्री**कशिवाय बिलकुल पानच हलेनासें झालें; आणि त्याचा अखेर परिणाम असा झाला कीं, **ग्री**क भाषेचें ज्ञान हें एक संभावितपणाचें लक्षणच बनलें. **रो**मचा पहिला इतिहास इ. स. पू. २०० वर्षें, **ग्री**कमध्येंच तयार झाला, व तो **फे**बियस् **पि**क्टरनें लिहिला. **टा**यबीरियस् **ग्रॅ**कस् हा **ऱ्हो**ड्ज् येथें परराज्य प्रतिनिधि (consul) होता. तथापि, प्रसंगविशेषीं, आपली स्वभाषा जी **ल्या**टिन् तींत आपले विचार प्रदर्शित न करितां, त्यानें इ. स. १७७ सालीं ग्रीक भाषेंतच भाषण केलें. (Mommsen). **फ्लॉ**मिनियस्ला समजण्याकरितां, **ग्री**क लोकांनीं जेव्हां **ल्यॅ**टिन् भाषेंत त्याचें अभिनन्दन केलें, तेव्हां तो स्वतः **ल्या**टिन्मध्यें न बोलतां, त्यानें त्यांस उत्तरादाखल म्हणून ग्रीक भाषेंतच कांहीं श्लोक रचले. अशा प्रकारें, **ग्री**क भाषेचें जणुकाय वेडच पिकल्यासारखें झालें; आणि त्यामुळें, गुणावगुणांचा योग्य विचार न होतां, सकट घोडे बारा टक्के, याप्रमाणें

बनाव बनून, कित्येक गुणांबरोबर अनेक ग्रीकदोषांचें देखील रोमन् लोक यथेष्ट अनुकरण करूं लागले.

ऑडिसीचें भाषान्तर, व वैदग्ध्यशून्यता.

याप्रमाणें, सरकारांत व दरबारांत, जनीं आणि विजनीं, घरीं व दारीं, किंबहुना सर्वत्रच, ग्रीकभाषेचें प्राबल्य दिवसानुदिवस ज्यास्त वाढत चाललें असतां, लिव्हियस् ऑण्ड्रॉनिकस्नें इ. स. पू. २७२ च्या सुमारास, ऑडिसीचें ल्याटिनांत पद्यात्मक भाषान्तर केलें. हें इतकें ग्राम्य, अरसिक, व अबडधोबड झालें होतें कीं, त्याला कोणीही तेव्हांच नाक मुरडलें असतें. परंतु, असें असूनही, त्याची उत्कृष्ट ग्रंथांत गणना होई, आणि तत्कालीन पाश्चात्य लोक त्याला पूर्णतेची केवळ प्रतिमाच समजत. ह्यावरून, त्यावेळेस रोमन् लोकांची व इतरांची अभिरुचिशून्यता आणि रसिकताभाव किती होता, हें वाचकाच्या ध्यानांत सहजीं येईल.

व्याकरणविषयक ग्रंथ व व्याख्यानें.

पुढें, इ. स. पू. १६९ च्या सुमारास, क्रेटीज़्नें रोम शहरांत व्याकरणावर ग्रीक भाषेंत व्याख्यान देण्याचें सुरू केलें, आणि तेव्हांपासूनच त्या लोकांस व्याकरणाची किंचित गोडी लागली, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तदनंतर, लूशियस् ईलियस् स्टिलोनें सुद्धां ल्याटिन् भाषेंत व्याकरणविषयक व्याख्यानें दिलीं व धातुविवेचक एक ग्रंथही लिहिला. व्हॉरो, लुसिलियस्, आणि सिसरो, हे त्याचेच शिष्ये होत. ह्यापैकीं, व्हॉरोनें ल्याटिन् भाषेवर चोवीस पुस्तकें लिहिलीं होतीं. सिसरोला देखील व्याकरणांत प्रमाणभूत मानतात. तथापि, त्यानें

एकही ग्रंथ केला असल्याचें ऐकिवांत नसून, तसा दाखलाही मिळत नाहीं. **लूशियस्** सुद्धां ग्रंथकारच होता, व त्यानें आपल्या **आक्षेपकाव्यांतील** नवव्या पुस्तकांत, वर्णविन्यासाची सुधारणा व्हावी, याबद्दलचा विचार केला आहे. पण, याहीपेक्षां विशेष आश्चर्य करण्यासारखा ग्रंथ ह्मटला म्हणजे, **सीझरचें लॅटिन्** भाषेंतील व्याकरण[1] होय. हें व्याकरण **सीझरनें ग्यालिक** युद्धांत व्यग्र असतां लिहिलें. त्यावरून त्याचा विद्याविनोद, त्याची अध्ययनपरायणता, आणि त्याचें चित्तैकीकरण, हीं चांगल्या रीतीनें व्यक्त होतात.

तथापि, इतकें झालें तरी, भाषाशास्त्राचें खरें परिशीलन होण्याला अद्यापि सुरवात झाली नव्हती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मात्र, नाना प्रकारचीं भाषान्तरें झाल्यानें, विद्येची अभिवृद्धि होत गेली; व त्या योगानें, धातूचीं रूपें, नामें, क्रियापदें, इत्यादिकांची जिज्ञासा सहजींच होऊं लागली.

डायोनिशियसचें मूलव्याकरण, व त्यानंतरचे वैयाकरण.

असो. ह्याच सुमारास, पूर्वीं उल्लेख केल्याप्रमाणें, **डायोनिशियस् थ्रॅक्सचें ग्रीक** भाषेंतील मूलव्याकरण **रोम** शहरांत प्रसिद्ध झालें. आतां, **डायोनिशियसची** ही कृति म्हटली म्हणजे, व्याकरणाचा पाया व त्याची परिसमाप्तीच समजावयाची. कारण, ह्याच्या नन्तरच्या वैयाकरणांनीं त्यांत नूतन कांहीं एक घातलें नसून, अन्य तऱ्हेची कल्पकताही चालविली असल्याचें दिसत नाहीं. मात्र, त्यांत

1 ह्याचें नांव **डी. ऑनॉलजिया** (De Analagia), असें आहे.

क्वचित् कोणी सुधारणा करून, प्रसंगोपात न्यूनाधिक्यही केलें[1], यांत संशय नाहीं. व्हेरियस फॉकस् आणि क्विंटिलियन्, हे इ. स. च्या पहिल्या शतकांतले वैयाकरण होत. स्कॉरस्, आपोलेनियस्, डिस्कोलस्, व त्याचा मुलगा हिरोडियानस, हे दुसऱ्या शतकांत होऊन गेले; आणि प्रोबस् व डोनेटस् हे चवथ्यांत झालें. पुढें, रोमच्या राज्यांत बरीच धामधूम उडून, रोम येथून राजधानीचें ठिकाण उठलें, आणि तें कुस्तन्तुनिया येथें गेलें. त्यावेळीं, तेथें ग्रीक व लॅटिन या दोन्ही भाषा मिळून, एकंदर वीस वैयाकरण होते. सहाव्या शतकांत, प्रिसियानस प्रसिद्धीस आला, आणि ह्याचें व्याकरण मध्ययुगांत[2], व हल्लीं देखील कांहीं काळपर्यंत प्रमाणभूत मानीत.

" ग्रीकपासून ल्याटिन्ची उत्पत्ति " या नांवाचें पुस्तक डोनेटस्नें केलें असून, प्रिसियानस्नें त्याच धोरणानें, ग्रीक आणि ल्याटिन् भाषांतील साम्य दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. प्रिसियानस्ची व्याकरणावर एकंदर अठरा पुस्तकें असल्याचें सांगतात; व त्यावरून, त्यावेळीं, व्याकरणविषयक बरीच अभिरुचि विद्वान मंडळींस लागली होती, असें वाटतें.

परंतु, हे सर्व ग्रंथ केवळ बाल्यावस्थेंतच असून, ते केवळ निरुपयोगीच होते; आणि ही गोष्ट पाश्चात्य विद्वान व भाषापंडित, यांस देखील कबूल करणें भाग पडतें. कारण, भाषाशास्त्राच्या दृष्टीनें त्यांचा कांहींएक

---

[1] मॅाक्समुलरचीं भाषाशास्त्रविषयक व्याख्यानें ( १. १२३ ).
[2] Middle ages.

उपयोग नव्हता, असें एका पाश्चात्य विचक्षणानें व अनेक भाषाकोविदानेंच कबूल[1] केलें आहे.

पाश्चात्य देशांत इतका कालपर्यंत भाषाशास्त्राचा अभाव असण्याचें पहिलें कारण.

आतां, इतका कालपर्यंत भाषाशास्त्राचें खरें स्वरूप ग्रीकलोकांस कां कळलें नव्हतें, आणि अजून देखील ते अंधकारांत कां चांपचीत राहिले होते, याबद्दलच्या कारणाचा शोध करण्यास, फार दूर जावयास नलगे. कारण, तें अगदीं उघड व सहजीं दृष्टिगोचर होण्यारारखें आहे. प्रथमतः, ग्रीकलोकांचा दर्प हाच त्यांच्या अज्ञानास विशेष कारणीभूत झाला, यांत संशय नाहीं. पौरस्त्यांशीं, आणि त्यांतही प्रमुखत्वानें पुढें सरसावलेले असे जे भारतीय त्यांशीं, ग्रीकलोकांचा बिलकुल परिचय झाला नव्हता. त्यामुळें, आमच्या भारतीय ज्ञानलवाची त्यांच्यात यत्किंचितही भर नसे. तेव्हां, अर्थातच,

---

१ सेसनें आपल्या भाषाशास्त्रविषयक ग्रंथांत, एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

"Donatus and Priscian were the philological lights of Europe for *more than a thousand years*, and *such lights were little better than darkness*. Once, and once only, was an attempt made to break down their monopoly and to introduce *oriental learning into* Western *education*."

( Introduction to the Science of Language. By A. H. Sayce. Dy. Prof. of Comparative Philology. vol. I. P. 24. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

उंबरांतील कीटकांस ज्याप्रमाणें उंबरहेंच अखिल जगत् वाटतें, त्याचप्रमाणें ग्रीक[1] लोकांसही झालें होतें. शिवाय, पाश्चात्य देशांत, त्यांजवर कोणाचीच सरशी होऊन प्रकाश न पडल्यानें, **वासरांत लंगडी गाय शहाणी**, या ह्मणीस अनुसरून, आपणच कायते सर्वांत श्रेष्ठ, असें त्यांस वाटूं लागलें होतें. त्यामुळें, उघडच, अहंभावानें त्यांच्यांत हं हं ह्मणतां प्रवेश केला, आणि ह्या गच्या पडिचा त्यांच्यावर तत्काल परिणाम झाला. त्यांनीं सर्वांस तुच्छ मानण्याचें आरंभिले, व ग्रीकेतर भाषांस तर जंगलीच ह्मणण्याची सुरुवात केली. त्या योगानें, अन्य भाषांतून कांहीं एक घेण्यासारखें नाहीं, असें त्यांजला भासत जाऊन, ते निव्वळ अर्ध्या हळकुंडानेंच पिवळे झाले.

कित्येक पाश्चात्यांची ही अशा प्रकारची स्थिति पाहून, भर्तृहरि कवीच्या सुभाषिताची आठवण होते, आणि त्यांतलि विचारतत्व खरोखरच आपल्या प्रत्ययास येतें. तो म्हणतो,

यदाकिंचिज्ज्ञोऽहं द्विपइव मदान्धःसमभवम्
तदासर्वज्ञोऽस्मीत्यभवदवलिप्तंममनः ।
यदाकिंचित्किंचिद्बुधजनसकाशादवगतम्
तदामूर्खोस्मीतिज्वरइवमदोमेव्यपगतः ॥

(नीतिशतक)

शिवाय, पाश्चात्य देशांत भाषाशास्त्र मागासण्याला आणखी

---

[1] Vide Ockley's History of the Saracens.
(मागें पान २१६-२१७ पहा.)

दुसरें कारण,

एक कारण झालें. तें हें कीं, ग्रीक[1] लोकांप्रमाणेंच अन्य पाश्चत्यानीं[2] सुद्धां, दुराग्रहास निष्कारण अवकाश दिला. त्यामुळें, ह्या शास्त्राची अवश्य ती प्रगति न होतां, तिची वाढ आपोआपच कुंठित झाली.

वास्तविक रीतीनें पाहिलें तर, प्रत्येक शास्त्राची प्रगल्भता, पूर्णता, व त्याचा विस्तार, इत्यादि सर्व केवळ

---

१ " They ( the Greeks ) only distinguished between Greeks on one side, and all other languages on the other, comprehended under the convenient name of ' *barbarous.* '

( Max Muller's Science of Language.
vol. I. P. P. 136-137 ).

२ असा दुराग्रह कित्येक पाश्चात्यांससुद्धां पसंत नाहीं. ह्यासंबंधानें सेस म्हणतोः—

" Rut even the older Humanists were not much better. They knelt before the spirit of classical antiquity, with a worship at once child-like and unreasoning.... ... Unreasoning and unreasonable however, as the Humanists were in their treatment of grammar, they were out done by the Orthodox who found in the errors of the Vulgate—such as *Da Miki bibara* direct proofs of Divine inspiration, and the power of the Holy Spirit to override the usual rules of grâmmar. ... ... So, again, Smaragdas writes in ıeference to the rule laid down by Donatus, that *Scalae, Scopae,* quadrigae, must be used in the plural : we shall not follow him, beeause we know that the Holy Spirit has always ( namely, in the Vulgate ) employed these words in the singular. " ( vol. I. P. P. 26-27. )

सत्यान्वेषणावरच अवलंबून असतात. आणि म्हणूनच, ह्या सत्यसूर्यावर जेव्हां जेव्हां दुराग्रहाचें पटल येतें, तेव्हां तेव्हां त्याला आपोआपच ग्रहण लागून, त्याचा निव्वळ खग्रासच होतो. इतकेंच नव्हें तर, शोधाचें मूळ जळून जातें, व त्याचा पाया एकदम खचतो.

सत्यान्वेषण व हंसवृत्ति.

यासाठीं, प्रत्येक शास्त्रीय विषयांत आपण हंसवृत्तीचें अवलंबन केलें पाहिजे. आणि ज्याप्रमाणें पयोनीरमिश्रणांतून हंस हा फक्त क्षीराचाच अंगिकार करतो, त्याचप्रमाणें शास्त्रीय शोधांत सत्याचें ग्रहण करून, असत्याचा त्याग करणेंच अत्यवश्य आहे. दुराग्रह म्हणजे असत्याचा पाया होय. सबब, सत्यान्वेषणार्थ, हरएक सूज्ञ मनुष्यानें दुराग्रह हा अजिबात सोडूनच दिला पाहिजे.

हीब्र्न्यू भाषेसंबंधी मिथ्या कल्पना व दुराग्रह.

आतां, अशा प्रकारचा दुराग्रह, अज्ञान, असमंजस, व अशिक्षित लोकांनीं केला, तर त्यांत नवलच नाहीं. पण, सूज्ञ, पंडित, आणि शोधक मंडळींतही अशाच मासल्याचीं उदाहरणें दिसून येतात, हेंच मोठें आश्चर्य होय. हीब्र्यू ही अखिल जगाची मायभाषा असल्याबद्दल गिंचर्ड व थोमॉसिन् सारखे विद्वान लोक प्रतिपादन

---

१ 'As Hebrew *is undoubtedly the mother of all languages,* how are we to explain the process by which Hebrew became split into so many dialects; and *how can these numerous dialects,* such as Greek and Latin, Coptic, Persian, Turkish, *be traced back to their common source,* the Hebrew ?

( पुढें चालू. )

करतात. गोरोपियस्नें तर इ. स. १५८० सालीं, ऑण्ट-वर्प येथें एक स्वतंत्र लेखच छापला, व त्यांत, डच ही नन्दनवनांतील व्यावहारिक भाषा होती, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. ऑण्ड्री केम्रनें " नन्दनवनाची भाषा " नामक पुस्तकांत, असें चमत्कारिक आणि हसूं येण्यासारखें विधान केलें आहे कीं, ईश्वर हा आदामजवळ स्वीडिश भाषेंत बोलला; तदनंतर, आदामनें आकाशांतल्या बापाला डॅनिश भाषेंत उत्तर दिलें; व सर्पानें ईव्हशीं फ्रेंच भाषेंत संभाषण केलें. इ. स. १८३८ सालीं, बोर्डो येथें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत, एका विद्वत् परिषदेनें अशाच मासल्याचा पण याहून भिन्न तऱ्हेचा सिद्धान्त ठोकून दिला आहे; आणि त्यावरून असें दिसतें कीं, बास्क हीच आदाम व ईव्हची नन्दनवनांतील भाषा होती.[१]

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. परंतु, त्यांवरून, कित्येक पाश्चात्य विद्वानांचें बालिश मत, त्यांची कोती समजूत, आणि त्यांचा नितान्त दुराग्रह, इत्यादि गोष्टी चांगल्या रीतीनें व्यक्त होतील. ( ग्रंथकर्ता. )

प्रोफेसर मॉक्समुलर म्हणतो,

" Guichard went so far as to maintain, that *as* Hebrew was written from right to left, and Greek from left to right, Greek words might be traced back to Hebrew by being simply read from right to left." ( Lectures. Science of Lauguage. vol. I. P. 148. Note 23. )

१ Vide Hennequin, Essai Surl' Analogic des Langues. Bordeaux. 1838. P. 60.

याप्रमाणें, कशास कांहींच मेळ नसून, ज्याच्या त्याच्या मर्जीप्रमाणें, ज्यानें त्यानें कांहीं तरी लिहिलें, असें झालें. त्यामुळें, त्यापासून भाषाशास्त्रास काडीमात्रही साहाय्य न होतां, उलट त्या शास्त्राची विटंबना मात्र झाली, असें म्हणणें प्राप्त येतें. खरोखर, भाषाशास्त्रविषयक आमच्या भरतखंडांतील प्राक्कालीन गहन विचार, व पाश्चात्य देशांतील तत्संबंधी प्राचीन आणि अर्वाचीन बालिश विवेचन, यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.[1]

त्यामुळें भाषाशास्त्राचें मागें पाऊल.

---

[1] ह्या गोष्टींचें आम्हां भारतीयांस आश्चर्य वाटावें, यांत तर कांहींच नवल नाहीं. पण, कित्येक पाश्चात्य पंडितांससुद्धां, ह्या निष्कारण दुराग्रहाचा व स्वमतमंडनप्रयत्नाचा मोठा खेद आणि विलक्षण अचंबा वाटतो. एके ठिकाणीं **मॉक्समुलर** म्हणतो,

"It is astonishing what an amount of real learning and ingenuity *was wasted* on this question during the 17th and 18th Centuries."

( Lectures. Science of Language. vol. I. P. 147 ).

[1] ही गोष्ट पाश्चात्य विद्वानांससुद्धां कबूल करावी लागते. कारण, एके ठिकाणीं **सेस्** असें म्हणतो कीं,

"The *Native Grammarians* of India had *at an early period analysed both the phonetic sounds and the vocabulary of* Sanskrit *with astonishing precision,* and *drawn up a far more scientific system of grammar. than the philologists of* Alexandria or Rome *hád been able to attain.* The Devanâgari alphabet is a *splendid monument of phonological accuracy,* and long before the time of Saadia (who died in 942 A. D.) and Khayyug (970 A. D.) the

( पुढें चालू. )

असो. अशा प्रकारें कित्येक **पाश्चात्यांनीं हीब्र्यूभाषेचा** निष्कारण देव्हारा माजवून, केवळ मृगजलावरच तिची एक टोलेजंग इमारत बांधण्याचा विचार केला असतां, **लीबनिझनें** त्यांच्या कृतनिश्चयास वेळींच विरजण लाविलें, आणि त्यांचा तो डळमळीत असलेला इमला अगदीं जमीनदोस्त करून टाकिला. हा गृहस्थ फारच विशाल बुद्धीचा असून, खरोखर पंडित होता. इतकेंच नव्हें तर, तो अष्टपैलू, बहुगुणी, व विद्येच्या अनेक शाखांत निष्णात असे. तो मोठा वेदान्ती असून, चांगला कायदेपंडित होता; आणि ऐतिहासिक असून, गणितांत देखील त्याची विशेष प्रवीणता होती.

हीब्रयूस लीबनिझनें घातलेला आळा, व पाश्चात्यांच्या भ्रांतिमूलक समजुतींचें निरसन.

भाषेच्या संबंधानें त्याचे विचार तर फारच गहन असत, व म्हणूनच ते निःसंशय विचारार्ह आहेत, हें ज्यास्त सांगावयास नलगे. टेन्झेल्ला पत्र लिहितांना, त्यानें एके

भाषेच्या संबंधानें लीबनिझचे विचार.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

Hindu " *Vaiyákaranás,* " or grammarians had not only discovered that roots are the ultimate elements of language, but had traced all the words of San skrit to a limited number of roots. Their gram matical system and nomenclature rest upon *a firm foundation* of *inductive reasoniug,* and though based on the phonomena of a single language, show a Scientific insight into the nature of speech, which has never been surpassed. "

( Introduction *to* the Science of Language. vol. I. P. 38. 1880 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता)

१ Life of Leibniz. By Guhrauer. vol. II. P. 129.

ठिकाणीं असें स्पष्टपणें कळविलें आहे कीं, हीब्र्यूला मूळ-भाषा ह्मणणें म्हणजे वृक्षाच्या अनेक शाखांसच मूळ खोड म्हणण्यासारखें होय. आणि म्हणूनच, अशा प्रकारची कल्पना विसंवादी असून, ती वस्तुस्थितीपासून दूर आहे, व विश्वाच्या एकंदर नियमास बिलकुल अनुसरून नाहीं.

त्या कामीं त्याचे परिश्रम.

अनेक भाषांची माहिती एकत्र करण्याच्या संबंधानें, लीबनिझनें नितान्त परिश्रम केले, ही गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे. निकोलस विट्सेन्, राहणार ॲम्-स्टर्डम्, हा इ. स. १६६६ ते १६७२ पर्यंत रशियांत फिरत असतां, लीबनिझनें त्याला असें लिहिलें कीं, 'आपण कृपा करून चांगला शोध करावा, आणि शक, सामोयेडी, सैबीरी, बष्कीर, कालमुक, तुंगुसी, इत्यादि भाषांची योग्य माहिती मिळवावी.'

त्याचें बादशहास पत्र.

पुढें, कालान्तरानें, पीटर बादशहाची ओळख झाल्यावर, त्यानें त्यासही पत्र पाठविलें व अशी विनंती केली कीं, 'महाराज, आपलें राज्य फार विस्तृत असून, आपली हुकमत अनेक राष्ट्रांवर आहे. परंतु, त्यांत ज्या कित्येक भाषा व्यवहारांत आहेत, त्यांची माहिती कोणासही नसून, त्याचें परिशीलन देखील त्याच कारणानें अद्यापिसुद्धां कोणीच केलेलें नाहीं. सबब, त्यांतील अनेक भाषांचे शब्द एकत्र करून, त्यांचा आपण एक कोश बनवावा. अथवा, निदान त्या शब्दसंग्रहाची एक लहानशी जंत्री तरी तयार करविण्याचें

---

[१] ह्याचें प्रवासवर्णन इ. स. १६७७ सालीं छापलें गेलें.

यश, आपण संपादावें. तसेंच, ख्रिस्ताच्या दहा आज्ञांचे तरजुमे भिन्न भिन्न भाषांत तयार करवावे. कीं, जेणें करून, निरनिराळ्या राष्ट्रांचें मूळ व त्यांची हालचाल कसकशी होत गेली, हें कळण्यास सुलभ पडेल. इतकेंच नव्हें तर, ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्यासही, त्या योगानें उत्तम साधन उपलब्ध होईल.'

अन्य गृहस्थांस विनंती.

बादशाहाच्या नांवचें हें पत्र व्हियेना येथून तारीख २६ आक्टोबर इ. स. १७१३ सालीं लिहिलें असून, ह्या खेरीज भाषेच्या संबंधानें आणखीही पत्रें लीबनिझनें अन्य गृहस्थांस लिहिलीं होतीं. सर्व भाषांचें मूळ एकच असल्याविषयीं त्याचें मत असे; आणि ज्या भाषा आपणांस ठाऊक आहेत, व ज्यांची माहिती आपणांस उपलब्ध आहे, त्यांची तुलना करून त्यांचें साम्य कोठें दृग्गोचर होतें; कोणत्या भाषेंतून कसा शब्द उद्भवला; त्याचें रूपान्तर कसें बनलें; तें कोणत्या कारणानीं झालें; इत्यादींचा शोध करण्याबद्दल त्याचा प्रथम पासूनच प्रयत्न होता.

हरवासूचे परिश्रम.

लीबनिझ्प्रमाणेंच हरवॉसनें देखील भाषाशास्त्र उदयास आणण्याच्या कामीं पुष्कळ परिश्रम केले होते, यांत शंका नाहीं. ह्याचा काळ इ. स. १७३५ पासून १८०९ पर्यंत असून, तो जन्मतः स्पॉनियर्ड होता. तो अमेरिकेंत असतांना, भिन्न भिन्न जातींशीं त्याचा संबंध येई. त्यामुळें, अनेक भाषांचें अवलोकन होऊन, त्याचें चित्त भाषाशास्त्राकडे

वेधलें गेलें. पुढें, तो रोममध्यें येऊन राहिला, व त्या ठिकाणीं इतालियन भाषेशीं त्याचा विशेष परिचय झाला. त्या कारणानें, त्याचे बहुतेक ग्रंथ ह्याच भाषेंत लिहिलेले आढळतात. ह्यांचें स्पॉनिशमध्येंही भाषांतर झालें आहे, आणि ते अनेक विषयांवर आहेत. ह्यापैकीं, भाषाशास्त्राच्या संबंधानें 'भाषासंग्रह'[1] नांवाचा त्याचा ग्रंथ विशेष महत्वाचा होय. ह्याचे सहा भाग असून, तो स्पॉनिश भाषेंत इ. स. १८०० सालीं प्रसिद्ध झाला. ह्यांत तीनशेंपेक्षां ज्यास्त भाषांची हकीकत दिली आहे. (मागें पान १६ पहा.)

त्याचें भाषाज्ञान.

ह्यानें चाळीस पेक्षां ज्यास्त भाषांचीं व्याकरणें लिहिलीं, आणि विभक्ति व क्रियापदांचे प्रत्यय, यांवरून असें सिद्ध केलें कीं, हीब्र्यू, चाल्डी, सीरिआक, आरबी, सिद्दी, व अम्हरी, ह्या सर्व[2] भाषा शेमी[3] कुटुंबांतील एका मूळ भाषेच्याच शाखा होत. एवढेंच नव्हें तर, सर्व मानवी प्राण्यांची मूळभाषा हीब्र्यूच आहे, असें प्रतिपादन करणें ह्मणजे केवळ अशास्त्र, आणि भाषाशास्त्राची निव्वळ थट्टाच होय. ह्याशिवाय, हरव्हॉसूचें आणखी असेंही मत असे कीं, भाषांचें साम्य किंवा कुटुंब फक्त शब्दसादृश्यानेंच ठरवितां येण्यासारखें नसून, व्याकरणतुल्यत्वानें मात्र तें निश्चित होण्याजोगें आहे.

---

[1] Catalogue of Languages, in Six volumes.

[2] Catalogo. I. 63.

[3] Catalogo. II. 468.

[4] ह्या संबंधानें, लॉर्ड मॉनबोड्डोनें देखील आपला अभिप्राय अशाच भासल्याचा दिला आहे. तो एके ठिकाणीं असें ह्मणतो कीं, "My last observation is, that, as the art of a

( पुढें चालू. )

आदिलंगचे प्रयत्न.

आदिलंगनें सुद्धां भाषाशास्त्राच्या कामीं बरेच परिश्रम केले असल्याचे दिसतें. ह्यानें तयार केलेल्या मिथ्रिडेटीज् नांवाच्या ग्रंथांत, मुख्यत्वेंकरून अनेक भाषांतील शब्दांचाच भरणा आहे, व त्याचे चार भाग छापून प्रसिद्ध झाले आहेत. पहिला भाग इ. स. १८०६ सालीं छापला. दुसरा इ. स.१८०९ सालीं, आणि तिसरा व चवथा इ. स. १८१६–१७ मध्यें छापण्यांत आला.

शब्दकोश रचनेंत बादशाहिणीचे अमूल्य परिश्रम.

हा शब्दसमूह, व भिन्नभिन्न भाषांतील अनेक वस्तूंचा नामधेयादर्श, केवळ क्याथराइन् राणीच्या हुकमानेंच तयार झाला; आणि म्हणूनच त्याचें सर्व श्रेय ह्या विदुषी राज्ञीलाच दिलें पाहिजे; असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. तिनें आपल्या राज्यांतील सर्व अधिकारी, मोठमोठाले कामगार, बडे बडे अमीर व उमराव, आणि वकील व राजदूत यांस, निरनिराळ्या भाषांतील शब्दांचे कोष व

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

language is less arbitrary and more determined by rule than either the sound or sense of words, it is one of the principal things by which the connection of languages with one another is to be discovered. And, therefore, when we find that two languages practice these great arts of language—derivation, composition, aud flexion,—in the same way, we may conclude, I think, with great certainty, that the one language is the original of the other, or that they are both dialects of the same language."

( Ancient Metaphysics. vol. IV. P. 326 ).

त्यांचें व्याकरण तयार करण्यास सांगितलें; आणि त्या परस्परांत क्वचित् साम्य दृष्टीस पडल्यास, त्याची विशेष नोंद करून ठेवण्यासही हुकूम दिला. पुढें, कालान्तरानें, सर्व सामग्री एकत्र झाल्यावर, तिनें एक प्रचंड कोश तयार करविला, व त्याला **बादशाहीकोश** असें नांव दिलें. अर्थात्, हा अनेक भाषांचें साम्य दाखविणारा कोश होता, व तो प्रथमतः इ. स. १७८७ सालीं प्रसिद्ध झाला.

असो. प्राक्कालीन **यूरोपखंडात** भाषाशास्त्रविषयक कोणत्या प्रकारचे प्रयत्न चालले होते, याचें सामान्य दिग्दर्शन होण्यासाठीं, अवश्य ती माहिती वाचकापुढें सादर केली. सबब, आतां क्षणभर पूर्व बाजूकडे वळूं, आणि **मिसर, आरबस्थान, आसीरिया, सीरिया, चाल्डिया, बाबिलन्**, इत्यादि प्राचीन प्रांतांत, त्याबद्दलची कोणत्या धोरणानें कशी तजवीज झाली होती, हें पाहूं.

भाषाशास्त्र विषयक मिसर देशांतील प्रयत्नाभाव.

**भरतखंडानन्तर**, प्राचीनत्वाच्या संबंधानें **मिसर** देशाची[1] गणना होते. परंतु, तेथें सुद्धां, भाषाशास्त्रविषयक कोणतीही चळवळ सुरू असलेली दिसत नाहीं. मात्र, शिकन्दराच्या स्वारीनंतर, **परगेमस्** व **शिकन्दरा** येथें,

१ कित्येक पाश्चात्य **मिसर** देशालाच पुराणतर समजतात. परंतु, ही त्यांची चूक आहे. कारण, **मिश्री** लोकांनीं आह्मा **भारतीयांचें** अनुकरण करून, आमचीच सुधारणा उचलली आहे, असें **मिश्री** ( इजिप्शियन् ) लोकांच्या संस्था व त्यांचा इतिहास पाहिल्यानें कोणाच्याही ध्यानांत सहजीं येण्यासारिखें आहे; आणि **पाश्चात्यांस** देखील ती गोष्ट कबूल करावी लागते. अर्थात्, आमच्या **वर्ण-**

( पुढें चालू. )

नाना प्रकारचा विद्वज्जनसमूह एकत्र होत असे. त्यामुळें, होमरचें काव्य आणि त्याचें पाठान्तर, या संबंधानें क्वचित् कोठें चर्चा होई. परंतु, त्याचा वस्तुतः कांहींच उपयोग नव्हता, हें सांगावयास नको.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

संस्था, आमची नन्दी पूजा, आमचा मनु, व आमचा राम, इत्यादि सर्व कांहीं, मिश्र देशाच्या इतिहासांत केवळ मूर्तिमंतच दृग्गोचर होतें. त्यामुळें, एकंदर पुराव्यासह सर्व माप त्यांच्या केवळ पदरांतच पडल्यामुळें, दिसत असलेली वस्तुस्थिति कबूल केल्याशिवाय, त्यांजला गत्यन्तरच नसतें. आणि ह्मणूनच, प्राचीन इतिहासकार जो टेलर, त्यानें सुद्धां, मिसर देशाच्या प्राचीन इतिहासांत, एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

" It has indeed been conjectured that the Egyptians may have *derived their system of civilization* from the Hindus; and there are *doubtless many striking analogies between the institutions* of *both nations*.... ... There *is certainly, evidence of small colonies having come from* the *mouth of* the Indus to the *shores* of Africa, and *penetrated thence to the Nile, south* of the Egyptian frontiers. " ... ... ...

" This difference in manner of life, and perhaps of descent, led to the institution of castes, which *this nation had in common with* the Hindus. "

( Ancient History. P. P. 11-12. नंदीपूजा. पान ८५। ८६ पहा. )

ह्या शिवाय, भारतीय साम्राज्य, पुस्तक २ रें, ६ वें, ७ वें, ऑनिबिझांट् बाईचें व्याख्यान, आशियाक राजपरिषद् पुस्तक १६वें ( R. A. S. Vol xiv ), इत्यादि पहावें. राम आणि मनु नांवाचे

( पुढें चालू. )

सीरिया, बाबिलन्, वगैरे ठिकाणीं, त्याबद्दलची सामसूम, आणि मागूनचे यत्न.

**सी**रिया, **चा**ल्डिया, व बाबिलन्, इकडील स्थिति देखील अशाच मासल्याची होय. परंतु, इ. स. च्या सहाव्या शतकांत, इडीसा येथें शाळा स्थापन झाल्यानें, **ग्री**क भाषेचा अभ्यास धर्मप्रसारार्थ

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

**आ**र्यवीर **भ**रतखंडांतून **सिं**धु नदीच्या मुखानें **आ**रबी व **तां**बड्या समुद्रांत शिरले, आणि पुढें **नी**ल नदीवर आपल्या वसाहती वसवून, त्यांनीं स्वपराक्रमानें आणि बाहुबलानें **मि**सर देश जिंकला, व **आ**फ्रिकाखंडांत प्रवेश केला. अर्थात् **रा**म आणि **म**नु ह्यांचेच **रा**मासिस ( Ramases ) व **मे**नीज् ( Manes ) हे अपभ्रंश होत, हें ज्यास्त सांगावयास नलगे.

( Vide Royal Asiatic Society's Journal. vol XVI. )

**मि**सर देशाप्रमाणेंच **बा**बिलन्, **आ**सिरिया, **सी**रिया, **चा**ल्डिया, **इ**राण, इत्यादींची देखील स्थिति होय. कारण, त्या सर्वांचा उदय आमच्या मागून, म्हणजे **भ**रतखंडानन्तरचाच असून, त्यांनींसुद्धां **आ**मचें अनुकरण अनेक बाबतींत केलें आहे, असें त्यांच्या धर्मसंस्था, त्यांचीं पवित्र पुस्तकें, आणि त्यांचे आचारविचार, वगैरेवरून चांगलें व्यक्त होतें. इतकेंच नव्हे तर, त्यासंबंधानें **पा**श्चात्य पंडित, व शोधक विद्वान, यांजलासुद्धां अवश्य मान डोलवावी लागते. **रा**जस्थानचे सुप्रसिद्ध इतिहासकार कर्नल **टॉड्** यांनीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

" That a *system of Hinduism pervaded the whole* Babylonian and Assyrian *Empires,* Scripture *furnishes abundant proofs.* "

( Tod's Rajasthan. P. P. 519-520 ).

ह्यावरून, आम्हा **भा**रतीयांचें **अ**ग्रजनकत्व वाचकाच्या लक्षांत सहजीं येईल.

सुरू झाला; आणि त्या योगानें सीरियन् ख्रिस्ती लोकांत विद्याभिरुचि वाढून, एक लहानसें व्याकरण सुद्धां तयार झालें. पुढें, इ. स. ६९०–७०० च्या सुमारास, कोणी एक जेकबनें त्यांत सुधारणा केली, व त्यावरूनच त्या भाषेंतील दुसरीं सर्व व्याकरणें तयार झालीं. मात्र, जेकब् मजकूरनें देखील ग्रीक पद्धतीचेंच अनुकरण केलें होतें, ही गोष्ट विसरतां कामा नये. त्यानंतर, अकराव्या शतकांत निसिबिस्चा राहणार ईलियस् नामक व्याकरणकार होऊन गेला; आणि त्याच्या मागून इ. स. च्या तेराव्या शतकांत, जॉनबरझुग्बी नांवाचा वैयाकरण झाला. सिरिआक भाषेचें व्याकरण परिपूर्णतेस आणणारा हा पहिलाच व्याकरणकार होय, असें रीनानचें मत आहे.

आरबस्थानांतील हालचाल.

सीरियाची हालचाल पाहून, आरबी लोकांसही स्फुरण आलें, व इ. स. च्या सातव्या शतकांत, आबुल आस्वेदनें व्याकरण विषयक लहान लहान आणि अगदीं त्रोटक ग्रंथ लिहिले. आबुल हा इ. स. ६८८ सालीं मरण पावला. तथापि, त्यानें सुरू केलेला प्रयत्न बंद न पडतां, तो बसरा व क्यूफा येथील पाठशाळांत तसाच चालू राहिला; व सिबावायचें व्याकरण हें ह्याच श्रमसातत्याचें फल होय. हा आरबी वैयाकरण इ. स. ७७० सालीं उदयास आला, आणि म्हणूनच तो पुराण व्याकरणकारांत मोडतो. ह्याच्या नंतर बरेच वैयाकरण झाले, व पंधराव्या शतकांत, त्यांची एकंदर संख्या २,९०० पर्यंत होऊन गेल्याचें सांगतात.

---

१ Histoire des Langues semitiques. P. 272.

याप्रमाणें व्याकरणशास्त्राचा उदय होत गेल्यानें, शब्द-व्युत्पत्तीला सहजींच अवकाश मिळाला; आणि सीरियाक व आरबी शब्दांची तुलना झाल्यानें, शमीकुळांतील मूळ शब्द कोणता, हें शोधून काढण्याचें कुतूहल आपोआपच वाढत गेलें. पुढें, सादिया ( इ. स. ९४२ ), मिनाहेम ( इ. स. ९६० ), दुनाश ( इ. स. ९७० ), जूडाखय्युग ( इ. स. ९७० ), इत्यादि अनेक ज्यु वैयाकरण झाले, व त्यांनीं शब्दव्युत्पत्तिविषयक सामान्य परिश्रम केले. तदनन्तर, इ. स १२०० सालीं, हीब्र्यू भाषेसंबंधीं आणखी थोडीशी चळवळ सुरू झाली. परंतु, तींत शब्दव्युत्पत्ति किंवा भाषाशास्त्र यांजकडे विशेष लक्ष्य पुरविण्याविषयीं कोणाच्याही मनांत न येतां, धर्माचेंच घोंगडें पुढें सरलें. त्यामुळें, ह्या हालचालीचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. इतकें-च नव्हें तर, ज्यू धर्माचें आणि हीब्र्यू भाषेचें वाजवीपेक्षां फाजिल व निष्कारण महत्व वाढून, त्याचा निव्वळ देव्हाराच माजला. असत्याची सरशी होऊन, सत्याचा लोप होत चालला. ज्ञानाला ग्रहण लागून, अज्ञानाची पोळी पिकली. दुराग्रह वाढून, स्वमतमंडनाला अवकाश मिळाला. आणि त्याचा साक्षात परंतु विघातक परिणाम असा झाला कीं, धर्माभिमानाची तीव्र ज्वाला सर्व यूरोपखंडभर पसरून, या पंडितमन्यांनीं हीब्र्यू बोलालाच अखिल जगाची मायभाषा ठरविली; व ती ईश्वरानेंच निर्माण केली, म्हणून ते उघडपणें प्रतिपादन करूं लागले. फार तर काय सांगावें पण, ग्रीक, ल्याटिन्, फ्रेंच, जर्मन्, इंग्रजी, इत्यादि नानाविध

हीब्र्यूचें नसतें महत्व, व धर्मपिशानें झालेला घोटाळा.

भाषांतील शब्द हीब्र्यूपासूनच निघाले आहेत हें सिद्ध करण्यासाठीं, एकंदर शब्दांची मनसोक्त ओढाताण सुरू होऊन, कुत्र्याचें शेंपूट माजराला, मांजराचा पाय हत्तीला, हत्तीचें डोकें उंटाला, व उंटाची मान घोड्याला, याप्रमाणें भाषाशास्त्राची निव्वळ थट्टाच सुरू झाली, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

खिस्तीधर्मांचें आणि भाषाशास्त्राचें वैपरीत्य.

अशाप्रकारें, ख्रिस्तीधर्मामुळें, भाषाशास्त्राला तिळप्राय देखील खरें साहाय न होतां, त्याची उलट पीछेहाटच झाली, असें कोणालाही कबूल केलें पाहिजे. तथापि, कित्येकांची याहून अगदीं उलट समजूत झाली आहे. परंतु, ती खरी आहे असें आह्मांस तरी खचितच वाटत नाहीं; आणि ही गोष्ट अनेक प्रमाणांनीं सिद्ध करून देखील देतां येईल. किंबहुना, त्याचा प्रत्यक्ष पुरावा सन्निधच आहे, व तो सूर्य आणि जयद्रथासारखा दाखवितां येईल, असेंही म्हटलें असतां चालेल.

---

१ ह्यासंबंधानें सेस म्हणतो,

" A *new* etymological *system* accordingly *sprang up, quite as grotesque in its rules and its results,* as the *old etymological system* of Greece and Rome; and dictionaries of Latin and English appeared, in which *every word was provided with its* Hebrew *original. ... ... It was not the only instance in* which *theological prepossessions have injured the cause of phylology.* "

( Introduction to the Science of Language. vol. I. P. 31. 1880 ).

असो. मॉक्समुलरादि याच वर्गांतले असून, ते असें प्रतिपादन करितात कीं, ख्रिस्ती धर्मामुळें भाषाशास्त्रास विलक्षण प्रोत्साहन मिळालें, व मदत झाली. त्यांनीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

तत्संबंधीं मॉक्समुलरादि पंडितांचें मत.

"But we shall see that the *science of language owes more than its first impulse to* Christianity."
(Lectures. Science of Language. vol. I. P. 143.)

परंतु, हा केवळ मिथ्याप्रवाद होय, असें शोधाअन्तीं कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे. कारण, ख्रिस्ती धर्माचा प्रसार होऊन, जवळ जवळ एक हजार नउशें वर्षें पुरीं झालीं असतांही, भाषाशास्त्राची खरी सुरुवात, मी मी म्हणणाऱ्या ख्रिस्तीराष्ट्रांपैकीं एकांत सुद्धां एवढ्या मोठ्या दीर्घ अवधींतही, झाली नव्हती. इतकेंच नव्हें तर, ह्या धर्माचें तत्व मजबूत पायावर नसल्यामुळें, धर्मवेड्यांचें पीक सर्वत्र पिकून, चोहोंकडे वितंडवाद मात्र निष्कारण मातला होता. आणि हें सैरावैरा चरत गेलेलें पाखंडमत इतकें बालिश होऊन गेलें होतें कीं, त्याबद्दल तद्धर्मीयांस[१] अजून देखील वाईट वाटल्यावांचून राहवत नाहीं.

त्याचें मिथ्यत्व.

---

१ मॉक्समुलरकृत भाषाविषयक व्याख्यानें. (भाग १ ला. पा. १४७।१४८). सेसूकृत भाषाशास्त्रनिवेश. (भाग १ ला. पा. ३१.)

मॉक्समुलर म्हणतो, "The *most absurd arguments found favour* for a time, if they could only furnish a loophole by which to escape from the unpleasant conclusion that Greek and Latin were of the same kith and kin as the language of the black inhabitants of India." (Lectures. Sc. L. vol. I. P. 189.)

तात्पर्य, ख्रिस्ती धर्मानें भाषाशास्त्रास खरी मदत न होतां, उलट, कित्येक पाश्चात्यांच्या नसत्या दुराग्रहामुळें, तें शास्त्र कांहीं बाबतींत अगदीं लंगडेंच पडल्यासारखें झालें होतें, असेंही म्हणावें लागतें. सबब, अशा प्रकारच्या महत्वाच्या शास्त्रीय शोधांत, धर्मवेडाचा किंवा लटक्या स्वधर्मप्रीतीचा लेशमात्रही उपयोग होत नसल्याकारणानें, आपल्याला ही दिशा सोडून, खरें काय आहे तें कळण्यासाठीं, अन्यमार्गाचेंच अवश्य अवलंबन केलें पाहिजे.

भाषाशास्त्राचें खरें मूळ संस्कृत.

आतां, भाषाशास्त्राचें खरें मूळ संस्कृत होय. आणि म्हणूनच, संस्कृत भाषेचें चांगलें परिशीलन झाल्याशिवाय, ह्या शास्त्राची प्रगति व त्यांत अभिनिवेश होण्याला अन्य साधनच नाहीं, ही गोष्ट मुख्यत्वेंकरून लक्षांत ठेविली पाहिजे. तसेंच, संस्कृत भाषेचें महत्व प्रथमतः कोणाच्या ध्यानांत आलें; पाश्चात्यापैकीं, तिजकडे कोणकोणत्या राष्ट्रांनीं आपलें लक्ष्य पुरविलें; केव्हांपासून त्यांनीं तिचें अध्ययन सुरूं केलें; सर्व भाषांत तीच एक नांवाजण्यासारखी व अपूर्व भाषा आहे, असें त्यांस केव्हां कळून आलें; ही भाषा पूर्णत्वाच्या संबंधानें सर्वांच्या शिरोभागीं आहे असें समजल्यावर, तिचा उपयोग कशा प्रकारें करून घेण्यांत आला; आणि ह्या अमूल्यशोधांचा भाषाशास्त्रावर एकंदर परिणाम कसा झाला; इत्यादि गोष्टी देखील नितान्त महत्वाच्या आहेत. सबब, त्याबद्दल अवश्य तें दिग्दर्शन यथावकाश करूं.

पाश्चात्यांच्या अज्ञानामुळें, संस्कृत भाषेवर जो दीर्घकालप-

तद्विषयक पाश्चात्यांचें अज्ञान.

र्यंत पडदा पडला, तो वर उचलण्याला एकाचें देखील सामर्थ्य कित्येक शतकेंही चाललें नाहीं, असें म्हणणें प्राप्त येतें. कारण, इ. स. १५५९ सालापूर्वी, संस्कृत भाषेचें नांव सुद्धां पाश्चात्यांनीं ऐकिलें नव्हतें. अर्थात्, त्यानन्तरच पोर्चुगलच्या कित्येक धर्मोपदेशकांनीं ह्या भाषेचा अभ्यास हिंदुस्थानांत आल्यावर सुरू केला, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे. व्हास्कोडीगामा हा कालिकत बंदरावर तारीख ९ मे इ. स. १४९८ रोजीं उतरला असल्याचें इतिहासावरून सर्वांस श्रुत आहेच. तथापि, त्यानंतरही पुढील पन्नास वर्षांत देखील, संस्कृतभाषेच्या परिशीलनार्थ पाश्चात्यांकडून कांहींच हालचाल सुरू झाल्याचें दिसत नाहीं.

संस्कृत शिकण्याविषयीं सासेटचा प्रयत्न.

पुढें, इ. स. १५८१ सालीं, फिलिपो सासेट नांवाचा एक इतालियन विद्वान गोवें येथें येऊन दाखल झाला. यानें संस्कृत भाषेचे असंख्य गुणानुवाद कालान्तरानें तेथेंच ऐकिले; व त्यावरून, ती भाषा शिकण्याविषयीं त्याचें कुतूहल सहजींच जागृत झालें. त्यामुळें, त्यानें ह्या भाषेचें बरेंच परिशीलन केलें, आणि तिची त्याला विशेष

---

१ मॉक्समुलर म्हणतो, " But for a long time, we look in vain in their (mis sionaries') letters and reports for any mention of Sanskrit literature......It is not, however till theyear 1559 that we first hear of themissionaries at Goa studying with the hope of a converted Brahman the theological and philosophied literature of thecontry, and chall ening the Brahmans to public disputations." (M. M. Lec, Sc. L. vol. I P. 172.)

अभिरुचि लागल्यावर, त्यानें तिच्या श्रेष्ठत्वासंबंधीं मासले-वाईक पत्रव्यवहार आपल्या युरोपखंडांतील अनेक इष्टमित्रां-बरोबर चालविला. त्यावरून, संस्कृत भाषेची चारुता, तिचें माधुर्य, व सौन्दर्य, इत्यादिगुण त्याच्या मनांत किती बिंबले होते, यांचें आपोआपच दिग्दर्शन होईल.(इ.स.१५८८) हीं पत्रें हल्लीं छापलीं असून, त्यांत त्यानें असें स्पष्टपणें

त्याचा अनुभव.

कळविलें[1] आहे कीं, संस्कृत भाषेंतील पुष्कळ शब्द भरतखंडांतल्या अनेक व्यवहारिक भाषांत आढळून येतात, व कित्येक शब्द तर इतालिक भाषेंतसुद्धां दृग्गोचर होतात. ह्याच पत्रांत त्यानें आणखी असेंही प्रसिद्ध रीतीनें जाहीर केलें आहे कीं, 'मी आठरा वर्षांचाच असतांना जर भरतखंडांस आलों असतों, तर इतालिदेशांस परत येण्यापूर्वीं, मजला संस्कृतांतल्या कित्येक सुन्दर आणि महत्वाच्या गोष्टींचें चांगलें ज्ञान झालें असतें.'

रॉबर्ट डी नोबिली-चे परिश्रम.

असो. तदनन्तर, सुमारें पंचवीस वर्षें तसाच खाडा पड-ल्यावर, इ. स. १६०६ सालीं, रॉबर्ट डी नोबिली नांवाचा गृहस्थ हिंदुस्था-नांत आला. ह्याच्या मनांत ब्राह्मणांचा धर्म व त्यांचा शास्त्रोदधि शिकण्याचें फारच होतें. परंतु, तो ब्राह्मणेतरांस शिकविण्याचा नाहीं, असा भारतीयांकडून त्याला कायमचा जबाब मिळाल्यामुळें, त्यानें एक विलक्षण धृष्टपणा केला, आणि मी द्विज आहे, अशी सर्वांस खोटीच थाप देऊन,

---

[1] *Letter edite e* inedite di Filippo Sassette raccolte *e* annotate da Ettore. Marcucci, Firenze 1855. P. 417.

तो ब्राह्मणांत मिसळला, व संस्कृत शिकला. शिवाय, तामिल व तेलगू, या भाषांचें ज्ञानही त्यानें मिळविलें. संस्कृताचें अध्ययन करण्यांत, ह्यानें कित्येक वर्षें एकांतांत घालविलीं, व त्यांत आपलें प्राविण्य चांगलें झालें आहे, अशी मनाची खात्री झाल्यावर, ब्राह्मणांशीं वादविवाद करण्याचें त्यानें जाहीरपणें सुरू केलें. इतकेंच नव्हें तर, आर्यधर्म, आर्यनीति, आणि आर्यविद्या, इत्यादि संबंधानें पाश्चात्यांनीं अनुकरण[1] करण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत, अशी देखील त्यानें आपल्या देशबांधवांस शिफारस केली. परंतु, इतकें असून सुद्धां, त्याचा पाश्चात्यांवर लेशमात्रही परिणाम झाला नाहीं, ही केवळ दुर्दैवाची गोष्ट होय.

आमची भरतभूमि ही ज्ञानाची केवळ खाणच असून,

---

१ ह्यासंबंधानें **मॉक्समुलरनें** एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं,

" The ' Accommodation question, ' as it was called, occupied cardinals and popes for many years; but not one of them seems to have perceived *the extraordinary interest attaching to the existence of an ancient civilisation* ( of the Hindus ) *so perfect and so firmly rooted as to require accommodation even* from the missionaries of Rome. At a time, when the discovery of one Greek Manuscript would have been hailed by all the Scholars of Europe, *the discovery of a complete literature* ( of India ) *was allowed to pass unnoticed. ... ...* ( The discovery ) of an *immense literature, the age of which was believed to exceed that of every other literature in the world,* yet came. " (M. M. L. Sc. of L. P. 175-176. vol. I.)

ह्या व पुढील अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत.

( ग्रंथकर्ता. )

पौरस्त्यांचेंज्ञान स्वीकारण्याविषयीं पाश्चात्यांची नाखुषी.

ह्या ज्ञाननिर्झरापासूनच **पौरस्त्य** व **पाश्चात्य** राष्ट्रांचें पोषण होत आहे. फारतर काय सांगावें पण, ह्या प्रज्व- लित दीपज्योतिनेंच सर्वत्र उजेड पडून, अज्ञानान्धकाराचें पटल शनैः शनैः नाहींसें होत चाललें आहे. परंतु, असें असूनही, फक्त नामांकित अपवाद खेरीज[१] करून, बाकी बहुतेक **पाश्चात्य** आमच्या **ज्ञानो**दधीचा वेळेवर उपयोग करून घेण्याच्या कामीं फारच कंटाळा करितात, असें त्यांच्या कृतीवरूनच उघड दिसून येतें.

अस्तु. **रॉबर्ट डी नो**बिली हा **पाश्चा**त्यांपैकीं संस्कृतज्ञ असा पहिलाच पंडित होय, असें **मॉक्स**मूलरचें मत आहे. कारण, त्याच्या संबंधानें त्यानें उघडपणेंच तसें लिहिलें आहे.

" I can only speak of him here as the first European Sanskrit Scholar. " ( M. M. Sc. L. P. 174. )

---

१ आमच्या एका **ब्राह्मणबटूनें ख्रिस्ती** धर्माचा स्वीकार करून, ह्या धर्माचें येनकेन प्रकारेण मंडन करण्याच्या हेतूनें, बनावट **य**जुर्वेद लिहिला. ह्यांत म्हणण्यासारखें कांहींएक नसून, ती निव्वळ खिचडीच होती. तरी देखील, **व्हॉल्टे**यर सारख्यांस सुद्धां, त्याच्या कर्तृत्वाबद्दल मोठें आश्चर्य वाटलें.

" Valtair expressed his belief that the original was four Centuries older than Alexander, and that *it was the most precious gift, for which the West had been ever indebted to the East.* "

( M. M. Sc. L. vol. I. P. 174 ).

ह्या कृत्रिम **यजुर्वेदाचा** मूल**संस्कृत**ग्रंथ **पांदे**चरीस आहे. ( As. Res. vol XIV ).

ह्याच्यानन्तर सुमारें पन्नास वर्षांनीं, हीन्‌रिच्‌रॉथ्‌ नांवाचा जेसूट भरतखंडांत आला, आणि आग्रा येथें कांहीं दिवस राहिल्यावर, आपल्यास संस्कृत शिकविण्याविषयीं, त्यानें एका ब्राह्मणाची पायधरणी केली, व त्याच्याजवळ सहा वर्षेपर्यंत सतत परिश्रम करून, तो ह्या भाषेंत बराच निष्णात झाला. पुढें, इ. स. १६६६ सालीं, तो रोम शहरास परतला, आणि एकंदर संस्कृत वर्णांविषयीं त्यानें फारच मनोवेधक हकीकत[1] लिहिली.

हिनरिच रॉथ.

तदन्तर, इ. स. १६७७ सालीं, मार्शल[2] नांवाचा कोणी एक गृहस्थ संस्कृतज्ञ झाला; व त्याच्या मागून अठराव्या शतकांतही अनेक जेसूट धर्मोपदेशक संस्कृत भाषाभिज्ञ होत चालले. ( इसवी सन १७३३-१७६७ ).

मार्शल व जेसूट.

पुढें, इ. स. १७७६ सालीं, जोहन फिलिपवेस्डिन ऊर्फ पॉलिनस आसंतो बारथॉल्मियो नांवाच्या जर्मननें हिंदुस्थानांत आगमन केलें, व येथें इ. स. १७८९ पर्यंत राहून, संस्कृताचें ज्ञान संपादिलें. त्यानंतर, तो परत युरोपांत गेला, आणि इ. स. १७९० मध्यें, संस्कृत भाषेचें एक व्याकरणच तयार करून तें त्यानें छापिलें.

पॉलिनस, व त्याचें व्याकरण.

पाश्चात्य देशांत, संस्कृत भाषेचें हेंच पहिलें व्याकरण असल्याचें समजतात. तथापि, संस्कृत भाषेचें व्याकरण

---

[1] China Illustrata. (1667).
[2] Historians of India ( P. 265 ). By Elliot.

दुसरी व्याकरण संबंधीं सामग्री.

तयार करण्याचा प्रयत्न यापूर्वींच झाला होता, असें म्हणावें लागतें. कारण, इ. स. १७६३ च्या सुमारास, पारिस येथील राजकीय पुस्तकालयांत, संस्कृतचें ल्याटिनमध्यें तयार झालेलें व्याकरण होतें. मात्र, त्यांत कारकप्रक्रियेचा, म्हणजे कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, व अधिकरण, याविषयींचा विचार नव्हता; व तें छापून प्रसिद्धही झालें नव्हतें. याखेरीज, रॉथ आणि हॉक्सलडन् यांच्याजवळही ह्या संबंधाची थोडीबहुत सामग्री तयार होती.

पीरीकॉर्डोचे शोध.

आतां, इ. स. १९८८ सालीं, फिलिपो सॉसेट्ला ज्याप्रमाणें अनेक भाषांतील विलक्षण शब्दसाम्य दृग्गोचर झालें, त्याचप्रमाणें इ. स. १७६७ त, पीरीकार्डोच्या देखील तें सहजीं लक्ष्यांत आलें असल्याचें दिसतें. त्यानें कित्येक शब्दांचें निकट साम्य दाखविलें आहे, व तें निःसंशय फारच महत्वाचें आहे. सबब, मासल्यासाठीं, त्यांची कोष्टकवार यादी येथें देतों.

| संस्कृत. | लॅटिन. | संस्कृत. | लॅटिन. |
|---|---|---|---|
| देव. | द्युस. Deus. | स्याम्. | सिम्. Sim |
| मृत्यु. | मॉर्स. Mars. | स्याः. | सिस्. Sis. |
| जनितम्. | जेनिटम्.Genitum. | स्यात्. | सिट्. Sit. |
| जानु. | जेनु. Genu. | स्याम्. | सिमस्. Simus |
| विधवा. | विदुआ. Vidua. | स्यात्. | सिटिस्. Sitis. |
| न. | नॉन्. Non. | सन्तु. | सिंट. Sint. |

१ Hervas. Catalago de las Lenguas. II. P. 133.

| | | | |
|---|---|---|---|
| मध्य. | मीडियस. Medius. | अहम्. | ईगो Ego. |
| दत्तम | डेटम्. Datum. | मे. | मे. Me |
| दानम्. | डोनम्. Donum. | मह्यम. | मिहि. Mihi. |
| अस्मि. | सम् Sum. | स्व. | सुअस Suus. |
| असि | एस्. Es. | त्वम्. | टु. Tu. |
| अस्ति | एस्ट. Est. | तुभ्यम् | टिबि. Tibi. |
| स्मः | समस् Sumus. | कः | क्विस्. Quis. |
| स्थ. | ईस्टिस्. Estis. | के. | क्वि. Qui. |
| सन्ति. | संट. Sunt. | कम्. | क्वेम्. Quem. |

अन्य पाश्चात्यांचें शोध.

हॉलहेड ( इ. स. १७७८ ), विल्किन्स, लॉर्ड मॉनबोडो ( इ. स. १७९२ ), सर विल्यम् जोन्स(इ. स. १७९४), इत्यादि शोधकांच्या सुद्धां अशाच प्रकारचें शब्दसाम्य लक्षांत आलें होतें. तथापि, कोणी एक पीरि पॉन्स नामक पाद्र्याचे प्रयत्न व शोध यांच्याही अगोदरचें असल्याचें दिसतें. कारण, तारीख २३ नवंबर इ. स. १७४० सालीं, ह्यानें कारिकलहून एक पत्र[1] लिहिलें आहे, आणि त्यांत भारतांचें संस्कृत भांडार, त्यांचे चार पवित्र वेद, त्यांचीं षड्दर्शनें, त्यांचें ज्योतिः-शास्त्र, त्यांचें व्याकरणावरील ग्रंथ, त्यांचीं नानाविध शास्त्रें, व त्यांच्या असंख्यकला, इत्यादींचें मनोवेधक आणि मार्मिक विवेचन त्यानें केलें आहे.

अशा प्रकारें, संस्कृत भाषेसंबंधीं हरतऱ्हेचे शोध,

---

१ हें पत्र हल्लीं छापून प्रसिद्ध झालें आहे. पारिस. इ. स. १७८१. Letters edifiantes. vol. XIV. P. 65.
Article by M. Biot. Journal des Savants. 1861.

आशियाक परिषदेची संस्थापना, व श्लेजेलचा ग्रंथ, आणि भाषाशास्त्राच्या कामीं त्याचा उपयोग.

अनेक पौरस्त्य व पाश्चात्य विद्वानांकडून चालले असतां, इ. स. १७८४ सालीं, कलकत्ता येथें आशियाक परिषद् ( एशियाटिक सोसायटी ) नांवाची संस्था स्थापन झाली; आणि तिनें संस्कृतांतले पुष्कळ ग्रंथ व व्याकरणें छापण्याची सुरवात केली. तदनन्तर इ. स. १८०८ सालीं, श्लेजेल नांवाच्या जर्मन पंडितानें व कवीनें " भारतीय भाषा व ज्ञान " नांवाचें एक विशेष उपयुक्त पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यामुळें, त्याचा यूरोप आणि अमेरिकाखंडांत प्रसार होऊन, भारतीय ज्ञानाची व संस्कृत भाषेची बहुतेक सर्व विद्वानांसच गोडी लागत चालली; आणि तेव्हां पासूनच भाषाशास्त्राची विशेष प्रगति होण्यास खरा प्रारंभ झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

---

१ विल्किन्सकृत भगवतगीतेचें भाषान्तर, इ. स. १७८५; त्याचेंच हितोपदेशाचें भाषान्तर, इ. स. १७८७; सरविल्यमजोन्सकृत शाकुन्तलाचें भाषान्तर, इ. स. १७८९; कोलब्रूककृत व्याकरण, १८०५; कॅरीकृत व्याकरण, १८०६; विल्किन्सकृत व्याकरण, १८०८; फॉर्स्टरचें व्याकरण १८१०; येट्सूचें व्याकरण १८२०; विल्सनचें व्याकरण १८४१; बॉपचें व्याकरण १८२७, १८३२, १८३४; आणि बेनफेचें व्याकरण १८५२, १८५५.

# भाग नववा.

## व्युत्पत्ति व अव्युत्पत्तिवाद,

अथवा

### नामचधातुजमाह आणि प्रातिपदिक मीमांसा.

शब्दमीमांसा.

प्रस्तुत भागांत, शब्द कसा बनला, म्हणजे त्याची उत्पत्ति धातूपासून झाली, किंवा तो स्वयमेव सिद्ध आहे, याविषयींचें तपशिलवार विवेचन करण्याचें योजिलें आहे.

शब्दाची व्याख्या.

आतां, शब्द म्हणजे काय, हें आम्हीं पूर्वीच सांगितलें असून, त्याची व्याख्याही मागील भागांत दिली आहे; (मागें पान १०।९६ पहा). त्यावरून, ज्या ध्वनीच्या योगानें वस्तु, विकार, स्थिति, मनोवृत्ति, संज्ञा, इत्यादींचा बोध होतो; अगर, ज्यामुळें कोणत्याही पदाचा अर्थ, (म्हणजे उघडच कोणताही पदार्थ,) व्यक्त

---

१ व्याकणरीत्या **पदा**चा **अर्थ** म्हणजेच पदार्थ समजावयाचा आहे. मात्र, व्यवहारांत, ह्याच अर्थानें त्याचा नेहेमीं उपयोग करण्यांत येत नसतो, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

**वै**शेषिकांच्या मतें, १ द्रव्य, २ गुण, ३ कर्म, ४ सामान्य, ५ विशेष, आणि ६ समवाय, असे सहा पदार्थ आहेत; व त्यांचीच संख्या २५ असल्याचें **सां**ख्य मानतात. तथापि **पा**तंजलीच्या

( पुढें चालू )

होण्यास साधन मिळतें; तोच शब्द होय, असें वाचकाच्या लक्षांत सहजीं आलें असेल.

असो. हा शब्द स्वयमेव सिद्ध असतो, किंवा तो धातूपासून उत्पन्न होतो, याविषयीं आमच्या भारतीय भाषाभिज्ञांत पुष्कळच भवति न भवति झाली असून, पौरस्त्य व पाश्चात्य पंडितांत सुद्धां तद्विषयक विलक्षण मतभेद असल्याचें दिसतें.

ह्या सबंधाची चर्चा इतकी महत्वाची आहे कीं, त्याबद्दलचें जेवढें ह्मणून वर्णन करावें तेवढें थोडें. इतकेंच नव्हें तर, विषयगुरुत्वाप्रमाणें त्याची उपयुक्तता देखील निःसंशय ज्यास्त आहे, ही गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे. सबब, त्याबद्दलची साद्यन्त हकीकत येथें यथावकाश देतों.

शाकटायनादींचा व्युत्पत्तिपक्ष.

शब्दाचें मूळरूप कोणतें, याविषयीं आमच्या भारतीय भाषाकोविदांत बराच मतभेद असल्यामुळें, त्यांत अर्थात्च दोन पक्ष झाले आहेत. नैरुक्त, शब्दव्युत्पत्तिशास्त्रज्ञ, आणि शाकटायनादि वैयाकरण, हे एका बाजूला असून, ते असें प्रतिपादन करितात कीं, यच्चावत् नाममात्र धातूपासूनच झालें आहे.

---

( मागील पृष्ठांवरून पुढें चालू )

अभिप्रायाप्रमाणें ते २६ असून, वेदान्ती तर ते फक्त दोनच असल्याचें समजतात.

ह्या पदार्थांचें (षड्दर्शनासहित) तपशिलवार विवेचन भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांतल्या चवथ्या पुस्तकांत, आम्हीं केलें आहे. ( पान ४० ते ६४ पहा. ). ग्रंथकर्ता.

बाहुलकं प्रकृतेस्तनुदृष्टेः
प्रायसमुच्चयनादपितेषाम् ।
कार्यसशेषविधेश्च तदुक्तम्
नैगमरूढिभवं हि सु साधु ॥ १ ॥
नामच धातुजमाहनिरुक्ते
व्याकरणे शकटस्यच तोकम् ।
यन्नविशेष पदार्थ समुत्थं
प्रत्ययतः प्रकृतेश्च तदूह्यम् ॥ २ ॥
(पतंजलि महाभाष्यम् । उणादयो बहुलम् ३. ३. १)

परंतु, हें प्रतिपादन सदोष असल्यामुळें निःसंशय आशंकनीय आहे; आणि म्हणूनच, त्यासंबंधानें दुसरे अनेक वैयाकरण साधार व योग्य आक्षेप घेतात.

पाणिन्यादींचा अव्युत्पत्तिवाद.

अर्थात्, ते असें म्हणतात कीं, " **नामच धातुजम्** " हा सिद्धान्ताचा असा बिलकुल नियमच नव्हे. कारण, कित्येक शब्द केवळ निरवयवच आहेत; आणि त्याचकारणानें, त्यांत प्रकृति व प्रत्यय यांचा साहजीकच अभाव असतो. तेव्हां, अशा प्रसंगीं, " **नामच धातुजम्**, " या नियमाची सिद्धता कशी करावयाची ? अर्थात्, ती होत नाहीं, हें उघड आहे. तथापि, व्युत्पन्नत्ववादी एवढयानेंच हार जात नसून, कुंठितही होत नाहींत. ते आणखी अशी कल्पना लढवितात, व अतर्क्य कोटिक्रम करतात कीं, अशा प्रकारच्या अडचणीच्या वेळीं, ह्या शब्दांत प्रकृति किंवा प्रत्यय प्रछिन्न समजून, ते अध्याहृत धरावेत, अथवा कल्पावेत.

नागोजीभट्टकृत लघुशब्देन्दुशेखरांत, असें म्हटलें आहे कीं, **ननुयत्रावयवार्थानुगमोनास्ति तत्रकथंव्युत्पादनं शक्यमतउक्तम्। यत्र विशेषपदार्थसमुत्थं प्रत्ययतः प्रकृतेश्चतदूह्यमिति। * * उक्तप्रत्ययसादृश्यं ( प्रकृतिसादृश्यं वा ) दृष्ट्वा तदितरोभागः प्रत्ययत्वेन कल्प्यः।** ( प्रथमः पादः। )

व्युत्पतिपक्षास येणाऱ्या हरकती.

किंबहुना, महाभाष्यांत केलेल्या पूर्वपक्ष प्रतिपादनाचा हा अनुवादच होय, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, श्रीभगवत् पतंजलीनें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, **प्रकृतिं दृष्ट्वा प्रत्यय ऊहितव्यः प्रत्ययंच दृष्ट्वा प्रकृतिरूहितव्या ॥**

**संज्ञासु धातुरूपाणिप्रत्ययाश्च ततः परे।**
**कार्याद्विद्यादनुबंधमेतच्छास्त्रमुणादिषु ॥**

( महाभाष्यम् ३. ३. १ ).

तथापि, मुळांत कांहीं एक नसतां भलत्याचीच कल्पना करणें, अगर कांहीं तरी अध्याहृत घेणें, हें मत युक्तिवादास अनुसरून असल्याचें दिसत नाहीं. आणि म्हणूनच, तें पाणिनीआरख्या प्रचंड व्याकरणमीमांसकारांस बिलकुल संमत नाहीं, हें उघड आहे. आतां, व्युत्पत्तिपक्ष पाणिनी ऋषींस संमत नसून, अव्युत्पत्तिपक्षच त्यांस मान्य होता, अशाविषयीं अनेक प्रमाणें आहेत. इतकेंच नव्हें तर, नागोजीभट्टांनीं तर त्याचा स्पष्टच उल्लेख केला आहे. कारण, एके ठिकाणीं ते असें लिहितात कीं,

अव्युत्पत्तिपक्ष पाणिनीस मान्य असल्याविषयीं प्रमाण.

**पाणिनेस्तुतेष्वव्युत्पत्तिपक्ष एवाभिमतः । तदुक्त-मायनेयीनीयियः ( फढखछघां प्रत्ययादीनाम् ॥ ७. १. २ ॥ ) इति सूत्रेभाष्ये प्रातिपदिकविज्ञानाच्च भगवतः पाणिनेः सिद्धमिति । तत्र पाणिनेरित्युक्त्या तस्या व्युत्पन्नानि उणादयः प्रातिपदिकानीतिमत-मिति सूचितम्** । (ल० श० शेखरः )

पण, याहीपेक्षां बलवत्तर प्रमाण म्हटलें म्हणजे **पतं-जलीचेंच** होय. ह्यानें **पाणिनीचें** सूत्र देऊन, याजवर टीका केली आहे, व उणादिप्रातिपदिकें अव्युत्पन्न असल्याविषयीं ठरविलें आहे. फार तर काय सांगावें पण, **पाणिनी** हा अव्युत्पन्नत्ववादीच होता, असें देखील त्यानें सिद्ध केलें आहे.

**अयनेयीनीयियः फढखछघां प्रत्ययादीनाम् ॥**
( ७–१–२ )

सदरहू सूत्रावर टीका करतांना भाष्यकार म्हणतात कीं, **प्रातिपदिकविज्ञानाच्च पाणिनेः सिद्धम् । उणादयो-ऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ॥**

ह्यावरून प्रातिपदिकांची स्वयंसिद्धता.

ह्यावरून, "**नामच धातुजम्**" म्हणजे यच्चावत् नाम-धातूपासूनच झालें आहे, हें जें कित्येक **वैयाकरणांचें** विधान आहे, तें **सदोष** असल्यामुळें सिद्धान्ताचें नाहीं; आणि म्हणूनच, **प्रातिपदिकें** हीं स्वयमेव सिद्ध आहेत, असें वाच-काच्या लक्षांत सहजीं येईल.

पाणिनीनें प्रातिपदिकाचें विवेचन केलें असून, त्याची

प्रातिपदिकाची व्याख्या.

त्यानें व्याख्याही दिली आहे. त्यावरून, जो शब्द अर्थावबोधक आहे; अथवा, जो, धातु ( ह्मणजे प्रकृति ) व प्रत्यय, यांच्या संयोगानें होत नसून, स्वयमेवसिद्ध असतो; अगर जो **कृत** किंवा **तद्धित** प्रत्ययानें, अथवा **स**मासाच्या योगानें बनतो; त्यालाच **प्रा**तिपदिक अशी संज्ञा असल्याचें दिसतें.

**अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम् ।**

**कृत्तद्धितसमासाश्च ।** ( पाणिनि. )

प्रातिपदिक विशेष्य असल्यास तें **ना**म समजावें. परंतु, जर तें गौणार्थी असून, विशेष्यावर अवलंबून राहील, तर तें **विशेषण** होय. प्रातिपदिकांतील कित्येक शब्द केवळ रूढीनेंच प्रचारांत आलेले असतात. सबब, त्यांस **रूढशब्द** किंवा **सिद्धशब्द** म्हणतात. उदाहरणार्थ झाड, घोंडा, इत्यादि. तथापि, त्यांत कांहीं कांहीं शब्द असेही आढळून येतात कीं, त्यांचा अर्थ फक्त तद्घटकावयवाच्या सान्निध्यानेंच उत्पन्न होतो. अशा शब्दांस **यौगि**कशब्द अथवा **सा**धितशब्द अशी संज्ञा आहे; जसें लोहार, विणणार, वगैरे. आतां, अशा प्रकारच्या शब्दांत, त्यांचा यौगिक अर्थ फारच व्यापक असतो. तथापि, त्यांची योजना मात्र

सिद्ध आणि साधित शब्द.

केवळ मर्यादित व संकुचित असून, ती फक्त विवक्षित व्यक्तीसाठींच झाल्याचें उघड दिसतें. अशा प्रकारच्या शब्दांस **यो**गरूढशब्द म्हणतात. उदाहरणार्थ, **सर्प** किंवा **सा**प शब्द सृप् धातूपासून झाला आहे, आणि त्याचा मूळ

कित्येक व्यापक शब्दांचा मर्यादित अर्थ.

अर्थ सर्पटणारा प्राणी इतकाच होतो. आतां, असे सर्पटणारे प्राणी अनेक जातीचे आहेत, व त्यांत कित्येक विषारी आणि कांहीं अविषारी, यांचा देखील समावेश होण्यास हरकत नाहीं. फार तर काय सांगावें, पण, ह्या शब्दाच्या धात्वर्थाकडे पाहिलें म्हणजे, त्यांत गांडवळांसारख्या निरुपद्रवी प्राण्यांचा समावेश करण्यालाही कोणतीच हरकत नाहीं, असें म्हटलें असतां चालेल. परंतु, वस्तुस्थिति तशी नसून, ती याहून उलट व अगदीं भिन्न आहे. आणि म्हणूनच **सर्प** किंवा **साप** म्हणजे गांडवळ नसून, तो सर्पटणारा व दंश करणारा विषारी प्राणी, असाच त्याचा व्यावहारिक **अर्थ** समजण्यांत येतो. हा शब्द **ल्याटिन** ( सर्पो ), व **इंग्रजी** ( सर्पेंट ) भाषेंत सुद्धां ह्याच अर्थाचा द्योतक आहे. अशाच मासल्याचे तुरंग, फणी, दांति, कुंभार, इत्यादि शब्द होत. ह्यांच्या धात्वर्थाकडे पाहिलें असतां, हे शब्द फारच व्यापकसे वाटतात. तथापि, त्यांची योजना मात्र केवळ संकुचित असून, फक्त विवक्षित वस्तूचा बोध व्हावा, म्हणूनच त्यांचा उपयोग केलेला दिसतो. **तुरंगाचा** धात्वर्थ फारच व्यापक आहे, आणि फक्त त्यावरूनच (तुरंगच्छतीति तुरंगः, म्हणजे) जलदी चालणारा प्राणी, असा बोध होतो. परंतु, जलदी चालणारे प्राणी असंख्य असूनही, ह्या शब्दाची योजना फक्त व्यक्तिविशेषाकडेच केली असल्यामुळें, त्याचा अर्थ घोडा असाच समजण्यांत येतो. फण्या निवडुंगाला फणा असतांही, **फणी** शब्द त्या वनस्पतीचा वाचक नसून, तो सर्पाचाच वाचक आहे. मनुष्य, जनावरें, व इतर प्राणी यांस दांत असतांही, **दंती** शब्दानें त्यापैकीं कोणाचाच बोध

न होतां, फक्त हत्तीचा मात्र होतो. लोहार, तांबट, कासार, इत्यादि नानाविध कसबी हरतऱ्हेचीं भांडीं आणि चित्रविचित्र कुंभ करीत असून देखील, त्यांस **कुंभार** किंवा **कुंभकार** ही संज्ञा नाहीं. तर ती फक्त मातीचीं भांडीं घडविणारांसच आहे.

अशाप्रकारचे शब्द **योग**रूढ होत, व ह्यांसच **यौ**गिकशब्द, **योग**रूढशब्द, आणि **सा**धितशब्द, अशी संज्ञा आहे. ह्याचे **प्र**कृति व **प्र**त्यय, असे मुख्यत्वेंकरून दोन अवयव आहेत. ज्या शब्दावयवाचा प्रयोग कधींही स्वातंत्र्यानें होत नसून, तो केवळ दुसऱ्या एखाद्या शब्दापुढेंच होतो, त्यांस **प्र**त्यय म्हणतात. आणि ज्या मूळ शब्दापुढें **प्र**त्यय होतो, त्यामूळशब्दास त्या प्रत्ययाची **प्र**कृति समजावयाची. जसें, शिवणावळ, जामीनकी, या शब्दांत शिव, जामीन, हे मूळशब्द **प्र**कृति होत; व 'णावळ', 'की,' या शब्दांस **प्र**त्यय म्हणावें. **यौ**गिकशब्दांत, कधीं कधीं तिसरा अवयवही आढळून येतो, व त्यास **उ**पसर्ग अशी संज्ञा आहे. उदाहरणार्थ, **प्र**कृति, **नि**श्चय, या शब्दांत, **प्र** आणि **निस्**, हे उपसर्ग समजावयाचे. आतां, हे उपसर्ग **सं**स्कृत भाषेंत ज्याप्रमाणें विशेष आढळतात, त्याप्रमाणें **प्रा**कृत भाषेंत जरी दृग्गोचर होत नाहींत तरी, उठणें ( उत्थापनम् ), वोसरणें ( अपसरणम् ), निघणें ( निर्गतिः ), ओढणें ( अपकर्षणम् ), पाझळणें ( प्रज्वलनम् ) आंखडणें ( आकुंचनम् ), विघडणें ( विघटनम् ), वगैरे अपभ्रष्ट झालेले **प्रा**कृत शब्द, ह्या उपसर्गांचींच उदाहरणें आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

प्रत्यय व प्रकृति, आणि उपसर्ग.

कित्येक प्रत्यय प्रकृतीस लागतात, व त्यामुळेंच त्यांचे यौगिक शब्द बनतात. अशा प्रकारच्या प्रत्ययांचे दोन भेद आहेत १ धातूवरून होणारे प्रत्यय; आणि २ धातूहून भिन्न असे जे शब्द ह्मणजे प्रातिपदिकें व अव्ययें, त्यावरून होणारे प्रत्यय. पहिल्या प्रत्ययांस संस्कृतांत **कृत** अशी संज्ञा असून, दुसऱ्यांस **तद्धित** ह्मणतात. जसें १ जेवून, करून, लिहून, जाणें, गाणें; २ लोखंडी, लांकडी, पितळी ( देव्हारा ), बाईल, गुळचट; इत्यादि. पाहिलें **ऊन**, **णें**, वगैरे **कृत्** प्रत्ययाचें उदाहरण होय; व दुसरें ई, ईल, हें **तद्धिताचें** समजावयाचें. परंतु, अमक्या प्रकारच्या धातूस, अमुक अर्थी, आणि अमक्या प्रकारानें, हे प्रत्यय प्रकृतीस लागतात, अशा विषयीं कांहीं एक नियम बांधतां येत नाहीं. मात्र, हे प्रत्यय प्रकृतीस लागतांना तिला क्वचित् कांहीं विकार घडतात, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

प्रत्ययांचे भेद व यौगिक शब्दांची रचना.

संस्कृतांत कृत्वा, दत्वा, इत्यादींत जो '**त्वा**' प्रत्यय दृग्गोचर होतो, त्याचाच **बाल** भाषेंत '**त्तूण**' असा अपभ्रंश होऊन, त्यापासूनच मराठींतला '**ऊन**' प्रत्यय झाला आहे.

आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे कीं, प्रातिपदिकांस किंवा अव्ययांस प्रत्यय लागून कांहीं शब्द सिद्ध होतात. ह्या प्रत्ययांस **तद्धित प्रत्यय** अशी संज्ञा आहे. ह्या **तद्धित प्रत्ययांत** कित्येक फारच महत्वाचे आहेत. कारण, ते सर्वनामांस व प्रायः सर्व शब्दयोगी अव्ययांस

तद्धित प्रत्यय, व त्यापासून होणारीं क्रियाविशेषणें आणि अव्ययें.

लागून, त्यापासूनच साधित विशेषणें, आणि क्रियाविशेषण-अव्ययें होतात. उदाहरणार्थ, कोणता, पुढील, एव्हां, कोठें, एरवीं, इत्यादि. **चा** हा प्रत्यय तद्धिताचाच असून, त्यासंबंधानें कित्येक वैयाकरणांचें असें मत आहे कीं, हा प्रत्यय, संस्कृत भाषेंतल्या षष्ठीविभक्तीचा प्रत्यय जो '**स्य**', त्याचाच अनुवाद होय. तथापि, कांहींस ही गोष्ट बिलकुल संमत नाहीं. कारण, ते असें प्रतिपादन करतात कीं, संस्कृतांतील षष्ठीची चतुर्थी फक्त प्राकृतांतच झाली असून, पाली आणि प्राकृत भाषांत चतुर्थीचा लोपच आहे. इतकेंच नव्हे तर, षष्ठीचा तिच्याऐवजीं उपयोग करावा, असें त्या भाषांच्या व्याकरणांत[1] सुद्धां स्पष्टपणें सांगितलें आहे. शिवाय, संस्कृत भाषेंतील कोणताही विभक्ति प्रत्यय लिंगाप्रमाणें फिरत नसून, मराठींतले चा, ची, चें, हे प्रत्यय फिरतात; व तद्घटित शब्दांस सामान्यरूपही होतें. सबब, हा प्रत्यय कोणत्या तरी विशेष प्रत्ययावरून झाला आहे, असें मानणें सयुक्तिक दिसतें.

अव्ययापासून विशेषणें

**ईल**, **ला**, हे तद्धित प्रत्यय बहुतेक सर्व शब्दयोगी अव्ययास लागून, त्यांचीं साधित विशेषणें होतात. जसें, वरील, आंतला, इत्यादि.

**व्हां** प्रत्ययानें कालाचा बोध होतो. म्हणून, **मी** व **तूं** खेरीज करून, बाकीच्या यच्चावत् सर्वनामांपुढें हा प्रत्यय लागून त्यापासून साधित क्रियाविशेषण अव्ययें होतात. उदाहरणार्थ, जसें, केव्हां, एव्हां, वगैरे.

सर्वनामांपासून क्रियाविशेषण अव्ययें.

---

[1] चतुर्थ्याः षष्ठी ॥ ६४ ॥ ( प्राकृतप्रकाश. परिच्छेद सहावा. )

**थें** हा प्रत्यय स्थलवाचक असून, तो एकंदर सर्वनामां-पुढें लागतो, व त्यापासून साधित क्रियाविशेषण अव्ययें होतात. उदाहरणार्थ, जेथें, तेथें, येथें, इत्यादि. **कोण** शब्दांस हा प्रत्यय लागतांना, **थ**कारास **ठ**काराचा आदेश होऊन, त्याचें **कोठें** हें रूप होतें. त्याचप्रमाणें, एव्हां आणि **एथें**, हीं रूपें **हा** या सर्वनामापासूनच झालेलीं होत.

असो. आतां, **यौ**गिक शब्दाचा राहिलेला भेद जो **स**मास, त्याविषयीं मात्र दोन शब्द लिहावयाचे राहिले आहेत. यासाठीं, तत्संबंधीं अवश्य तें दिग्दर्शन येथें थोड-क्यांतच करितों.

समासाची व्याख्या, व

परस्परांच्या संदर्भानें युक्त असून, अनेक शब्दांतील संबंधदर्शक असा जो एक शब्द होतो, अथवा सर्वनाम, अव्यय, विभक्ति, व प्रत्यय, यांचा लोप होऊन, अनेक शब्दांचा विशिष्टार्थवाचक जो एक शब्द बनतो, त्याला **स**मास म्हणतात. अर्थात्, पदांतील अनावश्यक विभक्ति, सर्वनामें, अव्ययें, इत्यादींचा लोप झाल्यानंतर, जीं विशिष्टार्थक आणि सिद्ध झालेलीं प्रातिपादिकें राहतात, त्यांसच **स**मास अशी संज्ञा आहे.

त्याचा उपयोग.

**संस्कृत** भाषेंत हे समास निःसंशय फारच महत्वाचे असून, ते ह्या भाषेचें केवळ जीवनच आहेत, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. आणि त्यामुळेंच, **संस्कृ**त काव्यास, व विशेषेंकरून गद्यास, विलक्षण साहाय्य होऊन, कठिण आणि तीव्र शब्दांच्या योगानें भाषेस जे कटुत्व यावयाचें, तें संधि व समासाचा

उपयोग केल्यानें, अगदीं नाहींसें होतें. एवढेंच नव्हे तर, त्या योगानें त्यांस पुष्कळ अंशानें माधुर्यच प्राप्त होतें, असें देखील म्हणण्यास काडीमात्रही हरकत नाहीं.

आमच्या **पौरस्त्य** आणि त्यांतही **भारतीय** रसिक कविजनास आणि प्रचंड **पंडितसमूहास**, ह्या समासांचें विशेष कौतुक वाटावें, यांत तर कांहींच नवल नाहीं. पण, **पाश्चात्य** विद्वान व नांवाजलेले इतिहासकार यांजला सुद्धां, आमच्या **संस्कृत** भाषेंतील एकंदर समासरचनेचें महदाश्चर्य वाटतें.

तत्संबंधीं पाश्चात्य मत.

ह्या संबंधानें विवेचन करीत असतांना, एल्फिस्टन् इतिहासकार असें लिहितात कीं,

" Among many marks of high polish ( of Sanskrit ) is one which must have particularly promoted the melody of its versification. This consists in what Mr. Colebrooke callsits euphonical orthography by which letters are changed not only so as to avoid harsh combinations in particular words, but so as to preserve similar harmony throughout the whole length of each of their almost interminable compounds, and even to contribute to the music of whole periods, which are generally subjected to those modifications, for the sake of euphony, which in other languages are confined to single words."

( Elphinstone's History of India. vol.I. P. 282-283. )

पौरस्त्य अभिप्राय, व भारतीय कविकुलावतंसाचं मत.

दंडी कवीनें तर, अशा प्रकारच्या समासरचनेला गद्याचें केवळ जीवितच ह्मटलें आहे.

ओजः समासभूयस्त्वमेतद्गद्यस्यजीवितम् ।
( काव्यादर्श. १. ८० ).

मागें, यौगिक शब्दांचें निरूपण करतांना, प्रत्यय आणि अव्यय यांचा आम्हीं वारंवार उल्लेख केला असून, त्यांचा परस्पर कसा संबंध असतो, हेंही प्रसंगविशेषीं दाखविलें आहे. तथापि, प्रत्यय व अव्यय म्हणजे काय, ते अर्थबोधक आहेत किंवा अर्थविरहितच समजावयाचे, ते कसे उत्पन्न झाले आहेत, आणि ते सविभक्तिक मानावयाचे कीं कसें, याविषयींचें विवेचन करणें निःसंशय ज्यास्त अवश्यकतेचें व अगत्याचें आहे. सबब, तें येथें करतों.

प्रत्ययाचें लक्षण व त्यास आलेलें शब्दाचें मूल्य.

सामान्यतः, ज्या शब्दावयवाचा प्रयोग स्वातंत्र्यानें कधींही होत नसून, जो नेहेमीं परावलंबी असतो, त्यास प्रत्यय अशी संज्ञा आहे. किंबहुना, प्रत्ययाचें लक्षण म्हटलें म्हणजे, संज्ञेनें अगर संकेतानेंच अर्थ व्यक्त करणें, हें होय. उदाहरणार्थ, की, णारा, णावळ, वगैरे प्रत्यय, धंदा किंवा वृत्ति, कर्तृत्व, व मोल, इत्यादींचे वाचक असून, ते, तो तो अर्थ, केवळ संकेतानेंच क्रमशः व्यक्त करतात. जसें प्रधानकी, मिळवणारा, घडणावळ, इत्यादि. आणि म्हणूनच, ह्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे, अशा प्रकारच्या प्रत्ययांस देखील शब्दाचें मूल्य खाचितच येतें, असें अवश्य म्हणावें लागतें. अर्थात्, हे प्रत्यय अर्थबोधक असून निरर्थक नाहींत, इतकें कोणालाही कबूलच केलें पाहिजे. फार तर काय सांगावें, पण, ज्या वर्णांत अर्थबोध करण्याचें सामर्थ्य सांप्रत नाहीं असें आपण समजतों, अथवा ज्यांस आपण केवळ ह्याच

कारणासाठीं प्रत्ययच ह्मणतों, ते वर्ण पूर्वी अगदीं स्वतंत्र शब्दच असल्याचें दिसतें. मात्र, अन्य शब्दाशीं त्यांचा निरंतर संधि होत गेल्यानें, त्यांच्या कित्येक अवयवांचा लोप होऊन, त्यांचें प्रथमचें स्वातंत्र्य नष्ट झालें असावें, असें मानण्यास बलवत्तर कारण मिळतें.

ह्या गोष्टीचें प्रत्यन्तर पाहण्यासाठीं, आपण क्षणभर **पार्श्व** शब्दाकडे वळूं, आणि त्याचें स्थित्यंतर पाहूं. हा शब्द मूळचा संस्कृत असून, त्याचा अर्थ **बाजू** असा होतो. **बाल** भाषेंतील '**पस्स**' शब्द याचाच अपभ्रंश होय; व ह्याचेंच आणखी थोडेसें रूपान्तर होऊन, **पास** ( आसपास, पाशीं, ) असा **म**राठींत शब्द झाला आहे. मात्र, **बाल**भाषेंतून **म**राठींत रूपान्तर होतांना, एकंदर नियमाप्रमाणें, त्यांतला पहिला स्वर दीर्घ झाला, व संयुक्त व्यंजनांतील एक व्यंजन गळून गेलें.

त्यांचें सविभक्तिकत्व.

असो. ह्या **पास** शब्दासच, '**ई**' आणि '**ऊन**' हे सप्तमीचे व पंचमीचे जुने प्रत्यय लागून, त्याचेच '**पाशीं**' आणि '**पासून**' हे शब्द झाले आहेत. अर्थात्, **पास** ह्या प्रातिपदिकाला '**ई**' व '**ऊन**' हे प्रत्यय लागले; आणि ह्मणूनच '**पाशीं**' व '**पासून**', हे सविभक्तिक शब्द झाले, असें ह्मणणें प्राप्त येतें. परंतु, अशा प्रकारची खरी वस्तुस्थिति असतांही, '**पाशीं**' व '**पासून**' हे सविभक्तिक शब्द आहेत, असें फारच थोडे लोक समजत असतील, अशी आमची अल्प समजूत आहे. फार तर काय सांगावें, पण, ह्या शब्दांस प्रायः प्रत्यय किंवा अव्य-

येंच समजण्यांत येतात, असें ह्मटलें असतांही अन्यथा होणार नाहीं.

क्रियापदाचे अव्यय.

'म्हणजे' शब्दाची हकीकत देखील अशाच मासल्याची आहे. कारण, हा शब्द मुळचा क्रियापदरूपीं असून, तो सांप्रत केवळ अव्ययच झाला आहे. व्याकरणदृष्टीनें पाहतां, 'म्हणजे' या शब्दांत, म्हण+जे अशीं दोन पदें असून, 'म्हण' हा शब्द संस्कृत 'भण' शब्दाचा अपभ्रंशच असावा, असें वाटतें. आतां, 'भण्' धातूचा अर्थ बोलणें असा होतो, आणि 'जे' हा वर्ण प्राचीन महाराष्ट्रभाषेंत केवळ पूरणार्थींच उपयोगांत आणिला असल्याचें दिसतें. उदाहरणार्थ, बोलिजे, करिजे, दाविजे, इत्यादि. ह्यावरून, 'म्हणजे' शब्द मुळचें क्रियापदच होय. परंतु, हल्लीं त्याचा तसा उपयोग न होतां, तो फक्त अव्ययाप्रमाणेंच करण्यांत येतो, असें वाचकाच्या लक्षांत सहजीं येईल.

सर्वनामाचें अवयव.

त्याचप्रमाणें, 'आणि' शब्दाचा प्रथमचा अर्थ व सांप्रतचा उपयोग, हे सुद्धां ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. ह्या शब्दाचें मूळरूप म्हटलें म्हणजे, संस्कृतांतील 'अन्य' शब्द होय. व 'आणि' हा त्याचाच अपभ्रंश समजावयाचा. परंतु, त्यांच्या अर्थांत व व्याकरणसंज्ञेंत हल्लीं केवळ जमीन अस्मानाचें अंतर पडल्याचें दिसतें. कारण, संस्कृतांत 'अन्य' हें सर्वनाम असून, त्याचा अर्थ 'दुसरा' असा होतो. परंतु, मराठींत 'आणि' हें उभयान्वयी अव्यय आहे, आणि त्याचा अर्थ 'व' असा समजण्यांत येतो.

'जे' हें स्वरूपबोधक उभयान्वयी अव्यय प्राचीन लेखांत विशेषेंकरून आढळतें. किंबहुना त्याचा प्रयोग हल्लींच्या मराठी भाषेंत केला असल्याचें फारसें दिसतच नाहीं, असें म्हटलें असतांही चालेल. हें अव्यय संस्कृतांतूनच महाराष्ट्र भाषेंत आलें असून, संस्कृतांत 'जे' च्या ठिकाणीं 'यत्' यासंबंधी सर्वनामाचा उपयोग करण्यांत येतो. उदाहरणार्थ, "**अपि का सा स्फूर्तिः यद् ब्रह्मैवाहंनसंसारीति।**" (काय? ही कसली स्फूर्ति झाली? मी संसारी नाहीं, व ब्रह्मच आहे, अशा बद्दलची कां?) प्राचीन भाषेंत, जेचा प्रयोग 'कीं' या अर्थानें करण्यांत येत असे; आणि सांप्रत काळीं, फक्त रोख्यांत व दस्तैवजीं कागदांतच तो अशा अर्थानें आढळतो. जसें, "कृष्णाचें उत्तर ऐकून, अर्जुन बोलिला जे, अपराध पोटीं घाली माझे." "फरोक्त खत लिहून देतो जे." "हा करारनामा लिहून दिला, जाणिजे." इत्यादि.

अव्ययाचें लक्षण.

सदरीं (मागें पान ३६४ पहा) प्रत्यय म्हणजे काय, हें सांगून, तत्संबंधीं आम्हीं अवश्य तें विवेचनही केलें. सबब, आतां अव्ययाचें लक्षण देऊन, त्याबद्दलचा त्रोटक वृत्तान्त वाचका पुढें ठेवतों.

ज्या शब्दास व्यय म्हणजे विकार होत नाहीं, त्यास अव्यय अशी संज्ञा आहे. अर्थात्, नामास विभक्तीचे प्रत्यय लागल्यानें विकार होतो, आणि धातूस आख्यातरूप विकार होतो. परंतु, लवकर, आज, तावडतोब, इत्यादि शब्दांस कांहींच विकार होत नाहीं; व यासाठींच त्यांस अव्यय अथवा अविकारी शब्द म्हणतात.

संस्कृतांत जे शब्द सविभक्तिक आहेत, ते मराठींत तसेच मानण्यांत येत नसून, ते केवळ अव्ययांतच मोडतात. उदाहरणार्थ, बुद्धया, पाशीं, पासून, तस्मात्, जाल्या, इत्यादि शब्द वस्तुतः सविभक्तिक असूनहीं, त्यांस प्राकृतांत अव्ययेंच मानण्याचा परिपाठ आहे.

संस्कृत सविभक्तिक शब्द, व मराठींततली अव्ययें.

ह्यापैकीं, कांहीं अव्ययांचीं विशेषणें बनतात; आणि तीं प्रायः ईल, **ला**, **व**, **चा** , हे प्रत्यय लागून होतात. उदाहरणार्थ, वरला, वरील, जवळचा, जवळील, वगैरे.

अव्ययाची विशेषणें.

कित्येक प्रातिपदिकांस कांहीं विशिष्ट प्रत्यय लागतात' आणि त्या योगानेंच त्यांचीं धातूचीं रूपें सिद्ध होतात. हे प्रत्यय म्हटलें म्हणजे '**आव**' व '**आळ**' असे असून, ह्यांपैकीं, '**आव**' प्रत्यय तर केवळ संस्कृतांतूनच आला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. संस्कृत भाषेंत एक असा नियम आहे कीं, प्रातिपदिकास '**य**' प्रत्यय लागून त्याचा अन्त्य स्वर जो '**अ**' त्याला वृद्धि होते, आणि नन्तर धातूचें रूप बनतें. उदाहरणार्थ, बकोहंसायते, (बगळा हंसाचा आव घालतो); श्वा सिंहायते, (कुत्रा सिंहाचा डौल मारतो); इत्यादि. याचप्रमाणें, मराठींत सुद्धां कांहीं कांहीं प्रातिपदिकांस '**आव**' व '**आळ**' हे प्रत्यय लागून, कित्येक धातूचीं रूपें सिद्ध होतात. जसें, दुणावतो, माणसाळतो, वगैरे.

प्रातिपदिकांची क्रियापदें.

कारकें.

प्रातिपदिकावरून होणाऱ्या चरम[1] प्रत्ययास विभक्ति[2] ह्मणतात; धातूवरून जे चरम प्रत्यय होतात, त्यांस आख्यातें अशी संज्ञा आहे; हे आख्यात-प्रत्यय धातूंस लागल्यानंतर जें रूप होतें, तें क्रियापद होय; आणि नामाचा क्रियेशीं, व वाक्यांतील इतर शब्दाशीं जो संबंध असतो, त्याला कारक ह्मणावयाचें. हीं कारकें खालीं लिहिल्याप्रमाणें सहा प्रकारचीं असल्याविषयीं पाणिनीचें मत आहे. १ कर्ता, २ कर्म, ३ करण, ४ संप्रदान, ५ अपादान, आणि ६ अधिकरण.

भिन्नभिन्न भाषांतील धातू व शब्द.

संस्कृत भाषेंत एकंदर धातू १७०६ असल्याचें संस्कृत वैयाकरणांनीं ठरविलें आहे; ह्यापैकीं, १, ४, ६, व १०, या चार गणांचे १४८० धातू असून, २, ३, ५, ७, ८, व ९, या सहा गणांचे २२६ धातू असल्याविषयीं, शोधक विद्वान्[3] ह्मणतात. अर्थात्, ह्या एकंदर संख्येतच दहाव्या गणांतील १४३ धातूंचाही समावेश होतो, आणि ह्याखेरीज इतर प्रातिपादिकें आहेतच, असें समजावयाचें. शर्मी भाषेंत सुमारें ५०० धातू असल्याचें

---

१ ज्यावरून दुसरे प्रत्यय होत नाहींत, ते चरम प्रत्यय होत.

२ मराठींत चतुर्थी विभक्ति मुळींच नाहीं; व षष्टी विभक्ति जिला ह्मणतात, त्या प्रत्ययास विभक्तित्व मानण्यास अनेक अडचणी येतात. यासाठी, मराठी भाषेंत फक्त पांच विभक्तीच मानाव्या, असा कृष्णशास्त्री चिपळुणकर यांचा अभिप्राय आहे.
( मराठी व्याकरणावरील निबंध. )

३ बेनूफे. ( Benfey. *Kurze Grammatik*. 151. )

पाश्चात्य पंडित सांगतात[1]; आणि चिनी भाषेंत सुमारें ५०० धातू आहेत, असें तद्भाषाभिज्ञ ह्मणतात. एड्किन्सचें[2] असें मत आहे कीं, हे धातू ५३२ आहेत. परंतु, मॉरिसन् हा, ते ४११ असल्याचें सांगतो. जुन्या करारांत, हीब्र्यू व चाल्डी शब्दांची एकुण संख्या ५,६४२ असल्याविषयीं लुसडेन्नें आपला अभिप्राय दिला आहे; व गॉथिक भाषेचे सुमारें ६०० मूळधातू, आणि प्रस्तुत जर्मन भाषेचे अजमासें २५० धातू आहेत, म्हणून बेनलोनें लिहिलें आहे. पॉट्च्या[3] मतें प्रत्येक भाषेचे सुमारें १,००० ज धातू असावेत. परंतु, डॉब्रोस्की हा स्लॉव्हिक शाखेंतील भाषांचे १,६०५ धातू असल्याचे लिहितो; व ग्रिम हा टयूटॉनिक शाखेची ४६२ क्रियापदें आहेत, म्हणून प्रतिपादन करतो. वेबस्टरच्या कोशावरून, इंग्रजी भाषेंत अजमासें ७०,००० शब्द असल्याचें दिसून येतें; आणि ही संख्या १,००,००० जवळ जवळ जाईल असें मार्श म्हणतो.

इराणी भाषेंतील कीलाकृतिशिला लेखावरून, त्या भाषेंत सुमारें ३७९ पेक्षां ज्यास्त शब्द असतील, असें वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर, ह्यापैकीं, १३१ तर विशेष नामेंच असल्यामुळें, फक्त २४८ शब्दच कायते, सामान्य नामें, क्रियापदें, आणि अन्य प्रातिपदिकें, यांचे वाचक आहेत, असें म्हणावें लागतें. मिसर देशांतल्या शराकृति लिपीवरून, त्या भाषेंत सुमारें ६५८ शब्दच असावेत,

---

१ रिनान्कृत शमीभाषेचा इतिहास. पान १३८.

२ Edkin's *Mandariu* Grammar. P. P. 44-45.

३ Pott. *Etym.* Forsch. II. s. 73.

असें बुन्सेनादि[1] पंडितास वाटतें. तथापि, कित्येक[2] असेंही म्हणतात कीं, त्यांची संख्या २,०३० पर्यंत आहे. चिनी भाषेंतील बादशाही कोषांत ४२,७१८ शब्द असल्याचें कळतें. तथापि, ह्या संख्येच्या चौथाई हिश्यांत अगदीं व्यवहारातीतच शब्द असून, राहिलेल्या अर्ध्या भागांत केवळ प्रसंगवशात मात्र येणारे शब्द आहेत. त्यामुळें, बाकीच्या चवथाईत, किंवा सुमारें १०००० शब्दांतच, चिनी लोकांचा नेहेमींचा व्यवहार चालतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

असो. येथपर्यंत प्रातिपदिकांचा अवश्य तो विचार झाला, व तीं धातूपासून उद्भवलीं किंवा स्वयंसिद्ध आहेत, याविषयीं पौरस्त्य मताचें सामान्य दिगदर्शन केलें. त्याचप्रमाणें, अनेक भाषांतील धातू व शब्द, याबद्दलचाही त्रोटक वृत्तान्त वाचकापुढें ठेविला. सबब, आतां, ह्या बाबतींत, म्हणजे व्युत्पत्तिविषयक पाश्चात्यमत कशा प्रकारचें आहे तें पाहून, त्यासंबंधाची सविस्तर हकीकत देऊं.

पाश्चात्य देशांतील व्युत्पत्तिवाद.

पाश्चात्य देशांत, किंबहुना यूरोप आणि अमेरिका खंडांत, व्युत्पत्तिवादाचें बरेंच प्राबल्य असल्याच दिसतें; व जरी कित्येक विद्वान ह्या पक्षाला मिळते नाहींत, तरी "नामच धातुजमाह", ह्या पाठाचाच बहुतेक भाषापंडितांनीं अंगिकार केल्याचें उघड होतें.

---

[1] Bunsen's *Egypt*. P. P. 453-91.

[2] Sharpe's Egyptian Hieroglyphics. 1861.

सेसूंचा[1] अभिप्राय असा आहे कीं, भाषेचे आणि शब्दाच्या पुराणतमरूपाचे द्योतक म्हटलें म्हणजे केवळ धातूच होत.

सेस्.

व्हिटनेचें[2] असें मत आहे कीं, भाषेचा मूलारंभ केवळ धातूंतच होय. इतकेंच नव्हें तर, " एकाचोधातवः ", म्हणजे हे मूळ-

व्हिटनें, व.

धातू निःसंशय एकाक्षरीच असले पाहिजेत, असेंही तो प्रतिपादन[3] करतो. फार तर काय सांगावें, पण तो आणखी असेंही निक्षून लिहितो कीं, एकंदर आर्य भाषा प्रथमतः सर्व एकाक्षरीच असली पाहिजे; ह्या एकाक्षरी वर्णांनीच आमचे पुराण पूर्वज एकमेकाशीं बोलत; ह्या एकाक्षरी वा·

---

१ हा भाषातुलनाशास्त्राचा ऑक्सफर्ड पाठशाळेंतील दुय्यम अ· ध्यापक असून, तो असें लिहितो कीं, " What the language is, that also are its roots " … … " Hence, too, it is, that the roots … … merely represent the oldest forms of words. " … … …

( Introduction to the Science of Language. )
vol. II. P. P. 8/9. 1880 ).

२ हा अमेरिकेंत येल पाठशाळेंतील संस्कृत आणि अर्वाचिन भाषा, यांचा अध्यापक आहे. हा म्हणतोः—

" That in these roots we approach very near to, if we do not quite touch, the actual beginnings of speech, is proved by other considerations. "
( Language and the Study of Language. P. 264. )

३ " But these concessions do not inpair our claim that the inflective structure of Indo-European speech is built up upon a historical foundation of monosyllabic roots. "

( Study of Language. P. 263. 1867. )

चेंतच ते आपला सर्व व्यवहार उरकून घेत; आणि अशा प्रकारच्या एकाक्षरी मंत्रांतूनच आर्य भाषेचा सांप्रतचा प्रचंड ओघ, तिची आश्चर्यकारक रमणीयता, तिची सर्वांगीं चारुता, तिचें पदलालित्य, तिचें गांभीर्य, तिचें माधुर्य, आणि तिची प्रौढता, यांचा केवळ अपूर्व उद्भव झाला आहे.

आतां, आर्यभाषेची ह्मणजे संस्कृतची प्रथमची निव्वळ मुग्धावस्थाच असून, ती फक्त शनैः शनैः व कालान्तरानेंच रूपवती होऊन मनोहर बनली; आणि शेवटीं शेवटीं तर ती अगदीं पूर्ण दशेप्रत पावून लावण्याची निव्वळ खाणच झाली; हें जरी अक्षरशः खरें आहे, तरी आमचे आर्यपूर्वज हे फक्त एकाक्षरी भाषेंतच बोलत, व एकाक्षरी शब्दांनींच आपला सर्व कारभार चालवीत असत, इत्यादि व्हिटनेचें प्रतिपादन[1] सत्यापासून फारच दूर असल्यामुळें, तें आह्मांस ग्राह्य वाटत नाहीं. इतकेंच नव्हें तर, तें बिलकुल शक्यच नाहीं, असें देखील कोणालाही कबूल केलें पाहिजे. कारण, समाजाच्या प्रथमच्या आणि बाल्यावस्थेंतील ह्या एकाक्षरी कोषाची कल्पना केवळ असंभवनीयच

---

१ " And the recognition of them in this character is an acknowlegement that Indo-European language, with all its fulness and inflective suppleness, is *descended* from an *original monosillabic tongue; that our ancestors talked with one another in single syllables*, indicative of the ideas of prime importance, but wanting all designation of their relations. " ( Whitney's Language and its Study. P. 256. )

दिसतें, आणि ह्मणूनच कित्येक पाश्चात्यांनीं तद्विषयक आपला निषेधही प्रदर्शित केला आहे.

मॉक्समुलर यांचा अभिप्राय.

पाश्चात्यदेशांतील अनेक भाषाकोविदांत, मॉक्समुलर हा अगदीं अग्रणीत्वानें मोडत असल्याविषयीं सर्वांस मशहूर असून, हा सुद्धां शाकटायनाच्या दीक्षेंतीलच आहे, असें ह्मणावें लागतें. "कारण, नामच धातुजमाह", हा त्यांचा सिद्धांत होय; आणि ह्मणूनच त्याची गणना व्युत्पन्नत्ववाद्यांत करण्यास हरकत नाहीं. हा असें ह्मणतो[२] कीं,

१ व्हिट्नेच्या प्रतिपादनाचा आव्हेर करतांना, व एकाक्षरी भाषेच्या असंभाव्यतेच्या संबंधानें, सेस् हा एके ठिकाणीं असें लिहितो कीं,

" *Such a language, however, is a sheer impossibility—even for a body of philosophers* or *comparative philologists*, and it is *contradicted* by all that we know of savage and barbarous dialects."

( Introduction to the Science of Language. vol. II. P. 5. )

२ " All that we have a right to assert is that language begins with roots, aud that these roots are neither more nor less than phonetic types, or typical Sounds."

( Lectures. Science of Language. vol. I P. 441. )

" If we trace words, back to their most primitive elements, we arrive, not at letters, but at roots." ( II. 80. )

" The simplest parts into which language can be resolvod are the *roots*, and these themselves can

( पुढें चालू. )

भाषेची उत्पत्ति फक्त धातूपासूनच आहे; व हे धातू म्हटले म्हणजे केवळ ध्वनिमुद्रा, किंवा स्वरलक्षण, अथवा प्रतिरूपक नादच होत.

ह्यानें धातूंचे तीन भेद केले आहेत.

१ प्राथमिक, म्हणजे मूळ किंवा प्रधान धातू.

२ अप्रधान, अथवा गौण धातू, आणि

३ तृतीयक धातू.

१ पहिल्यांत खालीं लिहिलेले तीन प्रकार आढळून येतात.

( अ ) एकस्वरी धातु. उ० इ=जाणें.

( आ ) एकस्वरी व एक व्यंजनी धातु. उ० अस्= असणें.

( इ ) एक व्यंजनी आणि एकस्वरी धातू. उ० दा=देणें.

२ दुसऱ्यांत, प्रथमांतीं व्यंजन असून, मध्यें स्वर असतो. उ० पुष्=पोषण करणें.

३ तिसऱ्यांत,

( अ ) पहिलें द्वित्तव्यंजन व नन्तर स्वर. उ० द्रु=वाहणें.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

not be further reduced without destroying the nature of language, which is not mere sound, but always significant sound." ( II. 86. )

"With us, speaking inflectional and highly refined languages, roots are primarily what remains as the last residuum after a complete analysis of our own dialects, or of all the dialects that form together the great Aryan mass of speech."

( II. 89. Lectures. Sc. of Languago ).

( आ ) पहिला स्वर आणि नन्तरचें द्वित्तव्यंजन. उ. अर्च्=पूजा करणें.

( इ ) प्रथम द्वित्तव्यंजन, नन्तर स्वर, व पुनः व्यंजन. उ० स्रव्=वाहणें.

( ई ) प्रथमांन्तीं द्वित्त व्यंजन, आणि मध्यें स्वर. उ० स्पर्श्=आलिंगन देणें, शिवणें.

असो. हेजेल[1] प्रभृति पाणिनीचें अनुकरण करून, अव्युत्पत्तिपक्षच स्वीकारतात. ते असें म्हणतात कीं, हरएक नाममात्र, किंबहुना प्रातिपदिक स्वयंसिद्ध असल्यामुळें, तेंच आपल्या विचाराचें मूलबीज होय. आणि त्यामुळें, **उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि**, असाच त्यांच्या म्हणण्याचा पर्यायानें आशय आहे, यांत संशय नाहीं.

हेजेल प्रभृति अव्युत्पत्तिवादी.

प्रोफेसर पॉट्[2]चें मत अशाच प्रकारचें असल्यामुळें, तो

---

१ हेजेलच्या म्हणण्याचा इंगितार्थ **मॉक्समुलरनें** लिहिल्याप्रमाणें येथें देतों. **मॉक्समुलर** म्हणतो, " Hegel speaks more simply and more boldly. ' It is in names, ' he says, ' *that* we think. ' "

( Lectures. Science of Language. vol. II. P. 78. )

२ **पॉट्** म्हणतो,

" Root, it should be observed, as such, *lack the stamp of words*, and therefore, *their real value in the curreucy of speech*. There is no *inward necessitg* why they should *first have entered into the reality of language*, naked and formless. "

( *Etymologische Forschungen*. II. 95 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

पाँटचें मत.

धातूंस शब्दांची किंमत किंवा प्रातिपदिकांचें मूल्य आहे, असें समजत नाहीं. अर्थात्, तो धातूंस प्रधानत्वानें मानीत नसून गौण मानतो, हें उघड आहे.

हंबारवोपपत्तिवाद.

कित्येक[1] पाश्चात्य पंडित सदरहू दोन्ही मार्ग सोडून देऊन, तिसऱ्याच मार्गाचें अवलंबन करितात. त्यांचा अभिप्राय असा आहे कीं, मानवी प्राण्यांचे शब्द केवळ अनुकरणानेंच बनले; व ह्या शब्दसमुच्चयाचीच भाषा झाली. म्हणजे, ह्या विशाल सृष्टींतील पंचमहाभुतें, तिच्यांतील नानाविध पशू, अनेक पक्षी, आणि असंख्य प्राणी, यांचे भिन्न भिन्न शब्द ऐकिल्यानेंच त्याची भाषा तयार झाली. किंबहुना, मेघांचा गडगडाट, विजांचा चकचकाट, वाऱ्याचा सोसाटा, गाईचें हंबरणें, घोड्याचें खिखाळणें, कुत्र्याचें भोंकणें, पक्षांचें कूजित, इत्यादि ध्वनींचा मनुष्यमात्राच्या श्रवणपुटावर संस्कार होऊन, त्या त्या नादांचें त्यानें यथामति व यथाशक्ति अनुकरण केलें, आणि त्याचाच शब्द बनला. अशा प्रकारच्या शब्दोपपत्तीला आम्ही हंबारवोपपत्ति असें नामधेय दिलें आहे. ( मागें पान ९६ पहा ). परंतु, शब्दोत्पत्तीची ही कल्पना सयुक्तिक दिसत नाहीं. कारण, शब्दाच्या उपपत्तीचें फक्त अनुकरण[2] हेंच एक साधन

---

१ हर्डर ( Herder ) प्रभृति. परंतु, कालान्तरानें हर्डरनें आपण होऊनच ह्या मताचा त्याग केला असल्याचें दिसतें.

२ हें अनुकरण सर्व देशांत, सर्व राष्ट्रांत, किंवा सर्व भाषांत, एकसारखें नसून, तें केवळ अनेक राष्ट्रांच्या भिन्न भिन्न कल्पना

( पुढें चालू. )

आहे, व त्याखेरीज दुसरें मुळींच नाहीं, असें खचितच कधीं देखील बिलकुल म्हणतां येणार नाहीं. आणि म्हणूनच, ही ईश्वरबोधोपपत्तीची कल्पना केवळ भ्रांतिमूलक आहे, असें भासतें.

काँण्डिल्याक वगैरे तत्ववेत्यांचें याहूनही अगदीं निराळेंच मत आहे. ते असें ह्मणतात

हाहोपपत्तिवाद.

कीं, मानवी प्राण्याला अनुकरण करण्याचें काडीमात्रही प्रयोजनच नाहीं. कारण, तो सुस्कारा टाकतो, रडतो, हंसतो, व खिदळतो; आणि भीति, दुःख, व आनन्द, हीं प्रदर्शित करण्यासाठीं, तो नानाप्रकारचीं चिन्हें पण दाखवितो. इतकेंच नव्हें तर, अनेक संज्ञांनीं तो आपलें मनोगत व्यक्तही करतो. तेव्हां, अशा प्रकारची वस्तुस्थिति असल्यामुळें, उद्गार हेच वाचेचें मूलकारण होत, असें ते मानतात. ह्या उपपत्तीला हाहोपपत्ति अशी

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

तरंगांवर, व निरनिराळ्या समजुतीवरच अवलंबून असतें. त्यामुळें, त्या अनुकरणांत बहुतकरून ऐक्य नसतें, हें सांगावयासच नको. आणि ही गोष्ट अनुकरणात्मक अशा कित्येक शब्दांवरून, वाचकाच्या लक्षांत सहजीं येईल. मात्र, येथें भासल्याकरतां, व वाचकाच्या सोईसाठीं, फक्त एकच उदाहरण देतों.

| संस्कृत. | मराठी. | गुजराथी | चिनी. | मन्दशू. | इंग्रजी. |
|---|---|---|---|---|---|
| कुक्कुटो-विरौति. | कोंबडा आरवतो. | मरघडो बोलेछे. | किआव किआव | च्योर च्योर | काँक क्रोज. |

संज्ञा आह्मीं दिली असल्याचें वाचकाच्या ध्यानांत असेलच. ( मागें पान ९८ पहा ).

आतां, उद्गार हे वाचेचे द्योतक आहेत; आणि त्या-योगानेंच आपल्या मनांतले कित्येक भाव व्यक्त करतां येतात; हें जरी अंशतः खरें आहे, तरी फक्त तेवढ्याच कारणावरून, त्यांस वाचेचा " ओनामा " खचितच म्हणतां येणार नाहीं. कारण, वाचेचा उद्भव होण्यास ह्याखेरीज दुसरीं अनेक कारणें आहेत.

नऊ धातूंपासून भाषोत्पत्ति.

डाक्तर मरे[1] असें प्रतिपादन करतो कीं, ह्या भूतलावरील एकंदर भाषांचा उद्गम फक्त नऊ धातूंपासूनच झाला आहे; आणि हे मूळ धातू म्हटलें म्हणजे १ ऑग्, २ ब्यॉग्, ३ क्व्यॉग्, ४ ड्व्यॉग्, ५ ल्यॉग्, ६ म्यॉग्, ७ न्यॉग्, ८ ऱ्याग्, व ९ स्व्यॉग्, असे होत.

एकाच धातूपासून भाषोत्पत्ति.

डाक्तर शिमड्[2]ची धांव तर याच्याही पुढें असल्याचें दिसतें. कारण, तो यच्चावत् भाषांचें मूळ केवळ एकाच धातूंत आहे, असें म्हणतो. त्याची अशी समजूत आहे कीं, सर्व ग्रीक शब्द फक्त ' ई ' धातूपासून झाले असून, एकंदर ल्याटिन् शब्दांची उत्पत्ति मूळ धातु 'हि' पासूनच झाली आहे.

---

१ " Dr. Murray's primitive roots were:—*ag, bag, cwag, dwag, lag, mag, nag, rag, swag.*" ( Max Muller's Lectures on the Sc. of Language. )

२ Curtius. Griechische Etymologie. S. 13. )

ह्या व अशा प्रकारच्या कल्पना केवळ मानसिक तरंग आणि निराधार मनोव्यापार होत. निदान, आमच्या अल्प समजुतीला तरी त्या तशा असल्याचें भासतें. सबब, त्यासंबंधानें येथें ज्यास्त विवेचन करण्याचें कारण दिसत नाहीं.

---

# भाग दहावा.

## शब्दापभ्रंशाचा त्रोटक विचार.

अपभ्रंश विवेचन.

प्रस्तुत भागांत, मूळ संस्कृत शब्दांत स्थित्यंतर होऊन, त्याचें रूपान्तर कसकसें झालें, तसेंच नानाविध कारणांनीं अपभ्रंश होत गेल्यामुळें, अन्य शब्द कसे बनले, हें फक्त दिग्दर्शन होण्यासाठींच थोडक्यांत दाखविण्याचा विचार आहे.

अनेक भाषांतील शब्दसाम्य, व त्यांचें रूपान्तर.

आतां, संस्कृत भाषेंतील जे अनेक शब्द दुसऱ्या कित्येक भाषांत दृष्टीस पडतात, ते क्वचित् मुळच्या स्थितींत असून, कित्येक तर साधारण रूपान्तर झालेलेच आढळतात. तथापि, ते बहुतकरून अपभ्रष्ट स्थितींतच असतात, असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं.

तद्विषयक नियमन.

ह्या सर्व शब्दांच्या स्थित्यंतराचा आणि रूपान्तराचा आपण अगदीं लक्षपूर्वक विचार केला तर, आपणांस असें खचित दिसून येईल कीं, हे अपभ्रंश केवळ नियंत्रित असून, ते भाषाशास्त्राच्या नियमास अनुसरूनच झालेले आहेत; आणि एतद्विषयक सविस्तर ऊहापोह सुप्रसिद्ध भारतीय भाषाकोविद जो वररुचि, व नामांकित हेमचन्द्र, यांनींही आप-

आपल्या **प्राकृत व्याकरणांत** केला आहे. तथापि, कित्येक ठिकाणीं बरेच अपवादही आढळून येतात. परंतु, ह्या अपवादांनींच सामान्य नियमांची व्याप्ति सिद्ध होते, हें कोणालाही कबूल केलें पाहिजे.

अस्तु. मूळशब्दांचें रूपान्तर कसकसें होत गेलें आहे, हें निदान थोड्याबहुत तरी प्रमाणानें वाचकाच्या ध्यानांत येण्यासाठीं, शब्दापभ्रंशाचें कांहीं नियम केवळ संक्षिप्त रूपानेंच येथें देतों. कारण, तद्विषयक साद्यन्त विवेचन करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें, तसें करतां येत नाहीं.

## स्वरासंबंधीं नियम.

१ प्राकृतांत, **ऋ, ॠ, ऌ, ॡ, ऐ,** व **औ**, या स्वरांचा उपयोग करण्यांत येत नाहीं.

२ **ऋ**ची **रि** होते. उ०. घृतं=घी. शृंगं= शिंग. परंतु त्याच्या मागें व्यंजन असल्यास त्याच्या ऐवजीं **अ, इ,** किंवा **उ**, यांचा आदेश बहुतकरून होतो. उ० मृतं=मढें. कृपा=कीव.

३ **ऐ**ची **ए** अथवा **अई**, किंवा क्वचित् **इ** अगर **ई** होते. उ० धैर्यं=धीर.

४ **औ**चा **ओ** किंवा **अउ**, आणि केव्हां केव्हां **उ** होतो. उ० **गौर=गोरा. औषध=ओखद. सौराष्ट्र = सोरट.** ( देश ). **सौन्दर्य=सुंदर.**

५ **ए** अगर **ओ** हे संयुक्तस्वर समजण्यांत येत नसून, ते ऱ्हस्व किंवा दीर्घ होतात.

६ द्वित्त व्यंजनामागील स्वर दीर्घ असल्यास तो ऱ्हस्व होतो. ह्मणजे **आ, ई,** आणि **ऊ**, यांच्या ऐवजीं **अ, इ,** व **उ**,

यांचा आदेश होतो. उ० संस्कृत ईश्वर=प्राकृत इस्सर. मार्ग= मग्ग

७ विसर्गाचा लोप होऊन, अचा आ होतो. उ० रामः=रामा.

८ अची इ, उ, ए, ओ व औ, होतो. उ० पंजर=पिंजरा. मज्जन=बुडणें, शय्या=शेज. वर्कर=बोकड. चतुर्थ=चौथ.

९ द्वित्त व्यंजनामागील स्वर ऱ्हस्व असल्यास तो दीर्घ होतो. उ० जिव्हा = जीभ. गर्भ = गाभ. दंत=दांत.

१० क्वचित्, आदिस्वर अ असल्यास त्याचा लोप होतो. उ० अरघट्ट = रहाट.

११ संयुक्त व्यंजनापूर्वी इ व उ असल्यास, त्यांबद्दल बहुतकरून, ए आणि ओ येतात. उ० तुंड = तोंड. सिन्दुर = शेन्दूर.

१२ उचा क्वचित् ओ व अ होतो. उ० पुस्तक = पोथी. सिन्धु = सिंध.

१३ इचा अ, ई, ऊ, व ऐ होतो. उ० हरिद्रा = हळद. विद्युत् = वीज. इक्षु = ऊस. कीदृश = कैसा.

१४ एचा ई होतो. देवृ = दीर.

१५ केव्हां केव्हां दोन स्वराबद्दल एकच स्वराचा आदेश होतो, व तसें होतांना एकादें अक्षर अजिबात गळतें. उ० उपवास=उपास. उलूखल=उखळ. अवस्थान=वठाण.

### व्यंजनासंबंधीं नियम.

१ प्राकृतांत तालव्य, किंवा मास्तिष्कोष्म व्यंजनें नाहींत.

२ न्च्या पुढें दन्त्यव्यंजन आलें नसल्यास, त्याचा ण् होतो. उ० कठिनं = कठिण.

३ आरंभीच्या य्चा ज् होतो. उ० १ यव = जव. २ यानं = जाणें.

४ अन्त्य व्यंजनाचा लोप होतो. मात्र, हें व्यंजन म् किंवा न् असल्यास, त्यांचा अनुस्वार बनतो. उ० विद्युत्=वीज.

५ शब्दाच्या पोटांत क्, ग्, च्, ज्, त्, द्, प्, ब्, व्, य्, असे असल्यास, ते तसेच राहतात; किंवा त्यांजला गाळाऊ करण्यांत येतें. मात्र, त् व प् हीं व्यंजनें राहिलीं असल्यास, त्यांच्याबद्दल द्, आणि व् अथवा ब् होतो. उ० कूप = कुवा.

६ ट् चा ड् होतो; व ड् चा क्वचित् ल् होतो. उ० घट = घडा. बिडाल = बिलाडी. ( गुजराथी ).

७ र् चा ल् होतो.

९ ण्, म्, ल्, स्, आणि ह्, यांच्यांत कांहींएक फरक न होता, ते तसेच राहतात.

१० ख्, घ्, थ्, ध्, भ्, यांच्या ऐवजीं ह्चा आदेश होतो, किंवा त्यांत कांहींएक बदल न होता, ते मूलस्थितींतही राहतात. उ० १ लेखनं = लिहिणें. २ प्राघुणः = पाहुणा. ३ बधिर=बहिरा. ४ लाभ=लाहो.

११ कित्येक ठिकाणीं क्, ग्, च्, ज्, ड्, त्, द्, ध्, प्, भ्, म्, य्, र्, ल्, व्, श् आणि ह्, यांचा लोप होतो. उ० १ कुंभकार = कुंभार. २ चंपानगर= चांपानेर. ३ मरीच = मिरें. ४ सपाद = सव्वा. ५ देव्र = दीर. ६ भिक्षाहारी = भिकारी. ७ भूमि = भुई.

१२ कचा ग आणि गचा क होतो. उ० १ आकर = आगर. २ कर्मकार = कामगार. ३ पंचगव्य = पंचकव्य. ४ प्रकट = प्रगट.

१३ अनुस्वाराचा व अंत्य तिचा कचित् लोप होतो. उ० विंशति = वीस. त्रिंशत् = तीस.

१४ बच्या ठिकाणीं व; ड च्या जागीं ल किंवा ळ; कचा ख; षचा ख; असेही आदेश होतात. उ० १ बाष्प = वाफ. २ गुड = गूळ. ३ कीलक = खिळा. ४ औषधं = ओखद.

१५ संस्कृत शब्दांतल्या जोडाक्षराचे आद्य अवयव श, ष, स, असल्यास त्यांचा लोप होतो. उ० श्मशान=मसण. शुष्कः = सुका.

१६ संयुक्त थचा ठ होतो. उ० १ ग्रंथि = गांठ. २ उत्थानं = उठणें.

१७ कचित् ठचा ढ होतो. उ० पठणं = पढणें.

१८ त आणि दच्या जागीं ड होतो. उ० पतनं = पडणें. दोलनं = डोलणें.

१९ पच्या जागीं फचा आदेश होतो. उ० पाशः = फांस. पनस = फणस.

२० श आणि षच्या जागीं सचा आदेश होतो. उ० १ वंश = वासा. २ पोषणं = पोसणें.

२१ क्षचा ख अथवा स होतो. उ० १ लाक्षा = लाख. २ कक्षा = काख. खाक. ३ कुक्षि = कूस.

२२ द्यच्या जागीं ज होतो. उ० अद्य = आज.

२३ ष्ट अथवा ष्ठ यांच्या ऐवजीं ठ किंवा ड होतो. उ० १ ओष्ठ = ओंठ. २ पृष्ट=पाठ. ३ काष्ट=काडी.

२४ आद्याक्षर लघु असून, तदनन्तरचें जोडाक्षर असलें तर, त्या जोडाक्षराच्या एक अवयवाचा लोप होतो, आणि

आद्याक्षर दीर्घ होते. उ० चक्र=चाक. तक्र=ताक. सदरहू जोडाक्षराचा अवयव अनुनासिक असल्यास, त्यांतलें आद्याक्षर गुरु होते, व त्याला अनुस्वार सामील करण्यांत येतो. उ० दन्त = दांत. कंप=कांप.

२५ द्ध चा ड अथवा ढ होतो. उ० वर्द्धनं = वाढणें. सार्द्धपंच = साडेपांच.

२६ स्तचा थ होतो. उ० स्तोकं = थोडें. हस्त = हाथ ( गुजराथी ).

२७ द चा व होतो. उ० पाद = पाव ( हिंदुस्थानी ).

२८ मचा व होतो उ० लोम = लव.

२९ ष व शच्या ठिकाणीं छ; आणि छच्या जागीं सचा आदेश होतो. उ० १ षट्त्रिंशत् = छत्तीस. २ शाटी = छाटी. ३ कच्छप = कासव.

३० अंत्य कचा ड होतो. उ० केतक = केवडा.

३१ ऋकारान्त शद्बांत, अंन्त्य ताच्या ऐवजीं ईचा आदेश करण्यांत येतो. उ० १ भ्राता = भाई. २ जामाता=जांवई. माता = माई, आई.

३२ कित्येक ठिकाणीं, गच्या ऐवजीं घचा आदेश होतो. उ० १ गृह = घर. २ ग्रास = घास.

३३ तच्या जागीं व आणि लचा आदेश होतो. उ० १ कंकत = कंगवा. २ कृतं = केलें.

३४ प्रति उपसर्गाच्या ऐवजीं पदिचा आदेश होतो.

पाश्चात्य अपभ्रंशाचा व्यापक नियम.

याप्रमाणें, प्राकृत भाषांत जो शब्दांचा अपभ्रंश हो गेला, त्याबद्दलच्या सामान्य नियमनाच येथें थोडक्यांत विवेचन केलें. तथापि,

आर्य अथवा वैदिक किंवा संस्कृत[1] मायभाषेच्या ज्या पाश्चात्य शाखा, म्हणजे ग्रीक, ल्याटिन्, सेल्टिक्, स्लॅव्होनिक, लिथुआनियन्, गॉथिक्, उच्च जर्मन्, इत्यादि युरोपखंडांत प्रचारांत आहेत, त्यांत मूळ संस्कृत शब्दांचा अपभ्रंश कोणत्या नियमानें झाला, याबद्दलचेंही दिग्दर्शन करण्याची खरी अवश्यकता आहे. कारण, हा नियम[2] सर्वसाधारण आणि व्यापक असल्यामुळें, फारच महत्वाचा आहे.

१ संस्कृतांतील धातु किंवा शब्द ग्रीक, ल्याटिन, सेल्टिक, स्लॅव्होनिक, लिथुअनियन्, गॉथिक, उच्च जर्मन्, इत्यादि भाषांत आल्यावर, जेथें जेथें संस्कृतांत अथवा ग्रीक भाषेंत महाप्राणाचा उच्चार करण्यांत येतो, तेथें तेथें लिथुआनियन्, स्लॅव्होनिक, सेल्टिक, गॉथिक, सामान्यतः नीच जर्मन्, सॅक्सन्, अँग्लो सॅक्सन्, फ्रीजियन्, वगैरे भाषांत, तत्सदृश मृदु वर्णाचा उपयोग होतो; आणि पुराण उच्च जर्मन भाषेंत तर, तत्सदृश कठिण वर्णच उच्चारतात. उदाहरणार्थ, संस्कृतांतल्या घ, ध, भ,

---

१ संस्कृत, वैदिक, आणि आर्यभाषा, हे केवळ पर्याय शब्दच होत; व सर्व आर्य भाषांत, संस्कृत ही आद्यभाषाच असल्याविषयीं मॉक्समुलरनेंच एके ठिकाणीं कबूल केलें आहे. तो म्हणतो, "Sanskrit ( is ) the most primitive, most transparent of the Aryan dialects." (Sc. L. vol. II. P, 452). मागें पान १३५–१३६ पहा.

२ हा ग्रिम्मनें शोधून काढला आहे. मॉक्समुलरचें भाषाविषयक पांचवें व्याख्यान पहा. (भाषाशास्त्र. भाग २ रा. पान २१६ ते २४६).

घर्णांच्या ऐवजी गाँथिक वगैरे भाषांत ग, द, ब वर्णांचा प्रादुर्भाव होतो; व पुराण उच्च जर्मन भाषेंत तत्सदृश कठिण वर्ण क, त, प, दृष्टीस पडतात.

२ संस्कृत, ग्रीक, ल्याटिन, लिथुआनियन्, स्ल्यॉव्हॉनिक, आणि सेल्टिक भाषांतील मृदु वर्ण गाँथिक भाषेंत कठोर होतात. उदाहरणार्थ, ग, द, ब, चे क, त, प, बनतात.

३ संस्कृत, ग्रीक, ल्याटिन्, लिथुआनियन्, स्ल्यॉ-हॉनिक, व सेल्टिक, यांतील क, त, प, सारखे कठोर वर्ण गाँथिक भाषेंत तद्वर्णतुल्य विसर्गात्मक बनून, पुराण-उच्च जर्मन भाषेंत ते तत्तत्स्थानात्मक मृदुवर्णच होतात.

ह्याला कांहीं अपवादही आहेत. परंतु, त्यावरून एकंदर सर्वसाधारण नियम स्थूलमानानें ध्यानांत येईल.

---

१ संस्कृतांतील वर्णपद्धति पूर्णतेस आली असून, तींत व्यंगोक्ति नाहीं, असें मॉक्समुलरचें सुद्धां मत आहे. तो ह्मणतो,

" In Sanskrit the system ( of letters ) is complete. ( Sc. L. II. 216 ).